यू रो प व र

# भीतीचें साम्राज्य

CONQUEST BY TERROR

या पुस्तकाचा अनुवाद


लेखक

लीलॅंड स्टोव



नवसाहित्य प्रकाशन, मुंबई

# प्रस्तावना

मीं हें पुस्तक कां लिहिलें तें जाणण्याची आपल्याला कदाचित् उत्सुकता असेल अशी माझी कल्पना आहे.

"पोलादी पडदा" म्हणून म्हटला जातो त्यांत कित्येक फटी आणि छिद्रें आहेत अशी माझी खात्री आहे. त्यामुळेंच मीं हे पुस्तक हातीं घेतलें. कारण आम्ही पश्चिम युरोपांतले लोक पूर्व युरोपांतून येणाऱ्या महत्त्वाच्या सूचना एकत्रित करीत नाहीं आणि प्रकाशितही करीत नाहीं. पण याचा परिणाम मात्र असा होतो कीं त्यामुळें या फटींतून आणि छिद्रांतून अनावश्यक लोखंड ठांसलें जातें. १९४६ मध्यें मी सोव्हिएट रशियाच्या गुलाम देशांतून बातम्या पाठविण्याचें काम सतत पांच महिने केलें. आणि त्यावेळीं तर माझी याबद्दल पक्की खात्री झाली. सोव्हिएटच्यां आधीन असलेल्या अर्ध्या युरोपांत कम्युनिस्ट काय करीत आहेत यासंबंधीं आपल्याला पुष्कळ माहिती मिळूं शकेल. आणि ती आपण मिळवलीच पाहिजे. या विषयावर पुष्कळ खरीखुरी सामुग्री उपलब्ध आहे. पण त्या सामुग्रीकडे पुरेसे श्रम आणि व्यवस्था याच्या साहाय्यानें जितकें दृढतापूर्वक लक्ष पुरवायला हवें तितकें पुरवलें गेलें नाहीं.

स्टॅलिनवादी लोक साडेसहा परराष्ट्रांमध्यें ( यांत पूर्व जर्मनीचाही समावेश होतो ) कशा प्रकारें आपले पाय पक्के रोवीत आहेत हें बारकाईनें जाणणें आमचें कर्तव्य आहे. कारण आमच्या स्वतःच्या स्वातंत्र्याचें रक्षण करणें याच ज्ञानावर अवलंबून आहे. वास्तविक कम्युनिस्टांच्या नियंत्रणाच्या पद्धती कोणत्या ? पूर्व युरोपच्या जनतेवर ते कशा प्रकारें आपलें वर्चस्व प्रस्थापित करतात, अगर त्या जनतेला कशा तऱ्हेनें आपली गुलाम बनवितात ?

सप्टेंबर १९५० मध्यें मीं असा निश्चय केला कीं रशियाच्या "पूर्व युरोपीय सैन्या"बद्दल अधिकाधिक उपलब्ध सत्य सामुग्री एकत्रित करण्याचा प्रयत्न करीन. लोहआवरणांतील अत्यंत उपेक्षित छिद्रें याच ठिकाणीं आहेत. वास्तविक आपल्याला बातमी मिळवण्याचे पुष्कळ मार्ग आहेत.

त्यांपैकीं कांहीं म्हणजे, निर्वासित पत्रकार ( यांपैकीं कांहींजणांशीं पूर्व युरोपांतच माझी ओळख झाली होती. ) या देशांतील निर्वासित राष्ट्रीय समित्यांचे सभासद; मध्य युरोपांतील अध्ययन-केंद्रांमधील विशेषज्ञ, गुलाम राष्ट्रांतील सैन्यांतले माजी अधिकारी, शासनमंडळांतील माजी मंत्री, आणि पोलादी पडद्यामागून नुकतेच आलेले शरणार्थी; स्वतंत्र युरोपच्या राष्ट्रीय समितीनें मोठ्या सौजन्यानें मौल्यवान् सामुग्री मिळवली आहे. एन्. सी. एफ्. ई. नें चालविलेल्या स्वतंत्र रेडियो यूरोपनें फारच महत्त्वाचें सहकार्य दिलें. हा रेडियो पोलादी पडद्यामागच्या देशांतून फार मोठ्या प्रमाणांत माहिती गोळा करतो. प्रत्येक कम्युनिस्टशासित राष्ट्रांत असा एकेक रेडियो संचालक नेमलेला आहे. पश्चिम युरोपांत या निष्णात संचालकांची कोणीही बरोबरी करूं शकणार नाहीं.

खरें म्हणजे मी ही जबाबदारी आपणहून माझ्यावर घेतली. पण जानेवारी १९५१ च्या सुरवातीला मी या कामांत पुरता गुरफटून गेलों. उपरिनिर्दिष्ट सर्व धाग्यादोऱ्यांकडून मी मदत मिळवली. त्यांच्या तज्ञांशीं बोललों. शेकडों गुप्त अहवालांचा अभ्यास केला. आणि एप्रिलपर्यंत वस्तुस्थितीचे सर्व धागे आपोआप एकत्र विणले गेले.

फॅसिस्टांप्रमाणें कम्युनिस्टांनीही हें पुरतें ओळखलें आहे कीं जी गोष्ट ( त्यांच्या दृष्टीनें ) आवश्यक आहे ती पुन्हां पुन्हां सांगावी लागते. आणि विशेष म्हणजे त्यांचें "सत्य" म्हणजे आगापीछा नसलेलें एक असत्य असल्या-मुळें त्यांची घोकंपट्टी जास्तच आवश्यक आहे. परंतु सर्वसामान्य जनतेच्या माथीं मारण्यासाठीं खरें, खोटें, कांहीं का होईना, कांहीं तरी असावेंच लागतें हें हुकूमशहा पक्के जाणून असतात. इतर एखाद्या धड्याप्रमाणें निवळ वरवर वाचून कोणीही व्याकरण किंवा रेखागणिताचा अभ्यास करूं शकत नाहीं. स्वतंत्र देशांतील लाखों, करोडों लोकांच्या डोक्यांत कम्युनिस्ट लोक आपले विचार भरवून देऊं शकतात, याचें कारण इतकेंच कीं जनतेच्या मनावर पक्क्या ठसवण्याच्या ज्या गोष्टी आहेत त्या त्यांना पुन्हां पुन्हां सतत कम्युनिस्ट सांगत असतात.

असें आहे तर स्वतंत्र लोकांमध्यें जागृति उत्पन्न करून त्यांच्या कार्य-संकल्पांना दृढता प्राप्त करून द्यायची असेल तर अमूल्य आणि महत्त्वपूर्ण सत्यें लोकांच्या मनांवर कम्युनिस्टांइतक्या चिकाटीनें सतत ठसायला नकोत का ? हें कामही तितकेंच जरूरीचें नाहीं का ? स्वतंत्र जगांतील दळणवळण-खात्याच्या अधिकाऱ्यांची व त्यांच्या सार्वजनिक जबाबदाऱ्याची फारकत झालेली आढळते. कांहीं अपवाद सोडले तर ते मार्ग सरून क्रेमलिनसाठीं बाट मोकळी करून देत आहेतसें वाटतें.

अशा सत्यासत्यांमध्येंही फार फरक आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. पूर्व युरोपांत सक्तीच्या मजूर छावण्या आहेत हें सर्वांना आतां माहीत आहे. पण दुसरीकडे अशी वस्तुस्थिति आहे कीं या शेकडों छावण्यांतून दहा लाखांवर लोकांना क्रमशः मृत्युमुखांत लोटलें जात आहे हें सत्य कोणालाच माहिती नाहीं. याशिवाय आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, कम्युनिस्ट आणखी कित्येक छावण्या तयार करीत आहेत. त्या छावण्यांचा उद्देश एवढाच कीं, पुढील कांहीं वर्षांत आणखी गुलामांना मृत्यूच्या जबड्यांत लोटायचें. ही कांहीं " भूतकालीन गोष्ट " नाहीं. हें पुस्तक म्हणजे या विषयाची एक दीर्घकथा आहे; ( दुर्दैवानें पुस्तक फार लहान आहे. ) पण या गोष्टी मीं अजून आमच्या दैनिक वर्तमानपत्रांत कोठेंही छापलेल्या पाहिल्या नाहींत. बहुसंख्य पाश्चिमी नागरिकांच्या मनावर ह्या असाधारण सत्याचा ठसा उठवायचा असेल तर केवळ एकाद्या दुसऱ्या वर्तमानपत्रांत लेख लिहून भागणार नाहीं. अजूनही आरामांत बसलेल्या या जनतेला तेवढ्यानें खडबडून जाग येणार नाहीं.

आतां यापुढें आम्हांला जास्त अंधारांत राहून चालणार नाहीं. कम्युनिस्टांच्या विजयप्राप्तीच्या पद्धतीचें आम्हांला अजून पुरेसें आकलन झालेलें नाहीं आणि तोंपर्यंत रशियाच्या या भयंकर विस्ताराला पायबंद घालण्यास आम्ही पूर्णपणें समर्थ होऊं शकणार नाहीं. एक क्रांति पुढें पाऊल टाकीत आहे. परंतु जोंपर्यंत या विषयाचें वा सत्याचें पूर्ण ज्ञान प्राप्त करून घेऊन सार्वजानिक मतप्रेरणा तयार होत नाहीं किंवा पुढें येत नाहीं तोंपर्यंत लोकशाहीवादाचेंही सुरक्षिततेच्या दृष्टीनें पुढें पाऊल पडणार नाहीं.

सारांश, आमच्यापैकीं कित्येकांना अजून कम्युनिस्ट खरोखर काय करीत आहेत याबद्दल कांहींच माहिती नाहीं कारण पोलादी पडद्याच्या अस्तित्वापूर्वीपासून चालत आलेल्या पाश्चिमी पत्रकारांच्या संवयी अद्याप कायम आहेत. कम्युनिस्टांच्या गुलाम राष्ट्रांतील सर्व विकासाकडे स्वतंत्र राष्ट्रांच्या दृष्टीनें बघितलें जातें. सर्व गुलाम युरोप एक न मानतां बातम्या देणाऱ्या आमच्या एजन्सी संस्था पोलंडची बातमी हंगेरीची बातमी याच स्वरूपांत अजून बातम्या पाठवीत असतात. परंतु सोव्हिएटमधील कम्युनिस्ट पूर्व युरोपकडे स्वतंत्र राष्ट्रें म्हणून पहात नाहींत; सबंध पूर्व युरोपांत ते एकाच नमुन्याचीं कारस्थानें, एकाच नमुन्याच्या योजना व एकाच नमुन्याच्या कार्यपद्धति अमलांत आणीत आहेत. सर्व गुलाम युरोपसाठीं त्यांची एकच योजना आहे. आणि ही योजना म्हणजे जागतिक सोव्हिएटीकरण योजनेचें प्रतिस्वरूप अथवा तिची पूर्वतयारी आहे, असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

पश्चिमी पत्रकारांच्या संवयीप्रमाणें पूर्व युरोपच्या रशियामय बनलेल्या या जंगलांचें वर्णन न करतां गुलाम राज्यांतील वृक्षांचें वर्णन त्यांनीं दिलें पाहिजे. सर्व गुलाम राज्यांना एक मानून पूर्व युरोपांतलि बातम्यांचा परस्पर संबंध लावून त्यासंबंधीं लिहिलें पाहिजे. रुमानिया किंवा चेकोस्लो-व्हाकियाच्या स्वतंत्र कम्युनिस्ट कार्यसंस्था यावर कोणत्याही प्रकारें प्रकाश टाकूं शकणार नाहींत. कारण गुलाम युरोपच्या स्टॅलिनवादी कार्यसंस्था व या संस्थांत अत्यंत साधर्म्य आढळतें. इतकेंच नव्हे तर या स्टॅलिनवादी कार्यसंस्थांच्या प्रतिस्वरूपच आहेत असें म्हणायला हरकत नाहीं.

पूर्व युरोपचें सोव्हिएटीकरण कशा प्रकारचें आहे तें दाखवून देणें हें या पुस्तकाचें उद्दिष्ट. कम्युनिस्टांनीं धाकदपटशाच्या जोरावर आपल्या विजय-पद्धतींचा कसा विकास घडवून आणला; या त्यांच्या कार्यपद्धतींना भौगोलिक-दृष्ट्या कोणतेंही बंधन कसें राहूं शकणार नाहीं; या पद्धति शेवटीं पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येक विभागांत कशा तऱ्हेनें अमलांत आणल्या जाण्याची शक्यता आहे व आणल्याही जातील, आणि सरतेशेवटीं या सर्व कार्य-

पद्धतीचा आपल्या दृष्टीनें काय अर्थ आहे ? आपण त्यांच्याकडे कोणत्या दृष्टीनें बघितलें पाहिजे ?

या सर्व प्रश्नांचीं उत्तरें शोधण्यासाठीं अठरा महिन्यांचा कालावधि लागला. हाच या पुस्तकाचा आधार. ज्या सत्यांचा मीं शोध घेतला त्यांच्या वारंवार वाचनानें मी अत्यंत स्तंभित झालों. वास्तविक १९४५ सालानंतर मी पोलादी पडद्यामागच्या सर्व घटनांचें बारकाईनें निरीक्षण करीत आलों. पण आज मी जें हें पुस्तक लिहीत आहे त्याबद्दल मात्र जर आपण असें म्हणालांत कीं, ' आम्हाला पूर्वी माहीत नव्हती अशी एकही गोष्ट या पुस्तकांत आढळली नाहीं" तर मात्र मला आजपर्यंतच्या माझ्या वाचनांमुळें कधींही वाटलें नाहीं इतकें आश्चर्य वाटेल.

न्यूयॉर्क शहर<br>जानेवारी १९५२

—लीलँड स्टोव

रूसी साम्राज्यवादाच्या टांचेखालील युरोपमधील देशांच्या परिस्थितीचं हें वास्तव चित्रण आहे. पोलादी पडद्यामागील देशांतील प्रत्यक्ष अनुभवांचे आंकडेवारी देऊन सत्यकथन केलं आहे

# अनुक्रमणिका

# जगांतील मोठ्यांत मोठें कारस्थान : १ :

" प्रत्येकाला गुलाम कसें बनवतां येईल," हें सध्यांच्या काळचें एक अत्यंत शोकान्त नाटक आहे. हें मॉस्कोंत लिहिलें गेलें, सोव्हिएट रशियनांनीं त्याची निर्मिती व दिग्दर्शन केलें; आणि आतां सबंध पूर्व युरोप व युरोपांतील गुलाम राष्ट्रांच्या रंगभूमीवर नऊ करोड पात्रांच्या मदतीनें हें नाटक खेळलें जात आहे.

या नाटकाच्या रंगीत तालमीचे प्रयोग आतां लौकरच संपुष्टांत येणार आहेत. क्रेमलिनच्या मानदंडाबरहुकुम हें नाटक आणखी कांहीं वर्षांत अक्षरशः परिपूर्ण होईल. याच्या रंगीत तालमी व पूर्वी झालेले प्रयोग यांच्यांत अत्यंत बारकाईनें सुधारणा करण्यांत येत असून त्यांच्यावर नवी झिलई दिली जात आहे; त्यांची सफाई करण्यांत येत आहे. " प्रत्येकाला गुलाम कसें बनवतां येईल " या नाटकाचा प्रयोग आतां कोणत्याही क्षणीं पश्चिम युरोप, मध्य पूर्व अथवा एशियाच्या रंगभूमीवर होणें सहज शक्य आहे. या नाटकाच्या कम्युनिस्ट दिग्दर्शकांचा असा पक्का विश्वास आहे व अशी भविष्यवाणी आहे कीं या नाटकाचे सर्व भाषांमध्यें विश्वव्यापी प्रयोग होतील.

आजपर्यंतच्या दुःखान्त नाटकांपेक्षां हें नाटक कित्येक बाबतींत वरचढ आहे. याचें कथानक जगाच्या इतिहासांत महानतम आहे यांत शंका नाहीं. यांच्यांत शेक्सपियरच्या सर्व नाटकांपेक्षां जास्त प्रमाणांत खून, मारामाऱ्या आणि लूट-दरोडेखोरी आहे, अधिक अत्याचार आणि छळ आहे, अधिक शौर्य आणि अधमपणा आहे, अधिक विटंबना आणि हृदयविदारकता आहे. विश्वव्यापी प्रयोगांसाठीं याचें एक वेगळेंच स्वरूप तयार केलें गेलें आहे. .

सोव्हिएट कम्युनिझम जगांतील आजपर्यंतच्या सर्व कारस्थानांतील एक मोठ्यांतलें मोठें कारस्थान आहे असें म्हणणें म्हणजे निवळ अलंकारिक भाषा वापरणें नव्हे. प्राचीन युगांत कोणत्या तरी भावी विजेत्यानें, प्रत्येक महाद्वीपांत, जगांतील बहुधा प्रत्येक देशांत, स्वदेशाच्या शत्रूंना मदत करणाऱ्या पंचमस्तंभीयांची संघटना केलेली आढळेल काय ? असा कोणता शिकंदर किंवा सीझर होता, असा कोणता चिंगीजखां, नेपोलियन किंवा हिटलर होता कीं ज्यानें करोडो परदेशी नागरिकांना आपला हुकुम पाळायला आणि स्वदेशाशीं विश्वासघात करायला लावलें असेल ? विदेशी राज्यांत आपल्या कारस्थानी सहकाऱ्यांच्या दलांना योग्य प्रकारें शिक्षण व आपल्या पद्धतींच्या दीक्षा देण्यासाठीं ज्यानें तीस वर्षांपेक्षां जास्त काळ घालवला अशा एका तरी कारस्थानी पुरुषाचें चरित्र भूतकाळच्या इतिहासांत लिहिलें गेलें आहे का ? पूर्व युरोपांत आज नऊ करोड जनतेला प्रत्यक्ष युद्ध न करतां, एकही गोळी न झाडतां किंवा एकही बॉंब न टाकतां गुलाम बनवण्यांत आलें. असें आजपर्यंत कधीं घडलें होतें का ? ही जादू कांहीं न्यारीच आहे, आणि सोव्हिएट कम्युनिस्टच या जादूचे प्रयोग आगळ्या पद्धतीनें करूं शकले आहेत.

हें महान् कारस्थान आपला विस्तार आणि व्यवस्था या दोन गुणांत अतुलनीय आहे, आणि म्हणूनच त्याची जराशी कुठें चुणुक दिसली, जरासा धागादोरा मिळाला तरी देखील तें प्रत्येक स्वतंत्र समाजाला भयावह आहे. हें कारस्थान कसें आहे व काय करण्याचा त्याचा इरादा आहे हें पाहण्याचें एकच ठिकाण आहे, आणि तें म्हणजे गुलाम युरोप. कारण याच ठिकाणीं स्टॅलिनवाद्यांना आजपर्यंत एक आगळी सफलता प्राप्त झालेली आहे आणि इथेंच सोव्हिएट विश्वविजयाचें कार्यतंत्र परिपक्व बनवलें जात आहे. ज्या तंत्रानें अधा युरोप गुलाम बनला त्याच तंत्रानें राहिलेल्या साऱ्या युरोपला गुलाम बनवण्याची क्रेमलिनला आशा आहे. याच पद्धतींनीं पश्चिम युरोपीय जनता, उत्तर अमेरिकेचे लोक, दक्षिण अमेरिकेचे लोक आणि इतर सर्व स्वतंत्र लोकांना गुलाम बनवणें शक्य आहे. पोलादी पडद्यामागचा युरोप म्हणजे कम्युनिझमच्या द्वारा विश्वविजय करण्याच्या नाटकाची रंगीत तालीम ! दुसरें कांहीं नाहीं !

**आजपर्यंत पूर्व युरोपांत सोव्हिएट कम्युनिस्टांनीं काय काय केलें आहे ?**

त्यांनीं पूर्व युरोपीय देशांना क्रेमलिनचे आर्थिक गुलाम बनविलें आहे. त्यांच्या संपूर्ण अर्थव्यवस्थेचें सोव्हिएटीकरण झालें आहे. सोव्हिएट शक्तीची वाढ व्हावी यासाठींच त्यांचें उत्पादन व राष्ट्रीय साधनें उपयोगांत आणलीं जात आहेत.

त्यांनीं तान्ह्या मुलापासून ते म्हाताऱ्या कोताऱ्यांपर्यंत, मजूर आणि स्त्रिया, राव आणि रंक, शेतकरी आणि कवि, अध्यापक आणि प्रचारक, संगीतज्ञ आणि अंत्यविधि करणारे यांपैकीं प्रत्येक व्यक्तीच्या जीवनावर नियंत्रणें घातलीं असून त्यांचें लष्करीकरण केलें आहे.

प्रत्येक धर्ममताला त्यांनीं दडपून टाकलें आहे. आणि क्रेमलिनच्या राजकीय उद्दिष्टांनुसार धार्मिक संस्थांचीं रूपांतरें करण्याचा त्यांनीं सपाटा चालवला आहे.

दहा लाखांपेक्षां जास्त नागरिकांना त्यांनीं तुरुंगांत अगर सक्तीच्या मजूर छावण्यांत डांबून ठेवलें आहे. आणि राहिलेल्या कित्येक लाख मजुरांना गुलाम बनवून डांबून ठेवण्याच्या आपल्या उद्दिष्टपूर्तीसाठीं या छावण्यांचा ते अधिकाधिक विस्तार करीत आहेत.

त्यांनीं सर्व प्रकारचा राजकीय विरोध नष्ट केला आहे. आणि आतां लोकांना हळूहळू उपाशी मारून, मोठ्या प्रमाणावर त्यांना आपल्या घरांपासून दूर खेंचून, तसेंच देहान्त शासनाच्या आपल्या सार्वत्रिक 'न्याया'चा अवलंब करून उच्च व मध्यमवर्गीयांना नष्ट करण्याच्या मार्गाला लागले आहेत.

त्यांनीं शिक्षणाला कम्युनिस्ट सिद्धान्ताच्या प्रसाराचें एक अधिकृत साधन बनवून त्याला विकृत स्वरूप आणलें आहे.

पूर्व युरोपीय राष्ट्रांची संस्कृति, इतिहास, साहित्य, विज्ञान, कला व परंपरा यांचें त्यांनीं 'रशियनीकरण" चालवलें आहे.

पूर्व युरोपच्या तरुण पिढीला—२१ वर्षांच्या आंतील जवळ जवळ करोडो तरुणांना—कम्युनिस्ट बनवण्यांत त्यांनीं बरेंच यश मिळवलें आहे. आणि ह्या तरुणांची संख्या वर्तमान लोकसंख्येच्या शेंकडा वीस टक्के आहे.

तात्पर्य इतकेंच, कीं पूर्व युरोप सोव्हिएटीकरणाच्या सर्वांत वरच्या पायरीवर जाऊन पोंहोंचला आहे. १८४५ नंतर कांहीं वर्षांतच पोलादी पडद्यामागचे कांहीं स्वतंत्र प्रवृत्तीचे देश क्रेमलिनच्या कारस्थानी लोकांच्या जाळ्यांत पूर्णपणें सांपडून असे कांहीं बदलले आहेत कीं आतां त्यांना ओळखणें देखील कठीण आहे. तेव्हां या अत्यंत आश्चर्यकारक कारवायांचा अर्थ तरी काय? खरी गोष्ट अशी कीं पोलंड, चेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, रुमानिया, बल्गेरिया, अल्बानिया आणि पूर्व जर्मनी हे देश अनधिकृतरीत्या सोव्हिएट संघांत विलीन करण्यांत आले आहेत. वास्तविक आज सोव्हिएट संघ बर्लिन आणि व्हिएन्नापर्यंत पसरला आहे. तुर्कस्तानच्या शहांनीं लष्करी आक्रमणानीं आपल्या विजयाचें जें सर्वोच्च शिखर गांठलें होतें त्यापेक्षां कितीतरी जास्त प्रमाणांत आज लाल रशियनांनीं युरोपवर आपला अधिकार प्रस्थापित केला असून ते त्या भागाचे शासनकर्ते बनले आहेत. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं सोव्हिएटीकरण केलेला युरोप, अमेरिका व ब्रिटिश कॉमनवेल्थच्या स्वातंत्र्याइतकाच नॉर्वे, इटली व फ्रान्स यांच्या स्वातंत्र्याला घातुक बनलेला आहे. आणि आज मुख्यत्वेंकरून कम्युनिस्ट बनलेल्या पूर्व युरोपच्या नव्या धोक्याच्या खंदकाचें आम्हांला नीट परीक्षण व निरीक्षण केलें पाहिजे. पण त्याआधीं एक यापूर्वीच विचारांत घेण्यासारखा प्रश्न उपस्थित होतो :

स्टॅलिनवाद्यांनीं सहा राष्ट्रांना इतक्या थोड्या अवधींत आपल्या कबजांत कसें घेतलें ?

मला वाटतें कीं याचें उत्तर म्हणजे कम्युनिस्टांचें सामर्थ्य व त्यांच्या कार्यपद्धतीचें सर्वसामान्यपणें केलें जाणारें चुकीचें अथवा कमी मोजमाप. १९४६ मध्यें या बाबतींत मी देखील चुकत होतों हें कबूल करतों. पोलादी पडद्यामागच्या देशांत पांच महिने राहिल्यानंतर क्रेमलिनच्या दूरदृष्टि

उद्दिष्टांबद्दल माझ्या मनांत यत्किंचितही किंतु राहिला नव्हता हें खरें. पण तरीदेखील स्टॅलिनवाद्यांच्या कार्यपद्धतींची गति मीं फार कमी अजमावली होती. त्या वर्षी उन्हाळ्यांत बुडापेस्ट येथें माझी एका अधिकाऱ्याशीं गांठ पडली. त्यांना रशियनांच्या सामर्थ्याचें पुरेपूर आकलन झालें होतें. फादर इस्तवान बालोग त्यावेळीं राज्यांतले एक उपमंत्रि होते. त्यांच्याइतका प्रखर राजकारणी, बुद्धिमान व लोकोत्तर मनुष्य यापूर्वी माझ्या पाहण्यांत आला नव्हता. ते आपल्या हिणकस विनोदाबद्दल फार प्रसिद्ध होते. आणि आपल्या पूर्वीच्या विचारांना पूर्णपणें तिलांजलि देऊन आज ते मॉस्कोच्या सेवेला वाहिलेले आहेत यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

" सोव्हिएटमंडळी म्हणजे नवीन प्रकारचे सभ्य लोक आहेत. ते एका नव्या शासकवर्गाचे प्रातिनिधि आहेत. शेवटीं साऱ्या युरोपभर आपलें वर्चस्व प्रस्थापित केल्याशिवाय ते राहणार नाहींत. " बालोग म्हणाले.

" पण अर्ध्या युरोपची संघटना करूं शकण्याइतके ते कुशल आहेत का ? " मी शंका प्रदर्शित केली.

प्रथम त्यांच्या लंबोदरावर एक माहितीपूर्ण हास्याची लकेर उठलेली दिसली आणि नंतर त्यांनीं ठासून सांगितलें, " फार कुशल व्हायची कांहीं त्यांना गरज नाहीं. ते सगळा युरोप गट्ट करतील. "

आज गुलाम असलेल्या युरोपला घशाखालीं घालायला पांच वर्षांपेक्षां जास्त काळ लागला नाहीं. सात किंवा आठ वर्षेंसुद्धां लागलीं नसतील असा, मला जितकी माहिती आहे त्यावरून, मी अंदाज बांधला आहे. या अल्पकाळांत रशियन कम्युनिस्टांनीं स्वतःच्या कुशलतेची अशी कांहीं चमक दाखवली कीं त्याची खुद्द बालोगना देखील कल्पना नसेल ! परंतु पश्चिमेकडे कुशलतेचा जो अर्थ समजला जातो ती ही कुशलता नव्हे ! हिचा तंत्रसंबंधी व्यवस्था व वस्तूंचें उत्पादन या गोष्टींशीं काडीमात्र संबंध नाहीं. आपल्या पोलिसी राज्याचा विस्तार करण्यांत व गुलाम राज्याच्या पद्धतींचें सगळीकडे लोण

पोंचवून त्यांचा विकास करण्यांत हे नात्सींपेक्षांही कुशल आहेतसें दिसून आलें. पण ही कुशलता म्हणजे काय व कशी आहे, हें समजणें आमच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे.

जर्मनीच्या अगदीं स्वर्ग गांठणाऱ्या खाकी झोटिंगशाहीपेक्षांही ही लाल झोटिंगशाही अधिक विश्वव्यापी धोका कां निर्माण करीत आहे हें या कुशलतेच्या स्वरूपावरून दिसून येईल. १९४० मध्यें डेन्यूबियन देशावर जर्मनीनें जें वर्चस्व प्रस्थापित केलें त्याकडे पाहतां या दोन झोटिंगशाहीं-मधला फरक जास्त स्पष्टपणें माझ्या नजरेसमोर येतो.

बाह्य देखाव्यानें देशामागून देश जिंकणाऱ्या विजेत्यांप्रमाणें रशियन कम्युनिस्ट आले नाहींत. त्यांच्या क्रांतीच्या कवायती आणि बॉम्बगोळ्या-प्रमाणें स्फोटक अशा दोषारोपांचें लक्ष्य म्हणजे पूर्व युरोपीय राष्ट्रांच्या सामाजिक, आर्थिक व राजनैतिक व्यवस्थेचा पाया. या राष्ट्रांच्या व्यवस्थेचा हा मूळ पायाच उध्वस्त करून तिथें नवीन सांचा बनवायची त्यांची आकांक्षा होती, आणि हें काम कशा तऱ्हेनें करायला हवें हें स्टॅलिनवाद्यांना आपल्या दीर्घ अनुभवाच्या व शिक्षणाच्या योगानें पूर्णपणें माहीत झालें होतें. सुरवातीला कांहीं महिने कपटनीति व लपूनछपून चाललेल्या चतुर हिकमतींनंतर "स्वातंत्र्य देणाऱ्या" कम्युनिस्टांना शासकवर्गाची खुशामत करण्याची काय गरज? संपूर्ण सत्ता काबीज करणें हें त्यांचें उद्दिष्ट. मॉस्कोमध्यें शिक्षण घेतलेल्या व पढवल्या गेलेल्या कम्युनिस्टांना या कामा-साठीं निश्चित आदेश देण्यांत आले होते. आणि हे आदेश जगांतील कोणत्याही भागांत आज लागू करण्यासारखे आहेत--९ मे १९४१ रोजीं हेच आदेश कॉमिंटर्ननें युगोस्लाव्हियांत टिटोला पाठविले होते. या तारखेला फार महत्त्व आहे. हिटलरनें रशियावर आक्रमण करण्यापूर्वी फक्त सहा आठवड्यांची ही गोष्ट नसून युरोपांतील युद्धसमाप्तीपूर्वी चार वर्षांची ही गोष्ट आहे. पण आज देखील ही

**कोणत्याही परकी देशात कम्युनिस्टांतर्फ केल्या जाणाऱ्या सत्ताहरणाची योजना आहे.**

कॉमिन्फॉर्मनें टिटोला पाठवलेल्या आदेशांपैकीं प्रमुख भाग खालीं जशाच्या तशा स्वरूपात उद्धृत करण्यांत येत आहे[१] :

१. विश्वक्रांतीच्या रोखानें नवीन निर्णयात्मक पाऊल टाकण्याचा आतां समय येऊन ठेपला आहे.

( क ) खरी लोकशाही स्थापन करण्यासाठीं नानाविध उपायांच्या एकत्रित गुंफलेल्या एकाद्या मालिकेप्रमाणें " कम्युनिस्ट विश्वक्रांति " लोकांपुढें आली पाहिजे.

( ख ) ज्या देशांची परिस्थिति क्रांति करण्यालायक बनलेली आहे अशा देशांना क्रांतिमार्गावर लौकर पुढें पाऊल टाकण्यासाठीं सोव्हिएट संघाच्या द्वारें कांहीं तात्कालिक सवलती मिळणें आवश्यक आहे.

( ग ) ज्या देशांत क्रांतीची तयारी चालू आहे त्या देशाचें संपूर्ण सत्ताहरण होईपर्यंत कम्युनिस्ट पक्षानें तिथल्या स्वदेशप्रेमी व धार्मिक क्षेत्रांशीं चांगले संबंध राखावे; त्यासाठीं मोठ्या सावधगिरीनें प्रयत्न करावे. देवळांविरुद्ध भेदभाव ठेवूं नये......राष्ट्रीय परंपरेचा आदर राखावा;......जरूर पडेल त्या त्या ठिकाणीं चर्चच्या प्रतिनिधींना क्रांतीची तयारी व अंतिम विजयामध्यें सहकारी होण्याची संधि देण्यांत यावी. नंतर राजकारणावर बसलेला धार्मिक मतांचा पगडा किती प्रमाणांत दूर करावयाचा हें त्या प्रतिनिधींच्या संख्येवरून निश्चित ठरवण्यांत यावें.

( घ ) वर्तमानपत्रांचा उपयोग.........

( च ) सत्ताहरणानंतर ताबडतोब केंद्रीय समिती एक नवीन सरकार स्थापन करील. यांत जनतेचे प्रतिनिधी असतील; आणि हें सरकार लोकशाही स्वरूपाचें आहे असें दिसून येईल.

---

[१] युगोस्लाव्ह कम्युनिस्ट केंद्रीय समितीचें अधिकृत पत्र ' कम्युनिस्ट ' मध्यें सत्ताहरणासंबंधींच्या इतर कागदपत्रांसहित हें प्रकाशित झालें होतें.

( छ ) नव्या शासनपद्धतीच्या विरोधकांना शक्य तितक्या लौकर मार्गातून दूर केलें पाहिजे. पण हें काम लोकशाही पद्धतीनें व्हावें—एका तात्पुरत्या न्यायालयासमोर किंवा जनतेच्या न्यायालयासमोर या लोकांवर खटला चालवण्यांत यावा. जनतेच्या न्यायालयांत पक्षाचा एक परिचित सभासद अथवा दोन गुप्त सभासद किंवा पक्षाबद्दल सहानुभूति बाळगणारे लोक असले पाहिजेत.

२. कॉमिंटर्नहून आदेश येईपर्यंत त्या देशाला सोव्हिएट संघांत सामील होण्यास सांगूं नये...

३. पक्षाशीं विश्वासघात करणारांबद्दल पक्षाला प्रथम सूचना देण्यांत यावी आणि नंतर खटला न चालवतांच त्यांना नष्ट करावें. कम्युनिस्ट क्रांतीच्या विरुद्ध कोणत्याही प्रकारचा विश्वासघात केल्यास त्याबद्दल देहान्त प्रायश्चित्त ठरलेलें आहे.

४. "वर्ग-शत्रु" या नांवानें खालील समुदाय ओळखले जातात; राष्ट्रवादी अथवा धार्मिक चरित्रांच्या सैद्धान्तिक आंदोलनाचे सभासद, धर्मप्रचारक, पोलीस विभागाचे सभासद, अधिकारी, मुत्सद्दी व सरकारी नोकर—अर्थात उपरिनिर्दिष्ट समुदाय जोंपर्यंत क्रांतिकारी सेनेच्या पक्षांत सामील होण्यास नकार देतील तोंपर्यंतच ते 'वर्ग-शत्रु' म्हणून ओळखले जातील; राजघराण्यांतील सर्व मंडळी आणि क्रांतीची तयारी व प्रत्यक्ष कार्य यांना विरोध करणारे म्हणून जे जे कोणी आहेत अशा सर्व व्यक्ति वर्गशत्रु होत.

५. सत्ताहरणानंतर राजकीय निधिखेरीज खालीं दिलेल्या सर्व ठिकाणांहून येणाऱ्या पैशांची वांटणी किंवा तिचा विनियोग करणें पक्षाच्या हातांत राहील. 'वर्गशत्रु'—ज्यांना देहान्त शासन मिळालें आहे अशांची संपत्ति किंवा अशांपैकीं कांहींची जप्त केलेली मालमत्ता......विरोधी आंदोलनें व संस्था यांची मालमत्ता, चर्चे, शासनकर्ते राजघराणें व युद्धांत फायदा उठवणारे लोक या सर्वांची संपत्ति पक्षाच्या ताब्यांत जाईल.

असें आहे या जगांतल्या महानतम कारस्थानाचें स्वरूप! आंतरराष्ट्रीय विश्वासघात व परराष्ट्रांवरील विजयाबद्दलची कॉमिंटर्ननें स्वतः बनवलेली सूचि हा या विधानाचा सबळ पुरावा आहे!

कुटिलता, क्रूरता आणि मानवद्वेष या बाबतींत कोणत्याही युगांतील राजकीय गुंडांचें दल या कारस्थानाची आजपर्यंत बरोबरी करूं शकलेलें नाहीं.

पोलादी पडद्यामागच्या प्रत्येक देशांत कॉमिंटर्नच्या आदेशांच्या प्रत्येक विभागाचें फार पूर्वीपासून पालन करण्यांत आलें आहे. आणि याचा परिणाम असा झाला कीं गुलाम युरोप देशांचें क्रेमलिनच्या प्राथमिक विदेशी शिक्षण केंद्रांत रूपांतर झालें.

परंतु भूप्रदेश गिळंकृत करीत जाण्याच्या नात्सींच्या उन्मत्त विजयपद्धति आणि कम्युनिस्टांच्या पद्धति यांत आणखी एक उल्लेखनीय फरक आढळतो. केवळ स्थावर-जंगम मालमत्ता असलेले बडे भूप्रदेश जिंकणें एवढेंच कम्युनिस्टांचें उद्दिष्ट नव्हे, तर...आणि याच पुढच्या चित्रांत आपला समावेश होतो एवढें समजून राहा !

## कम्युनिस्ट लोकांना झपाटतात—सर्व लोकांना—

कोणी कितीही छोटा किंवा उपेक्षित असो, कितीही लहान वयाचा असो अगर मोठा असो, शृंखलाबद्ध करण्यास, नियंत्रणांच्या पट्ट्यांनीं बांधण्यास, दरिद्री बनवण्यास किंवा त्याचा सर्व नाश करण्यास त्याच्या या लघुत्वाची अगर थोरत्वाची कांहीं आडकाठी येत नाहीं. तुम्हांला दोन पाय आहेत ना ? आणि तुम्ही त्या दोन पायांवर सरळ चालूं शकतां ना ? मग बस्स ! वरच्या कोष्टकांत तुम्ही बसूं शकतां. फोर्ड मोटरच्या कारखान्यांत धातूंच्या तुकड्यांकरवीं जें काम करवून घेतलें जातें त्याच तऱ्हेनें क्रेमलिनच्या कारखान्यांत माणसांना वागवलें जातें. स्टॅलिनवाद्यांनीं एखाद्या राष्ट्रांतील जनतेला संपूर्ण वश करून घेतलें कीं आपोआपच त्या लोकांची खाजगी व राष्ट्रीय मालमत्ता यांच्या हातीं पडते. बोल्शेव्हिकांच्या कुटिल कारस्थानाची छाया प्रत्येक ठिकाणीं प्रत्येकावर पसरत चालली आहे. पृथ्वीवरची सर्व प्रजा व पृथ्वी या सर्वांवर वर्चस्व प्रस्थापित करण्याचें त्यांचें ध्येय आहे—हळूहळू एकेक प्रदेश घेत घेत सर्वांना गुरफटून टाकण्याचा या कारस्थानाचा कार्यक्रम लौकर किंवा उशीरा पण केव्हांतरी आपल्यापर्यंत येऊन पोहोंचणार हें खास !

जगांतील महानतम कारस्थानांच्या महान् रहस्याचा वरील गोष्टींशीं अगदीं सरळ संबंध पोंहोंचतो. या कारस्थानांतून आपण बचावलों आहों असें आपण, मी किंवा एकाद्या स्वतंत्र देशाच्या एकाद्या नागरिकानें काय म्हणून समजावें? कम्युनिस्ट गुलाम राज्याला शेवटीं कांहीं झालें तरी आम्हांला दडपण्यांत यश येणार नाहीं अशी आम्ही स्वतःची समजूत कां करून घ्यावी? कोणतेंही पश्चिमी राष्ट्र पूर्व युरोपियनांपेक्षां जास्त स्वदेशप्रेमी, जास्त साहसी, अगर जास्त व्यक्तिवादी आहे असें थोडेंच म्हणतां येणार आहे! कारण गेल्या कित्येक शतकांतल्या कित्येक लढायांत पूर्व युरोपियनांनीं आपल्या या गुणांची प्रचीति आणून दिलेली नाहीं का? दुसऱ्या जागतिक महायुद्धानंतर पूर्व युरोपियनांइतकी स्वातंत्र्याची लालसा अगर लोकशाही स्वयंशासनाची अभिलाषा दुसऱ्या कोणांत तरी आढळून आली होती का? तरी देखील एका अत्यंत कपटी व क्षुधार्त अजगरानें त्यांना गिळून टाकलेंच ना! सोव्हिएट कम्युनिस्टांनीं बघतां बघतां नऊ करोड जनतेला गिळून टाकलें तेव्हांच इतर जगाला कशा तऱ्हेनें गिळायचें याची कला त्यांना अवगत असल्याचें त्यांनीं प्रत्ययास आणून दिलें. त्यांना फक्त जास्त वेळ हवा, अनुकूल परिस्थिति हवी आणि त्यांना ज्यांची शिकार करावयाची आहे ते लोक सतत आत्मसंतुष्ट असायला हवेत. काळाचा फायदा ते घेत आहेत. आपल्याला अनुकूल अशी व योग्य परिस्थिति निर्माण करण्यांत ते दक्ष आहेत आणि भौगोलिक परिस्थितीमुळें आपण सुरक्षित आहोंत या भ्रमांत असलेल्या आंधळ्या, आत्मसंतुष्ट पश्चिमी नागरिकांच्या या भ्रमाची त्यांना मदत मिळत आहे.

आमची सर्वांची एकाच स्वरूपाची भीतिग्रस्तता, आमचा अनिश्चितपणा, आम्ही देत असलेले अधिकाधिक कर आणि वस्तूंच्या वाढत्या किमती, आम्हांला मिळणाऱ्या वस्तु व सौख्यसाधनांची कमतरता, आणि आमचें अधिकाधिक खालच्या पातळीवर घसरणारें राहणीचें मान—या सर्व गोष्टींचा, पूर्व युरोपाचें सोव्हिएटीकरण करण्याच्या प्रांतांत रशियानें चालवलेल्या प्रगतीशीं सरळसरळ संबंध पोंहोंचतो. रशियानें चालवलेल्या या दुःखी देशाच्या गिळंकृतीचा आम्ही फार मोठी आर्थिक, भौतिक व मनोवैज्ञानिक

किंमत चुकती करीत आहोंत. परंतु सर्वांत विशेष म्हणजे गुलाम युरोपवर कम्युनिस्टांनीं जो विजय मिळवला तो विजय म्हणजे पश्चिमी देशांना एक धोक्याची सूचना आहे.

असो. अशा तऱ्हेनें सोव्हिएट कम्युनिझम आंत घुसून सुरुंग पेरीत आहे. शासन व शासनयंत्राच्या प्रत्येक अवयवावर आपला अधिकार प्रस्थापित करीत आहे. समाजांतल्या प्रत्येक विभागाचें संघटन करीत आहे. स्वदेशप्रेम, कुटुंबश्रद्धा, व्यक्तिगत प्रामाणिकपणा, आणि नैतिकता यांना विकृत स्वरूप आणून देत आहे. बुद्धीला जडता आणून अंतःकरणें विषमय करून सोडीत आहे. दास-राज्यासाठीं एका राष्ट्राचीं संपूर्ण मानवी व भौतिक साधनें उपयोगांत आणीत आहे. आपला विस्तार करण्याचें, विजय मिळवून आपलें आसन बळकट व स्थिर बनविण्याचें स्टॅलिनवादाचें तंत्र हें अशा प्रकारचें आहे.

पण या सर्व गोष्टी खरोखर कम्युनिस्ट कशा तऱ्हेनें प्रत्यक्षांत आणूं शकतात ?

सोव्हिएट विजयाच्या तंत्राबद्दल आजपर्यंत फारच कमी लिहिलें गेलें आहे: हें एक नवलच म्हणायचें ! आमच्या आजच्या जमान्यांतल्या जर एकाद्या विषयाचें कमी अध्ययन झालें असेल व तो कमी समजावून दिला गेला असेल तर तो विषय हाच एक होता ! क्रेमलिनचे कारस्थानी लोक एका विभागानंतर दुसऱ्या विभागांत ज्या तऱ्हेनें व जिथें काम करतात तिथें व त्याच तऱ्हेनें या विषयाचें समीक्षण झालें पाहिजे. कम्युनिस्ट आपलें काम ज्या ठिकाणाहून सुरू करतात त्याच ठिकाणाहून या समीक्षणाला सुरुवात झाली पाहिजे. हें ठिकाण म्हणजे राष्ट्राच्या संपूर्ण सामर्थ्याचें उगम-स्थान असलेलें सैन्य व गुप्त पोलीस-दल.

●●●

# युद्धाची गुप्तपणें तयारी : २ :

आधुनिक युगांत इतर सर्व जगाला पत्ताही लागू न देतां आपल्या सरकारनें हजारों, लाखों लोकांना युद्धाला तयार करून एका सामर्थ्यशाली आगळ्या सैन्याचा सांचा तयार केला या गोष्टीचा सोव्हिएट कम्युनिस्टांना फार गर्व आहे. जून १९५० मध्यें कोरियन युद्ध सुरू झाल्यापासून १९५१च्या अखेरीपर्यंत मॉस्कोनें पोलादी पडद्यामागच्या आपल्या आधीन राज्यांतलें सैन्य दुप्पट किंवा तिप्पट वाढवून एकंदर जवळजवळ पंधरा लाख सैनिक-शक्ति तयार केली होती. युद्धाची अशा तऱ्हेनें गुप्तपणें व सफलतापूर्वक विस्तृत तयारी झाल्याचें सामान्यतः दुसरें कोठेंही उदाहरण आढळत नाहीं. तुलनात्मक दृष्टीनें पाहतां कांहीं अगदीं सामान्य संघटना दिसतात. पण त्याच शीघ्रगतीनें क्रेमलिनच्या " पूर्व युरोपीय सैन्य " बनूं लागल्या आहेत, आणि अत्यंत धोका निर्माण करणाऱ्या लढाऊ सत्यशक्तींचें स्वरूप धारण करीत आहेत. १९५३ पर्यंत " शीघ्र "—युद्धांत ताबडतोब माघार घेणार नाहींत अशा स्वरूपाचें—सैन्य पश्चिम युरोपांत स्थापन करण्याचा आयसेनहॉवर पाया घालीत होते त्यावेळीं पूर्व युरोपची अशा तऱ्हेची सेना तयार होऊन दोन वर्षे लोटलीं होतीं. पण मॉस्कोच्या मेणाच्या बाहुल्यांप्रमाणें असलेल्या सैन्याच्या विस्ताराबरोबर त्याचें प्रखर सोव्हिएटीकरणही चालूं होतें. सोव्हिएट रशिया व पश्चिमेकडचे देश यांमध्यें शस्त्रीकरणाची जी चढाओढ लागली होती त्यांतला मुळींच उजेडांत न आलेला पैलू म्हणजे सैन्यविस्तार व सोव्हिएटीकरण या दोन्हींचें मिश्रण हा होय. आज गुलाम युरोपांत सोव्हिएट सैन्यांतील अधिकाऱ्यांची निव्वळ संख्याच जास्त आहे असें नव्हे किंवा प्रत्यक्ष त्यांच्याकडून सैन्याचें निर्देशन होतें असेंही नव्हे, तर १९५० सालापूर्वी कांहीं वर्षांपासून हें सैन्य पुनर्संघटनेच्या एका दिव्यांतून जात

आहे. या सैन्यदलाला व सैनिकांना रशियनांच्या पद्धतीनें शिक्षण देण्यांत येत आहे. त्याच तऱ्हेनें त्यांना सुसज्ज बनवण्यांत येत आहे. पोलादी पडद्यामागच्या सहा देशांचें सैन्य व प्राथमिक सैन्यदलांची आज अशी स्थिति आहे. आणि हें सैन्य लौकरच पूर्व जर्मनींचें लाल सैन्य म्हणून प्रकट होणार आहे.

गुलाम राष्ट्रांच्या एकंदर सैनिक सामर्थ्याचें योग्य आकलन कसें होऊं शकेल? प्रत्येक देशांतील पलटणीचें अंदाजी सामर्थ्य आपला देश सोडून आतां बाहेर राहिलेल्या अधिकाऱ्यांना चांगल्या प्रकारें माहीत असतें. १९५१ च्या सुरवातीपासून बल्गेरिया व रुमानियानें निरनिराळ्या वयाच्या सैनिकांचे तीन वर्ग बनवले आहेत. पोलंड, हंगेरी आणि चेकोस्लोव्हाकियानें युद्धाच्या सैनिकी आयुर्मर्यादेंतल्या सैनिकांचे दोन वर्ग कायम ठेवले होते. त्याचबरोबर आणखी एक तिसरा वर्गही होता. पोलंडच्या युद्धआयुर्मर्यादेंतील सैनिक-वर्गांत अंदाजें १,५०,००० सैनिक असतात. त्यावरून सध्यां पोलंडमध्यें ४,५०,००० पेक्षां जास्त सैनिक असावेत हें स्पष्ट होतें. त्याचप्रमाणें कोरियाच्या युद्धानंतर सैन्यांत सामील होण्यासाठीं बोलावण्यांत आलेल्या तात्पुरत्या अधिकाऱ्यांची व सुरक्षित सैनिकांचिही मोजदाद करून त्यांचा या आंकड्यांत समावेश केला पाहिजे.

**पायरी पहिली**—मॉस्कोचा राजनैतिक सामाजिक पंचमस्तंभ १९४५-४६ पर्यंत एम्. व्ही. डी. अधिकारी व स्थानिक "मॉस्कोवाइट" कम्युनिस्ट यांनीं पोलंड, बल्गेरिया, रुमानिया आणि हंगेरी येथील पोलीस विभागांतील व सरकारी मुख्य अधिकारपदावर स्वतःचें एकाधिपत्य प्रस्थापित केलें होतें. प्रत्येक ठिकाणीं कम्युनिस्टच संरक्षण मंत्री व गृहमंत्री होते. आणि ते सैन्य व पोलिस त्यांच्या नियंत्रणाखालीं असत. हीच गोष्ट राष्ट्रीय अर्थ-व्यवस्था, सूचनाविभाग आणि दळणवळण विभागाला लागू पडत होती. बल्गेरियांतील डिमित्रॉफ वगैरे लोकांप्रमाणें हे मॉस्कोमध्यें शिक्षण घेतलेले कम्युनिस्ट पुढारी सोव्हिएट नागरिक असत. रुमानियांत एमिल बॉडेनारस, ॲना पॉकर इत्यादि; हंगेरीमध्यें राकोसी, झोल्टन व्हाज, ऐर्नो गैरो, आणि अशाच तऱ्हेच्या कित्येक व्यक्ति पोलंडमध्येंही होत्या. सत्तेच्या सर्व किल्ल्या

क्रेमालिनच्या प्रतिनिधींच्या हातांत होत्या. आणि त्यांच्या भावी कार्यक्रमांत चेकोस्लोव्हाकिया सामील झालेला होता.

**पायरी दुसरी**—गुलाम सैन्यावर सोव्हिएट कम्युनिस्टांचा कबजा...

रशियनांनीं रुमानिया आणि पोलंडमध्यें एक अत्यंत सफल असा लष्करी पंचमस्तंभ निर्माण केला आहे. रशियांत अडवून ठेवलेल्या युद्धसैनिकांमधून एम्. व्ही. डी.नें दोन कम्युनिस्ट व रुमानियन सैन्यविभाग बनवले.( टयूडर व्लादिमिरेस्क्यू, आणि होरिया क्लोस्काक्रिसन. ) याशिवाय पोलंडचे कॉससुइजको म्हणून एक सैनिकदल आहे. पोलंडचे कम्युनिस्ट जनरल बरलिंग हे या दलाचे सेनापति आहेत. या अति युद्धनिष्णात लाल सेनाधिकाऱ्यांनीं पोलंडच्या जुन्या पदच्युत अधिकाऱ्यांच्या जागा घेतल्या आहेत मॉस्कोच्या मागणीप्रमाणें बरलिंगच्या पोलिश सैनिकांबरोबर काम करणाऱ्या कित्येक हजार रशियन अधिकाऱ्यांना पोलंडचे नागरिक बनवण्यांत आलें आहे. अशा प्रकारें दोन महान् जित सैन्यांना आरंभींच पूर्णपणें ताब्यांत घेतलें गेलें. बल्गेरिया व हंगेरीमध्यें पूर्वींच दीक्षा दिलेले एके काळचे कैदी होतेच. तेव्हां त्या स्थानिक कम्युनिस्टांना लष्करी अनुभव कमी असूनही मुख्य नेतृत्व दिलें गेलें. यानंतर फार मोठ्या प्रमाणांत जुन्या अधिकाऱ्यांची हकालपट्टी सुरू झाली. रुमानियांत १५,००० पेक्षां जास्त, पोलंडमध्यें कमींत कमी ८०००, बल्गेरिया आणि हंगेरीमध्यें जवळजवळ ३०००, याप्रमाणें प्रत्येक देशांतील जुन्या अधिकाऱ्यांना पदच्युत करण्यांत आलें. आणि चेकोस्लोव्हाकियाच्या अधिकाऱ्यांची " शुद्धि " अजून चालूं आहे.

**पायरी तिसरी**—जित सैन्यांत सोव्हिएट अधिकाऱ्यांना घुसविणें...

मेणाच्या बाहुल्यांप्रमाणें जें सैन्य असतें त्यावर दृढ नियंत्रण ठेवणें आवश्यक असतें. नोव्हेंबर १९४९ मध्यें सोव्हिएट मार्शल रकोसोव्स्की यांची पोलंडचे मुख्य सेनापति व संरक्षणमंत्री म्हणून जी नेमणूक झाली ती काय सांगते ? कांहीं दिवसांनीं सोव्हिएट मार्शल कोन्येव यांनीं चेकोस्लोव्हाकियामध्यें पुष्कळ मोठा मुक्काम ठोकला. बुडापेस्टमध्यें हंगेरियन नसलेले आणि रहस्यमय व्यक्ति म्हणून ओळखले जाणारे कम्युनिस्ट " लेफ्टनंट

फील्ड-मार्शल" मिहाली फॉरकॉस (यांचें मूळ नांव फुश्स आहे) हे संरक्षणमंत्री आहेत. प्रमुख सेनाधिकारी "लेफ्टनंट फील्ड मार्शल" बाटा हे तर एकाद्या परदेशी माणसाप्रमाणें हंगेरीयन भाषा बोलतात. बल्गेरियाचे संरक्षण मंत्री लेफ्टनंट जनरल पीटर पांचेव्हस्की यांचें शिक्षण मॉस्कोमध्यें झालेलें असून स्पॅनिश युद्धांत हे प्रत्यक्ष लढले होते. बल्गेरियाचे प्रमुख सेनापति (ऑगस्ट १९५१ नंतर) जनरल आन्तानासोव हे सोव्हिएट नागरिक असून बल्गेरियांतच यांचा जन्म झालेला आहे. कर्नल जनरल बोडनारस यांची युक्राइन ही जन्मभूमि. ते कित्येक वर्षें "मस्कोवाईट" होते आणि सध्यां ते रुमानियाच्या संरक्षण सचिवालयाचे कार्य-संचालक म्हणून काम करतात.

१९४८ पासून, अगदीं देखरेख नसलेल्या एकाद्या धान्याच्या जहाजावर उंदरांची संख्या वाढावी तसा मॉस्कोच्या सैनिकांचा पंचमस्तंभ सतत वाढत आहे. गुप्त हेरांकडून एक विश्वसनीय अहवाल आला आहे कीं "आमच्या पलटणींमध्यें सोव्हिएट अधिकारी अधिकाधिक संख्याभरती केले जात असून लौकरच आमचें सर्व सैन्य रशियनांच्या कबजांत जाईल." गुप्त बातमीदारांकडून असें समजतें कीं पोलिश सैन्यांत ५००० पासून १०,००० पर्यंत, हंगेरीच्या सैन्यांत जवळजवळ २००० आणि बल्गेरियाच्या सैन्यांत अंदाजें ३००० सोव्हिएट अधिकारी काम करीत आहेत. १९५० पासून जित राष्ट्रांतील अधिकाऱ्यांना कार्ययोजना व सामुदायिक नेतृत्वासाठीं रशियन भाषेचें शिक्षण सक्तीचें करण्यांत आलें आहे. जित राष्ट्रसैनिकांवर रशियन लष्करी शब्दावलीच्या ज्ञानाची अधिकाधिक सक्ती करण्यांत आली आहे. त्यांचे गणवेष आणि सैनिकचिन्हें पण पूर्वीचें स्वरूप टाकून रशियन ढंग धारण करीत आहेत.

१९५०–५१ मध्यें जित सैनिकांवर करण्यांत आलेल्या प्रयोगचक्रामध्यें सोव्हिएट प्रमुखाधिकाऱ्यांनीं जें सूक्ष्म निरीक्षण केलें तें कांहीं लपून राहिलें नाहीं. मार्शल मालिनॉव्हस्की वारंवार पोलंड आणि चेकोस्लोव्हाकियाला गेले. मार्शल सोकोलोव्हस्की यांना रुमानिया व बल्गेरिया इथें पाठवण्यांत आलें. याप्रमाणेंच मार्शल बुदेनींना रुमानियाला व मार्शल वोरोशिलॉव्ह यांना

इंगेरीला पाठविण्यांत आलें. जित सैन्यांना सोव्हिएट सैन्याच्या सांखळींत अडकवून टाकण्यांत आलें. त्यांना सोव्हिएट युद्धनीतीमध्यें तरबेज बनवण्यांत आलें आहे. त्यांचे मुख्याधिकारी मात्र बहुतांशीं रशियन आहेत.

या प्रबळ युद्धतयारीचा उद्देश तरी काय ? "लेफ्टनंट फील्ड-मार्शल" बाटा यांनीं आपल्या दैनिक निर्देशिकेंत (नोव्हेंबर १९५०) या युद्ध-तयारीच्या उद्देशांची स्पष्ट घोषणा केली होती : सोव्हिएट युद्धनीतीचा प्रसार करणें आणि प्रत्येक रंगरूटाला पक्का कम्युनिस्ट बनवणें—"पक्का कम्युनिस्ट म्हणजे त्याची केवळ एकच आणि अशीच इच्छा असली पाहिजे कीं आपण महान् सोव्हिएट सैन्यांतील योद्ध्यांचे अनुयायी बनावें—" ही गोष्ट क्रेमलिनच्या आणखी एका आदेशाच्या खरेपणाचा सबळ पुरावा आहे. तो आदेश असा—

## सोव्हिएट शोषणपद्धतींच्या द्वारें दीक्षा द्या

कम्युनिस्टांची सैनिक व्यवस्था पश्चिमी सैनिक संघटनांपेक्षां वेगळ्या स्वरूपाची आहे. एका दगडानें दोन पक्षी मारण्याच्या तत्त्वावर कम्युनिस्टांची व्यवस्था केंद्रीभूत झालेली आहे. सैनिकांना शक्तिशाली बनवतांनाच एकीकडे त्यांना पक्के कम्युनिस्ट बनवणें हें सोव्हिएटांचें मुख्य ध्येय आहे. हीं दोन्ही कामें एकाच कार्यक्रमाचे भाग आहेत; याच कारणामुळें प्रथमपासूनच गुलाम सैन्यामध्यें सोव्हिएट नीतितत्त्वांच्या अनुयायी कॉमिसारांना प्रमुख स्थान दिलें गेलेलें आहे. १ ऑक्टोबर १९५० रोजीं प्रमुख अधिकाऱ्यांसाठीं पोलंड, चेकोस्लोव्हाकिया इत्यादि ठिकाणीं शिक्षण-संस्था व सायंकाळच्या पाठशाळा सुरू करण्यांत आल्या. इतकेंच काय पण जित राष्ट्रांचे जनरल आणि उच्च पदाधिकारी आठवड्यांतून दोन वेळां चार चार तास शिकतात; स्टॅलिनकृत बोल्शेव्हिक पक्षाच्या इतिहासाचें अध्ययन करतात, राजकारणावरचे निबंध लिहितात, तसेंच त्यांना लेखी परीक्षेंत उत्तीर्ण व्हावें लागतें.

सोव्हिएट सिद्धान्तज्ञांना युरोपांतील विशेष अडवणूक करणारा वर्ग म्हणजे शेतकरी वर्ग. या पूर्व युरोपांतील शेतकऱ्यांबद्दल त्यांना काळजी वाटणें

साहजिकच आहे. सांस्कृतिक आणि सूचना अधिकारी—हे तथाकथित अधिकारी होत—यांना दर आठवड्याला चार तास मार्क्सवादावर व्याख्यानें देतात. या शेतकऱ्यांना कम्युनिस्ट वर्तमानपत्रांची सक्तीनें वर्गणी भरावी लागते. पक्षाचीं प्रकाशनें वाचावीं, शिकावीं लागतात, तसेंच प्रचारकी चित्रपट व 'मतपरिवर्तन' करणाऱ्या इतर साधनांचें पठण, दर्शन व मनन करावें लागतें. पोलिश सैन्याचें दैनिक वर्तमानपत्र "स्वतंत्रतेचे सैनिक" —रोजच्या आरडाओरडीखेरीज यांत कांहींनसतें—यांत सतत असें सांगितलें जातें कीं प्रत्येक पक्षविभागाचें काम म्हणजे "सैनिकांना कम्युनिस्ट बनण्याचें शिक्षण देणें" हेंच होय. 'वर्गशत्रु' शिल्लक आहेत तोंपर्यंत प्रत्येक गणवेषधारी सैनिकापासून सावध रहा अशी या पत्राची सतत ओरड चालूं असते...याचा अर्थ इतकाच कीं साम्राज्यवाद्यांचा शक्य तितक्या लौकर निकाल लावणें......दुसरें कांहीं नाहीं.

परंतु इतकीं दडपणें असून आणि मरणाचा धोका पत्करूनही कित्येक, कित्येक कां, शेंकडों हंगेरियन, रुमानियन आणि बल्गेरियन अधिकारी आपलीं सैन्यें घेऊन युगोस्लाव्हिया, पोलंड, चेकोस्लोव्हाकिया आणि पश्चिम जर्मनींत पळून आले आहेत. "पळपुट्यां"नीं आपल्या तोंडांनीं या पळून येण्याचें कारण असें सांगितलें कीं, "सामुदायिक जमिनींच्या वांटणीपासून माझ्या आईबापांना अर्धपोटीं रहावें लागत आहे,......त्यांनीं माझ्या भावाला पकडलें, माझ्या वडलांना सक्तीची मजुरी करावी लागत आहे, त्यांनीं आमच्या गाई-बैलांना धरून खेंचून नेलें,...इतकें झाल्यावर मी त्यांच्याकरतां काय म्हणून लढावें?"

कम्युनिस्टीकरणाचा कार्यक्रम जोरदार व्हावा म्हणून रंगरूटांना पहिल्या वर्षी सुट्टी मिळत नाहीं. कारण आपल्या परिवाराची तावडतोब झालेली वाताहत पाहिली, आणि सोंपवलेल्या कामाच्या भाराखालीं आपल्या कुटुंबीयांचीं मनें व शरीरें दडपलीं गेलेलीं दिसलीं कीं कम्युनिझमबद्दल या शेतकरी सैनिकांना वाटणारा स्वाभाविक तिटकारा आणि विरोध उफाळून येतो.

**जित राष्ट्रांतील अत्युत्तम स्टॅलिनवादी अधिकाऱ्यांची संघटना करा.**

याच बाबतींत क्रेमलिनला जित राष्ट्रांच्या सैन्यांत फार मोठ्या प्रमाणावर असहाय बनावें लागतें. या सैन्याच्या उच्चपदाधिकाऱ्यांमध्यें हजारों रशियन अधिकारी असले तरी कम्युनिस्ट म्हणून ज्यांच्यावर सपूर्ण विश्वास टाकतां येईल असे कुशल सैनिक स्थानिक अधिकाऱ्यांमध्यें किंवा सैनिकांमध्यें त्यांना मिळत नाहींत. जित सैन्याचा विकास करून त्यांना कार्यक्षम बनवण्यांत याच अडचणीला क्रेमलिनला पुष्कळ वर्षे तोंड द्यावें लागणार आहे. ही अडचण दूर करण्यासाठीं व ही तूट भरून काढण्यासाठीं राजकारणी हेतु सफल व्हावा म्हणून या संशयित पूर्व युरोपियन अधिकाऱ्यांना एकदां नोकरीवरून बडतर्फ केलेलें असूनही पुन्हां नोकरीवर ठेवण्यांत आलें आहे. असें म्हणतात कीं रुमानियाच्या बडतर्फ अधिकाऱ्यांपैकीं अर्ध्या अधिकाऱ्यांना दुसऱ्यांदा नोकरीवर ठेवण्यांत आलें आहे. असें करण्याखेरीज कम्युनिस्टांना दुसरें गत्यंतरच नव्हतें. सतत वाढणाऱ्या सैन्यासाठीं कित्येक खास अधिकाऱ्यांची आवश्यकता असते. पण रशियनांनीं या प्रश्नाचें एक व्यावहारिक आणि दूरदर्शीपणाचें उत्तर शोधून काढलें आहे.

हजारों लहानमोठ्या जित राष्ट्रांतील अधिकाऱ्यांनीं १९५१ मध्यें सैनिक अॅकॅडमीचें शिक्षण पुरें केलें. सध्यां देखील एकामागून एक हजारों अधिकारी शिक्षण घेत आहेत. अशा तऱ्हेनें सोव्हिएट शिक्षण व कम्युनिस्ट पक्षाची दीक्षा घेतलेल्या जित अधिकाऱ्यांची उत्तम संघटना करण्यांत येत आहे. १९५३ किंवा १९५४ पर्यंत गुलाम राज्यांतील सैन्यशक्तीमध्यें सैद्धान्तिक आणि व्यावसायिक दृष्टीनें बघतां लाल सेनेच्या पदवीधारी सैनिकांपेक्षां या सैन्यांत २०,००० सैनिक जास्त होतील. परंतु या "बनविलेल्या" सैन्यासाठीं पूर्ण विश्वासार्ह अशा मध्यमवर्गीय व उच्च अधिकाऱ्याची मॉस्कोला इतकी उणीव भासत आहे कीं ती भरून काढायला त्यांना कित्येक वर्षे लागतील. यामुळें पूर्व युरोपांत क्रेमलिनला आपल्या स्वतःच्या सोव्हिएट सैनिकांवरच अवलंबून रहावें लागत असून त्या दृष्टीनें क्रेमलिननें असा आदेश दिला आहे कीं—

"सोव्हिएट सैन्यासाठीं विशिष्ट प्रकारचीं हत्यारें जमवा."

सोव्हिएट सैन्यसंघटनेला कोणत्याही क्षणीं मदत करतील अशा प्रकारचीं कित्येक पुरवठा-केंद्रें रशियनांनीं पोलंड ते बल्गेरिया या प्रांतांत स्थापन केलीं आहेत. या केंद्रांचें नांव 'वॉयमाग्स' असें असून त्यांवर संरक्षक दलांतील सैनिकाचा सक्त पहारा असतो. या सैनिकांना सोव्हिएट एम्. जी. बी. (एम्. व्ही. डी.ची परदेशीय शाखा) चे अधिकारी हुकुम देत असतात. हंगेरीमध्यें कोरियन युद्धानंतर एक डझनभर किंवा जास्तच पुरवठा-केंद्रें वाढविण्यांत आलीं आहेत. अशाच तऱ्हेचीं कित्येक केंद्रें पोलंड, बल्गेरिया व चेकोस्लोव्हाकियामध्यें टिकठिकाणीं विखुरलेलीं आहेत. या केंद्रांत शस्त्रास्त्रांबरोबरच खाण्यापिण्याचें सामान व जळणहि टेवलें जातें. बर्गास, स्टॅलिन व रुस्चुकच्या विस्तृत सोव्हिएट केंद्राबद्दल एका बल्गेरियन वार्ताहरानें कळविलें होतें कीं,—

"सोव्हिएट युद्धसामुग्रीचें दिवसेंदिवस वाढतें प्रमाण पाहिलें कीं तें फक्त युगोस्लाव्हियाविरुद्ध उपयोगांत आणण्यासाठीं सांटवलें असेल असें वाटत नाहीं. नुकतेंच आलेल शस्त्रास्त्रादि सामान थेट सोव्हिएट कारखान्यांतून आलेलें आहे." सोव्हिएट कम्युनिस्टांनीं पोलादी पडद्यामागच्या देशांचें जें संपूर्ण लष्करीकरण चालवलें आहे तें पाहतां या कार्याची आवश्यकता व त्याचें प्रमाण या दोहोंचें मूल्यमापन करण्यास पाश्चिम युरोपीय सैन्याला भाग पाडीत आहे. कारण अटलांटिक करारांत हा मुद्दा आहे. सोव्हिएट युद्धतयारीवरून स्पष्टपणें असें दिसून येतें कीं पाश्चिमी जनतेला अत्यंत दृढतेनें, फार मोठे असे दीर्घकालीन प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे. जित राष्ट्रांच्या सैन्यांत अजून जरी पुष्कळच उणीवा असल्या आणि त्यांच्यावर कडक नियंत्रणें असलीं तरी देखील त्यांच्या लष्करी सामर्थ्याचें अगर सैन्यशक्तीचें प्रमाण दिवसेंदिवस वाढतच आहे; आणि अधिकाधिक धोका निर्माण करीत आहे. एकेक वर्ष उलटेल तसा हा धोका वाढतच जाईल असें दिसतें."

मॉस्कोच्या "पूर्व युरोपिय सैन्या"ला एन्. ए. टी. ओ.च्या सैन्यापेक्षां कितीतरी प्रत्यक्ष सवलती मिळालेल्या आहेत. यापैकीं कांहीं तर कित्येक वर्षें अशाच मिळत राहतील.

( १ ) जित राष्ट्रांचें सैन्य म्हणजे आजपर्यंतचें सर्वांत मोठें, आणि संपूर्णपणें " आंतरराष्ट्रीयीकरण " केलेलें सैन्य आहे.

( २ ) एकाच तत्त्वाची दीक्षा देण्याची यांची पद्धति दिवसेंदिवस जास्त जास्त सफल बनत चाललेली आहे; आणि त्यायोगें हें सर्व सैन्य परस्परांशीं संलग्न आहे.

( ३ ) हें एकच असें आंतरराष्ट्रीय सैन्य आहे आहे कीं ज्याच्या हालचालीं-साठीं आदेश देण्याकरितां एकच भाषा वापरली जाते. ( रशियन भाषा )

( ४ ) यांच्या सैन्य-मंडळांवर आणि युद्धयोजनांवर एका सामर्थ्यशाली सैन्याचें पूर्ण नियंत्रण आहे; आणि हा एकाधिकार अशा स्वरूपाचा आहे कीं कोणत्याहि पश्चिमी सैन्याला आपल्या विभिन्न सैन्यावर याचा प्रयोग करतां येणार नाहीं.

( ५ ) यांच्या सोव्हिएट पद्धतीमुळें एका साच्याच्या पलटणी व सैनिक तयार झालेले आहेत. सैन्य-संघटनेच्या बाबतींत एन्. ए. टी. ओ. च्या भिन्न भिन्न सैन्यसंघटनेपेक्षां यांनीं फार प्रगति केलेली आहे.

( ६ ) एन्. ए. टी. ओ.च्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना पावलागाणिक जाचक ठरणारे राष्ट्रीय व जातीयतेचे अडथळे कम्युनिस्टांच्या कठोर नियंत्रणामुळें दूर सारले जात आहेत. **पण युद्ध करण्यास ही जितराष्ट्र-सेना कितपत समर्थ किंवा कार्यक्षम आहे ?**

अमेरिकन, फ्रेंच किंवा रशियन पलटणींच्या मानानें सामान्य जितराष्ट्र-सैन्याच्या विभागांची विध्वंसक शक्ति किती आहे याची तुलना करणारा कोणीहि पूर्व युरोपीय निर्वासित अधिकारी अजून मला भेटला नाहीं. पोलादी पडद्याच्या दुसऱ्या बाजूला राहणारांपैकीं कोणालाही तिकडे पडद्यांत काय आहे, जितराष्ट्रसैन्यांत आज किती व कशा प्रकारचें युद्धसाहित्य आहे, आणि प्रत्येक गुलाम सैन्यानें अर्धे किंवा पूर्ण लष्करी शिक्षण घेतलें आहे कीं नाहीं याबद्दल कुठल्याही प्रकारची माहिती नसते. सर्व जित राष्ट्रसैन्यामध्यें एकाच प्रकारचें युद्धसाहित्य व सोव्हिएट तंत्राचें शिक्षण देण्याचा कार्यक्रम चालू आहे आणि हे दोन्ही कार्यक्रम दर महिन्याला वाढतच आहेत,

तरी देखील जी .कित्येकं .मांहिती उपलब्ध आहे व ज्या सत्यगोष्टी उजेडांत आल्या आहेत त्यांवरून एक व्यापक पण पुष्कळसें खरें मूल्यमापन करण्यांत यश मिळविणें शक्य आहे. पहिली गोष्ट म्हणजे सर्वांत जास्त शिक्षण घेतलेल्या जित राष्ट्रसैन्यांतील पलटणींचें त्यांना विशेष महत्त्व वाटतें. अशा तऱ्हेचे दोनतीन वर्षांपूर्वीचे ३६ ते ४८ सैन्याविभाग असून त्यांत २० ते ३० पर्यंत गुरिला, पॅरॅशूट, तोफखाना, आणि घोडेस्वारांचीं पथकें आहेत. यांपैकीं कोणालाही आयत्या वेळीं युद्धावर धाडण्यांत येईल असें दिसून येतें. युद्धतज्ञांचें असें मत आहे कीं १९५२ चे ''विशेष महत्त्वाचे'' जित राष्ट्रसैन्यविभाग सामान्य सोव्हिएट किंवा पश्चिमी सर्वोत्तम सैन्यविभागापेक्षा युद्धसाहित्य व शिक्षणाच्या बाबतींत कमी योग्यतेचे आहेत. कांहीं कांहीं ठिकाणीं पायदळाबरोबर तोफखाना असला तरी तो मुख्यतः घोड्यांकरवीं ओढण्यांत येणारा आहे. जित राष्ट्रसैन्यविभागांतील पायदळांत रशियन सैन्य विभागाच्या मानानें तोफखाना कमी होता आणि त्यांना गोलंदाजीचें शिक्षणहि कमी प्रमाणांत मिळालेलें होतें.

प्रत्येक जित राष्ट्रसैन्य मोटारवाहतुकीच्या कमतरतेला बळी पडलेलें आहे. बल्गेरिया, रुमानिया आणि हंगेरीमध्यें लष्करी उपयोगाच्या व खाजगी नागरिकांच्या मिळून एकूण १०,००० गाड्या आहेत आणि चेकोस्लोव्हाकियांत जवळजवळ ६५,००० मोटरगाड्या आहेत. कायम नोकरीमध्यें शिक्षित अधिकारी कमी असल्यानें चांगलें शिक्षण देऊन मोठ्या प्रमाणावर सैन्यविभाग निर्माण करण्यांत फार मोठा अडथळा उत्पन्न होत आहे परंतु प्रत्येक जित राष्ट्रांत अत्युत्तम पलटणींची जी सर्वसामान्य संख्या आहे तिकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. सामान्यतः बल्गेरियाचें सैन्य सर्वांत उत्तम समजलें जात असून पोलंडचा दुसरा क्रमांक लागतो.

जित राष्ट्रसैन्याच्या कार्यक्षमतेबद्दल कमी मूल्यमापन करून देखील असा निष्कर्ष काढतां येतो कीं त्यांच्या जवळजवळ ७० सैन्यविभागांपैकीं निम्मे सैन्यविभाग लष्करी शिक्षणदृष्ट्या अधिकांश पश्चिम युरोपीय सैन्यविभागाच्या सामान्यतः बरोबरीचे आहेत. विशेष प्रकारच्या गोरिला किंवा इतर कांहीं पलटणी खात्रीनें उच्च दर्जाच्या आहेत. परंतु जित राष्ट्रसैन्यांत शस्त्रास्त्रें,

बॉम्बफेकीचें सामर्थ्य आणि शिक्षण यांत जी कांहीं उणीव आहे ती येत्या दोन तीन वर्षांत नक्की भरून निघेल.

जर सोव्हिएट सैन्य युरोपच्या अटलांटिक आणि चैनल किनाऱ्यापर्यंत सहज विजय मिळवीत आलें तर पौर्वात्य पलटणी रशियनांच्या बाजूनें योग्य तऱ्हेनें लढत आहेत असें समजलें पाहिजे. पण सोव्हिएट सैन्याला अडवून जर मागें हुसकून लावण्यांत आलें तर जित राष्ट्रसैनिकांबद्दल जें आश्वासनपूर्वक सांगितलें जातें तें खोटें ठरेल व त्यांच्या सामर्थ्याबद्दलच्या खोट्या समर्थनाचा फुगा शेवटीं फुटून जाईल.

**सोव्हिएटांची दोन बाजूंच्या मध्यें अडकवून टाकण्याची पद्धत; जित राष्ट्रसैन्यविभागाला कशा तऱ्हेनें रशियनांच्या बाजूनें सफलतापूर्वक लढण्यास भाग पाडलें जातें ?**

गुलाम राज्यांचे सैन्यविभाग कोणत्याही परिस्थितींत मॉस्कोचे मित्र बनून हिरीरीनें कसे लढतील ? अत्यंत कम्युनिस्टीकरण केलेल्या व उत्कृष्ट संघटित अशा " शॉक ब्रिगेड " पलटणी नक्कीच अशा तऱ्हेनें लढूं शकतील. कट्टर कम्युनिस्ट आणि सोव्हिएट शिक्षण घेतलेले उत्तर कोरियन सैनिक यांनीं हें सिद्ध करून दाखविलें आहे. लढाईच्या मैदानांत लक्षावधि लोकांनीं प्राणार्पण करून याची प्रचीति आणून दिलेली आहे. अत्युत्तम जित राष्ट्रसैनिकपथकांना दीर्घकाल ही शिकवण दिली जात आहे. आणि त्यांतून लढण्या-मरण्याची संस्कृति नसानसांतून भिनलेल्या राष्ट्रांची ही सेना आहे. अशीं सैन्यें अजून अल्पसंख्य असलीं तरी उपेक्षणीय खास नाहींत. त्यांच्या कार्यक्षमतेबद्दल जर आम्ही चुकीची कल्पना करून घेतली तर आम्ही जाणूनबुजून आपल्या डोळ्यावर कातडें ओढून घेत आहोंत असें म्हटलें पाहिजे. " इकडे आड व तिकडे विहीर " अशी सैन्याची अवस्था करून टाकण्याचा सोव्हिएट खेळ कसा खेळला जातो ? हंगेरियन व युगोस्लाव्ह येथील सैनिकछावण्यांचें जरा निरीक्षण करा. सरहद्दीजवळ भैगयार फौजा आहेत; त्यांच्या मागें सोव्हिएट एम्. व्ही. डी.च्या फौजा आणि सशस्त्र पलटणी आहेत. त्यांच्या मागें हंगेरियन गणवेशांतील सोव्हिएट छत्रीधारी सैनिक आहेत. आक्रमण केल्या-नंतर " हंगेरियनांच्या पुढें सोव्हिएट छत्रीधारी सैनिक उतरतील आणि

अशा तऱ्हेनें हंगेरियनांच्या मागेंपुढें सोव्हिएट सैनिक राहतील;" अशा अवस्थेत कोणता सैनिक असा हरीचा लाल आहे कीं जो लढण्यास नकार देईल? जास्त चांगलें शिक्षण मिळालेल्या जित राष्ट्रसैनिकांसाठीं मॉस्कोचा असा आदेश आहे—"लढणें भागच पडेल अशाच ठिकाणीं त्यांना ठेवा."

**सोव्हिएट मध्य एशियाच्या कांहीं नकाशांत ठिकाणांचीं पोलिश नांवें छापलीं आहेत. ही कशाची पूर्वसूचना होय?**

प्रत्येक जित राष्ट्रसैनिकांमध्यें पुष्कळसे सैनिक व अधिकारी यांचा असा एक वर्ग आहे कीं त्यांच्याबद्दल रशियन कम्युनिस्टांना अजूनही अत्यंत अविश्वास वाटतो. तितकीच गरज भासल्याशिवाय सैनिकांना युद्धभूमीवर किंवा युद्धभूमीच्या जवळपास काम दिलें जात नाहीं. ही गोष्ट पोलंडच्या कट्टर देशाभिमानी लोकांना विशेष प्रकारें लागू करण्यांत येते. कारण सोव्हिएट कम्युनिस्टांना त्यांचा तिरस्कारही वाटतो आणि भीतिही वाटते. ही गोष्ट नीट ध्यानांत ठेवा आणि मार्च १९५१ मध्यें व्हिएन्नामध्यें पळून आलेल्या एका पोलिश सैनिकाच्या स्वानुभवाची कहाणी ऐका...

या सैनिकाला रशियन बोलतां येत असे. तेव्हां त्याच्या पोलिश कर्नलनें त्याला एका नकाशावरील रशियन नावाचा पोलिश भाषेंत अनुवाद करायला सांगितलें. नवलाची गोष्ट अशी कीं तो नकाशा मध्य एशियांतील कजाकिस्तानचा होता. त्या शिपायाला कांहीं संशय आला; कांहीं वेळानंतर त्याला असें समजून आलें कीं नकाशाविभागांत काम करणारे इतर पोलिश रहिवासी देखील त्याच्याप्रमाणें सोव्हिएट, तुर्कमेन, किरघिज, उजबेक व तादझिक लोकशाही राज्यांच्या ठिकाणांचीं नावें पोलिश भाषेंत लिहीत आहेत. पोलिश सैन्याच्या प्रमुख कार्यालयासाठीं फार मोठ्या प्रमाणावर हे नकाशे छापण्यांत आले. तो पोलिश सैनिक फौज सोडून पळून आला.

कॅस्पियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यापासून तों चिनी सिक्यांगच्या सरहद्दीपर्यंतच्या झाडून साऱ्या इलाख्यांचे नकाशे बनवण्यांत येत होते. हजारों, लाखों हटवादी पोलिश रहिवाशांना दक्षिणमध्य एशियांतील दूरवरच्या केंद्रांत पाठवणें क्रेमलिनला सुरक्षितपणाचें वाटतें. कारण तिथें कबजा मिळवायला या सैनिकांचा आंतरसैन्याच्या रूपानें उपयोग होतो. कित्येक

वर्षे निर्वासित पोलिश रहिवासी असें सांगत आले आहेत कीं लढाई सुरू झाल्याबरोबर देशांतील "गुलाम सैन्यां"तील अधिकांश सैनिकांना मध्य एशिया किंवा अतिपूर्वेकडे पाठवलें जाईल. ही जुन्या काळची झारशाहीची व रशियन प्रथा आहे. सोव्हिएट कम्युनिस्टांनीं आपण कट्टर रशियन आहोंत हें सिद्ध करून दाखवलें आहे.

पण एक सत्य गोष्ट मात्र बरीच उत्साहजनक आहे. ती म्हणजे अणु व इतर शस्त्रास्त्रांच्या उत्पादनाबाबत पश्चिमी देश रशिया व त्याच्या जित देशांपेक्षां वरचढ आहेत. पण या श्रेष्ठत्वाचा जास्तींत जास्त फायदा करून घेतला गेला तरच ! त्याचबरोबर ही गोष्टही खरी आहे कीं सर्वसामान्य शिक्षण, तंत्राबाबतचें प्रावीण्य आणि आधुनिक शस्त्रास्त्रांचा उपयोग या बाबतींत पश्चिमी सैनिक रशियन किंवा जितराष्ट्र सैनिकांपेक्षां पुढें गेलेला आहे. अमेरिकेच्या नव्या अणुशस्त्राच्या योगानें जागतिक शांतता टिकून राहण्याचा संभव आहे. शेवटीं हें शस्त्र, शस्त्रास्त्रें, सशस्त्र सैनिक, रणगाडे, तोफा, विमानतळ यांच्या बाबतींत आज मॉस्कोचा जो वरचढपणा आहे तो नष्ट करील, किंवा पूर्णपणें नष्ट करण्यांत यश मिळवील अशी खात्री वाटते. किंवा शेवटीं असेंही होईल कीं सोव्हिएटांनीं निर्माण केलेलें हें सैन्य युद्धाच्या लिखित अनुभवांत सर्वांत विशाल व असामान्यही ठरेल. परंतु कांहीं झालें तरी रशियन सैन्याच्या अधिकांश भागाला नष्ट करूं शकणाऱ्या अणुतोफा, अणु रॉकेट किंवा इतर क्रांतिकारी शस्त्रें पाहिजे त्या प्रमाणांत १९५४ किंवा १९५५ च्या आधीं ते बनवूं शकणार नाहींत.

संरक्षणमंत्री रॉबर्ट ए. लॉवेटना नाइलाजानें २५ सप्टेंबर १९५१ मध्यें अशी सूचना द्यावी लागली कीं लढाई जिंकण्याची एकादी जादू कांहीं अजून कोणाला सांपडलेली नाहीं. विशेषतः निकटच्या भावी काळांत "सहजपणें आणि कमी खर्चांत" संरक्षण देतां येईल या अतिरंजित कल्पनेच्या भ्रमांतून त्यांनीं लोकांना जागें केलें आहे. निकटच्या भविष्यकाळांत मग तो दोन, तीन किंवा आणखी जास्त वर्षांचा कां असेना—पश्चिमेकडील स्वतंत्र जनतेला सोव्हिएट रशिया व क्रेमलिन यांनीं तयार केलेल्या पूर्व युरोपच्या उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या सैन्यसामर्थ्याला तोंड द्यावें लागणार खास ! ●●●

## गुप्त-पोलीस

: ३ :

बुडापेस्ट येथील एका ' बढती ' मिळालेल्या महाशयांनीं आपल्या आवडत्या उपाहारगृहांत जाऊन कॉफी मागवली आणि आपल्या पूर्वपरिचित वेटरजवळ गप्पा मारायला सुरुवात केली. वेटरनें आसपास जरा न्याहाळून म्हटलें, " महाराज, जरा जपून ! सध्यांच्या दिवसांत कोणत्याही वेटरशीं गप्पा न मारलेल्याच बऱ्या ! " बुडापेस्टच्या सर्वांत लोकप्रिय उपाहारगृहांतील तीन वेटरना अचानक ' बढती ' मिळाली होती. आणि आश्चर्य तरी किती ! रशियाच्या एम्. व्ही. डी.सारख्या रुमानियाच्या एम्. आय्. ए. नांवाच्या भयंकर संस्थेंत एकजण कर्नल झाला आणि दुसरे दोघे मेजर बनले ! सध्यां जित युरोपांतील प्रत्येक वेटरला गुप्त-पोलीस संस्थेचा दलाल म्हणून काम करावें लागतें. त्याला रोज रात्रीं " उपयुक्त सूचनां "चा अहवाल सादर करावा लागतो, नाहींतर नोकरीला मुकावें लागतें.

चेकोस्लोव्हाकियाच्या जकात अधिकाऱ्यांना जुलै १९५० मध्यें 'प्राग'च्या एस्. एन्. बी. अधिकाऱ्यानें सांगितलें कीं, " दर महिन्याला कमींत कमी एका जनशत्रूचें नांव सांगून तुम्ही आपली स्वामिभक्ति प्रगट केली पाहिजे." जानेवारी १९५१ मध्यें " जास्त तक्रारी करा आणि विश्वशांतीला हातभार लावा " अशा घोषणेच्या द्वारें प्रत्येक जकात अधिकाऱ्याला दरमहा तीन व्यक्तींविरुद्ध तक्रार करण्याचा हुकूम देण्यांत आला.

रशियन युरोपांत गुप्त-पोलिसांचें फार प्रस्थ आहे, त्यांचें सगळीकडे नुसतें जाळें विणलेलें आहे. उपाहारगृहांतील नोकर-चाकर, भाड्याच्या घरांचे व्यवस्थापक, चौकीदार, पोस्टमन, आगगाडीचे गार्ड, शिवाय इतर अनेकांना सोव्हिएट धर्तीच्या गुप्त-पोलीस संघटनेकडून बातम्या काढण्यासाठीं भाग

पाडलें जातें. यांत एखाद्याला कितीही अतिशयोक्ति आहे असें वाटले तरी एवढें मात्र खरें कीं सोव्हिएट कम्युनिस्टांचें पोलीस खातें जगांत सर्वांत मोठें व अत्यंत क्रूर आहे. हें खातें कामश्चातका व व्हलॅडिवोस्तॅक पासून थेट बर्लिन व व्हिएन्नापर्यंतच्या टापूंत राहणाऱ्या सर्व लोकांना आपल्या दडपणाखालीं ठेवून त्यांच्यावर करडी नजर ठेवतें व त्यांना धमकावीत, घाबरवीत असतें. मांचूरिया आणि चीनच्या अज्ञात भागांवर देखील याचें पुष्कळसें नियंत्रण राहतें. अर्थात् प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रूपानें कोणत्याही पोलीसगिरीच्या एखाद्या संघटनेनें आजवर जगांतील इतक्या मोठ्या प्रदेशावर व इतक्या मोठ्या लोकसंख्येवर अधिकार गाजवला नव्हता. ही एक " निर्दयपणा, यातना आणि हत्या कंपनी लिमिटेड " असून जगाचा एक-तृतीयांश भाग हिनें व्यापला आहे.

पोलादी पडद्यामागच्या देशांमध्यें ही पोलीस-व्यवस्था सर्वांत आधीं पोंचविण्याच्या कामगिरीला मॉस्कोनें प्राधान्य दिलें. आतां प्रत्येक गांवांत, शहरात, तालुक्यांत ही व्यवस्था स्थापन होत असून तिला सुसंघटित स्वरूप देण्यांत येत आहे. हें खातें दैनंदिन जीवनाच्या प्रत्येक कानाकोपऱ्यांत मानवी कार्यांच्या व मनोरंजनाच्या प्रत्येक ठिकाणीं घुसलें आहे. आजपर्यंत कोणत्याही जित राष्ट्रावर पोलिसशाहीचा इतका संपूर्ण व घोर अंमल बसला नव्हता. यांच्यापासून कोणत्याही परिस्थितींत बचाव करतां येत नाहीं; ही अवस्था तथाकथित " स्वतंत्र लोकशाही राज्यांत " आज सर्रास दिसून येत आहे. क्रेमलिननें निर्माण केलेल्या एम्. व्ही. डी.च्या या जाळ्याशीं तुलना करतां हिटलरनें निर्माण केलेला क्रूर गेस्टापोचा चक्रव्यूह याच्या पासंगालाही पुरणार नाहीं. एम्. व्ही. डी.चें जाळें अधिक विस्तृत आणि जास्त घट्ट विणलेलें आहे.

स्टॅलिनवाद्यांनीं प्रत्येक जित देशांत अनेक सहायक संघटनांखेरीज पोलीस नियंत्रणाच्या पांच स्वतंत्र संघटना उभारल्या आहेत:

( १ ) **संरक्षक पोलीस**—सोव्हिएट रशियाच्या एम्. व्ही. डी. प्रमाणें राजकीय गुप्तहेर व इतर लोकांना मोठ्या प्रमाणावर पकडून, नाहींसें करून, यांच्यावर प्रश्नोत्तरांचा भडिमार करून, त्यांना सतावून, ठार मारणाऱ्या

तज्ञांनी ही संस्था आहे. पोलंडमध्यें यू. एस्.; चेकोस्लोव्हाकियामध्यें एस्. एन्. व्ही., हंगेरीमध्यें ए. व्ही. ओ., रुमानियामध्यें एम्. आय्. ए. वगैरे संक्षिप्त नांवांनीं या संस्था ओळखल्या जातात.

( २ ) **अंतर्गत संरक्षक सैन्य**—हें संरक्षक पोलिसांचाच गणवेश धारण करणारें आणि सामर्थ्यवान्, सशस्त्र पूरक सैन्य आहे. विविध पद्धतींनीं सार्वजनिक व्यवस्था ठेवण्याचें यांचें काम !

( ३ ) **जनतेचे किंवा नागरिकांचे पोलीस**—सार्वजनिक देखरेखी-साठीं मुख्यत्वें यांचा उपयोग केला जातो. इतर राष्ट्रांतील पोलिसांशीं यांचें बरेंच साम्य आहे; परंतु संरक्षक पोलीस म्हणून यांना केव्हांही काम करायला घेतलें जातें.

( ४ ) **सरहद्दीचे संरक्षक**—ह्या संपूर्ण शस्त्रधारी पलटणी असून यांचें काम म्हणजे सरहद्दीवर पहारा द्यायचा आणि " स्वतंत्र झालेल्या " नागरिकांना आपला देश सोडून जात असतां अडवावयाचें.

( ५ ) **रेल्वे पोलीस**—हे पोलीस आगगाडीच्या वाहतुकीसंबंधीं सर्व गोष्टींवर कटोर नियंत्रण ठेवतात.

कम्युनिस्ट राज्यांतील अंतर्गत सैन्य जरी पुष्कळ मोठें असलें तरी देखील कित्येक नियंत्रण संस्थांची त्यांना नेहमीं मदत मिळते. चेकोस्लोव्हाकियांत डी. ओ. झेड. नांवाची संस्था सर्व लष्करी संस्थांवर संरक्षणाबाबत नियंत्रण ठेवीत असते; तसेंच सर्व नागरिकांवर व परदेशीयांवर राजकीय विचारांबाबत नियंत्रण ठेवीत असते. या संस्थेजवळ बरेच गुप्तहेर असतात. एस्. एन्. बी. या संरक्षक पोलिस संस्थेच्या खालोखाल या संस्थेला लोक घाबरतात. कम्युनिस्टांच्या सर्व " बाहुली राज्यांत " ( मेणाच्या बाहुल्यांप्रमाणें असणारे ) अत्यंत कार्यक्षम असे ' आर्थिक पोलीस ' ठेवलेले आहेत. मजूर जाणूनबुजून, मुद्दाम जी मोडतोड करतात त्यावर देखरेख ठेवण्यासाठीं व ती टाळण्यासाठीं कारखान्यांत बरेच शिपाई ठेवलेले असतात; विशेषतः युद्ध-सामुग्री तयार करणाऱ्या कारखान्यांत ! पण हल्लेखोर व लुटारू म्हणूनच हे पोलीस जास्त कामगिरी बजावतात. गेलीं दोन वर्षें लोकांच्या घरांवर हल्ले

करून, चांदी, जडजवाहिर इत्यादि खाजगी मालमत्ता ते लुटून नेत आहेत. अशा प्रकारें भांडवलवादी वस्तु जवळ ठेवणें शिक्षेला पात्र समजलें जातें: इतकेंच काय दांतांमध्यें सोनें भरणें देखील दंतवैद्याला कायद्यानें मंजूर केलेलें नाहीं. अशा तऱ्हेनें मध्यमवर्गीय व उच्चवर्गीय नागरिकांकडून लाखों रुपयांची मालमत्ता लुटून नेली जात आहे. कॉमिन्टर्नच्या आज्ञेनुसार " आर्थिक पोलीस " " वर्ग शत्रू "ची जी संपत्ती लुटून नेतात ती कम्युनिस्ट पक्षाच्या " स्वतंत्र खजिन्यांत " भरली जाते.

स्टॅलिनवाद्यांनीं पोलंडमध्यें व इतर जित राष्ट्रांमध्येंही " पियोनी " नांवाची एक संस्था स्थापन केली आहे. पियोनींचे चार प्रतिनिधि असतात. संरक्षक पोलिस, कम्युनिस्ट पक्षाचा एक कार्यकर्ता, एक ट्रेड युनियनचा सभासद आणि एक तत्संबंधीं मंत्रालयांतील अधिकारी. यंत्रांचे कारखाने, प्रत्येक कचेरी, प्रत्येक राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक संस्थांचे कार्यकर्ते यांच्या-मध्यें हे प्रतिनिधि ठेवलेले असतात. संरक्षक पोलिस व बहुतांशीं पक्ष-सदस्य गुप्तहेराचें काम करतात. खरें म्हणजे 'पियोनी'च्या चारी प्रतिनिधींना "दोषारोपणाचा" आपला वांटा उचलावा लागतो. प्रत्येक कारखान्याच्या व्यवस्थापकावर कम्युनिस्ट शासनांतर्गत प्रत्येक संस्थेच्या शासकांवर पोलिसी दंडा उगारून हे काम करीत असतात. कदाचित पोलिसांच्या या अंतर्गत देखरेखीचा हेतु कार्यक्षमता वाढवून कम्युनिस्टविरोधी व अविश्वसनीय व्यक्तींना बाहेर काढणें हाही असेल. पण या अत्यंत जागरूक देखरेखीचा परिणाम मात्र असा होत आहे कीं पोलिसांच्या नजरेला आपला चांगलेपणा दिसावा ही ईर्ष्या कार्यकर्त्यांच्या मनांत वाढत जाऊन कांहीं कार्यकर्ते इतरांच्या तऱ्हेतऱ्हेच्या चुकीबद्दल सतत चहाड्या करीत असतात. आणि त्यामुळें कार्यांत खंड पडून उत्कृष्ट कार्यनिर्मिति जवळजवळ अशक्य होऊन बसते. पण यामुळें पोलिसराज्याचें प्राथमिक ध्येय व या राज्याची गरज भागविली जाते. भीति आणि संशय यांची सतत छाया पसरलेली असते. प्रत्येक कामांत पोलिसाचा हात लुडबुड करीत असतो.

**जित राष्ट्रांतील गुप्त पोलिस किती जासुदांना व किती गुप्त हेरांना कामाला लावतात ?**

संरक्षण पोलिसांच्या प्रमुख संघटनाच्या सभासदांची संख्या कधींही कायम टिकत नाहीं. ती एकसारखी वाढत असते. यंदाच्या वर्षी केलेल्या मोजदादीप्रमाणें ही वाढ अंदाजें दरवर्षी २,००,००० इतकी आहे. रुमानियाच्या एम् आय्.ए.ची संख्या एका वर्षातच ८०,००० नें वाढली. पण कम्युनिस्ट साध्या पोशाखांतील आपल्या फौजांची संख्या बाहेर फोडीत नाहींत. पूर्व जर्मनीपासून ते बल्गेरियाच्या तुर्क-ग्रीस सरहद्दी-पर्यंत असे लक्षावधि सैनिक विखुरलेले आहेत. यांच्याखेरीज पगारी व बिनपगारी अशा पोलिस गुप्तहेरांचीं वेगवेगळीं दलें आहेत.

अत्यंत दीन व अडचणींत अडकवून टाकलेल्या लोकांना जित देशां-तल्या एम्. व्ही. डी.च्या संस्थेचे एजंट म्हणून काम करावें लागतें. यामध्यें प्रामाणिकपणानें पण एक प्रकारच्या धर्मांधतेनें प्रेरित होऊन काम करणाऱ्या तरुण कम्युनिस्टाची व बहकावलेल्या लहान मुलांची संख्या फार मोठ्या प्रमाणावर असते. ज्यांना काम करणें भाग पाडलें जातें अशा भीतिग्रस्त व दयनीय लोकांची संख्या फार मोठी आहे. कारण त्यांना आपली नोकरी टिकविणें अत्यंत आवश्यक असतें. शिवाय शेंकडा १० टक्के लोक जन्मजात खुषमस्करे, संधिसाधु आणि देशद्रोही असतात. थोडासा पैसा किंवा जरासा विशेषाधिकार मिळतांच हे कोणाचाही विश्वासघात करतात. शिवाय आणखी एका प्रकारचे लोक असे आहेत कीं ज्यांच्या कुटुंबीयांना जास्त कपडे व अन्नाची अत्यंत आवश्यकता आहे. अत्यंत दारिद्र्य व प्रत्येक गोष्टीची उणीव यांमुळें यांना काम करणें भाग पडतें; तसेंच थोड्याशा ऐषारामाची इच्छा असणारे लोक पोलिसांच्या शोधनाला व हत्याकांडाला बळी पडतात. कम्युनिस्ट राज्यांत लोकसंख्येच्या ८० ते ९० टक्के लोकांना भय, त्रास, यातना, छळ, निर्धनता व दारिद्र्य यांचाच कायमचा लाभ मिळत असतो. कम्युनिस्ट राज्याचें स्वरूपच असें आहे कीं स्मशानांतल्या प्रेत पुरण्याच्या खड्डयांत ज्याप्रमाणें किडे उत्पन्न होतात त्याप्रमाणें या राज्यांत गुप्तहेर जन्म घेत असतात.

ही असाधारण परिस्थिति लक्षांत घेतां, उपाहारगृहांतील परिचारक, मजूर, आगगाड्यांचे कंडक्टर, जकात अधिकारी व इतर हजारों सामान्य

नागरिकांना कम्युनिस्ट पक्षाचे जासूद होणें भाग पडतें. यांत आश्चर्यकारक कांहींच नाहीं. ९ करोड जित लोकांमधील १ करोड लोक अविकृत पोलीस संस्थांमध्यें किंवा तऱ्हेतऱ्हेच्या स्वरूपांत व भिन्न प्रकारे गुप्तहेरांच्या रूपानें काम करतात. हा अंदाज लागल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें? किंवा त्याला अयोग्य तरी कसें म्हणतां येईल? याचा अर्थ एवढाच कीं नऊ माणसांमागें एक पोलीस असें याचें प्रमाण आहे.

प्रत्येक "बाहुली राज्यांत" कम्युनिस्टांनीं आपल्या पक्षनेत्यांपैकीं एकाला गृहमंत्री बनवलेलें आहे. हें गृहखातें साऱ्या पोलीसखात्यावर नियंत्रण ठेवतें. गृहमंत्री त्या त्या देशांत जन्माला येतो खरा पण त्याला शिक्षण मॉस्कोमध्यें मिळतें. पूर्वी एम. व्ही. डी.चे रशियन अधिकारी या गृहमंत्र्याच्या आड राहून त्या त्या देशाच्या पोलीस व्यवस्थेचें संचालन करीत असत.

कम्युनिस्ट राज्याचा पूर्णपणें जम बसेपर्यंत हें काम फार हुषारीनें व जागरूकपणें लपून छपून केलें जात असे. यानंतर पूर्व युरोपच्या पोलीस संघटनांच्या एम्. व्ही. डी.कडून कायदेशीर "कबजा" घेतला जात असे.

आज क्रेमलिनच्या गुप्त पोलीस साम्राज्याचे हजारो तज्ञ सर्व जित राष्ट्रें व पूर्व जर्मनीच्या सर्व प्रमुख पोलीस कार्यांचें दिग्दर्शन करीत आहेत. व त्यांवर त्यांना संपूर्ण अधिकार प्राप्त झालेला आहे.

हंगेरीचा मात्यास राकोसी आजपर्यंत कित्येक वर्षें क्रेमलिनच्या जितराष्ट्र-पुढाऱ्यांमध्यें सर्वांत जास्त विश्वासार्ह समजला जात असे. तरी देखील त्याच्या नेहमींच्या चिटणिसांच्या जागीं रातोरात अगदीं अनोळखी "खाजगी चिटणीस" येऊन थडकले आणि तेव्हांपासून आजपर्यंत ते सारखे त्याचा सावलीसारखा पाठलाग करीत आहेत. राकोसी पक्षाचें प्रमुख कार्यालय सोडून जाण्यापूर्वी एक सूचनावजा घंटा वाजते. प्रमुख कार्यालयाचा मोठा दिवाणखाना आणि बाहेर आकादेमिया स्ट्रीटवरील सर्व दळणवळण व वाहतुक पांच मिनिटें बंद राहते, आणि नंतर हंगेरीचा नामधारी शासनकर्ता सशस्त्र पहारेकऱ्यांच्या पहाऱ्यामधून बाहेर पडतो. या

पहारेकऱ्यांत सोव्हिएट नागरिकांचें प्रमाण जास्त असून ते सतत त्याच्या-बरोबर असतात. हंगेरीच्या शासनकर्त्यांचें प्रत्यक्ष संरक्षण करीत असतांना त्यांना तो कुठें जातो व कुणाकुणाला भेटतो याचीही खित्तंबातमी लागते. हंगेरीचे रहिवासी आपापसांत सर्व कांहीं समजून उपहासानें हसतात. आपल्या देशाचा कम्युनिस्ट विश्वासघातकी, देशद्रोही आज आपल्यापेक्षांही वाईट परिस्थितींत आहे हें पाहून त्यांना जरा बरें वाटतें.

गुप्त पोलीस व त्याच्याशीं संबंधित अशा इतर सैन्यदलांत वीस लाख लोक ठेवून कम्युनिस्ट शासनकर्त्यांनीं पूर्व युरोपच्या शेंकडा २ टक्के जनतेला संरक्षक पलटणींत भरती केलें आहे. सामुदायिक बंदीकरणाचें त्यांचें सामर्थ्य अचाट आहे. एम्. व्ही. डी.च्या धर्तीवरील सैनिक-संघटना व अंतर्गत संरक्षक सैन्यांत बहुतांशीं कठोर लोक आहेत. वस्तुतः ते नुसतेच कठोर नसून कट्टर कम्युनिस्ट व निर्दय मारेकरी आहेत. यांचे पुढारी 'मस्कोवाईट' असोत कीं रशियन असोत, ते पक्के मारेकरी व दोषारोपणकलेंत निष्णात आहेत. लाखों जासूद व गुप्तहेर इतक्या मोठ्या आणि निर्दयी पोलीस सैन्यांत असतांना त्यांचा सर्व ठिकाणीं हात पोंहोंचत असेल हें काय सांगायला पाहिजे ! तसेंच हाहाःकार व जरब पसरविण्याच्या त्यांच्या सामर्थ्याचें उगाच तिखटमीठ लावून वर्णन करण्याची तरी काय गरज आहे !

●●●

## अपराधांना कायद्याची चौकट

: ४ :

एकाद्या गुंडाला संधि मिळाली तर तो ज्याप्रमाणें वागेल त्याचप्रमाणें एकाद्या राष्ट्राच्या सरकारवर कबजा मिळाल्यानंतर कम्युनिस्ट किंवा फॅसिस्ट यांची वर्तणूक दिसून येते. न्यायालयाच्या न्यायाधिशाच्या जागीं ते आपले सभासद नेमतात, स्वतः हुकूम काढतात आणि कायदे करतात. अशा तऱ्हेनें लोकांना धाकदपटशा दाखविणें, धमकावणें, भिवविणें, त्रास देणें, लूटमार, जबरदस्ती करणें, सूड घेणें आणि रक्तपात करणें या गोष्टी झोटिंग-शाही पक्षाच्या पुढाऱ्यांना व अनुयायांना यथार्थ व आवश्यकच वाटतील अशा होऊन बसल्या आहेत. अशा तऱ्हेची मोकळीक म्हणजे शासकवर्गाचा कायदाच बनून जातो. इतर सर्वांच्या स्वातंत्र्याची तावडतोब मुस्कटदाबी होते. नात्सींची सत्ता सुरू झाल्यानंतर सुरवातीचे कांहीं महिने त्यांनीं जर्मनन्यायाचे गळफांस, हातकड्या इत्यादींमध्यें परिवर्तन घडवून आणलेलें व तें देखील केवळ एक गंमत म्हणून केलेलें मीं स्वतः पाहिलें होतें. कम्यु-निस्टांनीं पोलादी पडद्यामागच्या प्रत्येक देशांत हेंच केलें. परंतु सर्व घटनां-यंत्रामध्यें मानवद्वेषाचें जें विकृत स्वरूप त्यांनीं उभें केलें आहे व आपल्या कामासाठीं त्याचा मोठ्या कुशलतेनें प्रयोग करण्याच्या त्यांच्या कल्पना अशा कांहीं कळसाला पोंहोंचल्या आहेत कीं त्याची कल्पना करणेंहि कठीण ! स्टॅलिनवादी कायद्यांनीं प्रत्येक नागरिकाच्या खाजगी जीवनाच्या प्रत्येक अंगावर नियंत्रण ठेवलें असून सक्तीनें त्यानें आपलें गुलाम बनवलें आहे. मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. लष्करभरतीसंबंधीच्या बल्गेरियाच्या कायद्याकडे पाहिल्यास असें दिसून येईल कीं कम्युनिस्ट शासनयंत्रानें बनवलेल्या कायद्याच्या कक्षेंत राहणें अत्यंत दुःखप्रद व धोक्याचें आहे.

बल्गेरियांत असें आहे कीं समजा, आपल्याजवळ एकादी मोटारगाडी किंवा ट्रक असेल तर युद्धाच्या कामासाठीं कोणत्याहि क्षणीं ती द्यायला आपण तयार असलें पाहिजे. ती गाडी ठेवण्याची जागा आपण बदलली असल्यास ताबडतोब सूचना दिली पाहिजे. आपल्या गाडीमध्यें काहीं खास बदल करायचा असेल किंवा ती निरुपयोगी समजून विकायची असेल तर तत्पूर्वी संरक्षणमंत्र्यांच्या कचेरींतून त्यासाठीं आपल्याला परवानगी काढावी लागेल. यापैकीं एकाहि नियमाचें उल्लंघन केल्यास तुरुंगाची हवा खावी लागेल.

समजा, आपण बल्गेरियन शेतकरी आहांत, तर आपल्या घोड्यासंबंधीं किंवा खेचरासंबंधीं आपल्याला हेच नियम पाळावे लागतील. आपल्याला आपल्या प्रत्येक जनावराच्या मालकीहक्काबद्दल एक प्रमाणपत्र मिळवावें लागेल. वर्षांतून दोन वेळा त्यांच्या प्रकृतीसंबंधीं व इतर स्थितीबद्दल चांगलें निरीक्षण करावें लागेल. आणि जर आपल्याकडे गाडी असेल तर आपल्याला लष्करीकरणाच्या वेळीं ती गाडी व आपलीं जनावरें स्वखर्चानें पोहोंचवावीं लागतील. आपली गाडी, ट्रक, घोडा किंवा खेचर देण्याच्या बाबतींत आपण टाळाटाळ केलीत कीं समजावें, आपल्याला पांच वर्षांचा तुरुंगवास किंवा सक्तीच्या मजूर छावण्यांची वाट धरावी लागेल. आपल्याकडून नेलेल्या वस्तूंची आपल्याला काय किंमत द्यायची हें कम्युनिस्ट सरकारच ठरवील.

तुलनात्मक दृष्टीनें बघितल्यास हा कायदा जरा नरम स्वरूपाचाच आहे. मोडकी तोडकी गाडी निरुपयोगी समजून विकणें हाहि एक अपराध आहे. पण समजा कीं जित राष्ट्रातील आपण एक नागरिक आहांत आणि मागचा-पुढचा कांहीं विचार न करतां आपण चुकून म्हणालांत कीं, "या लोकांच्या हातांत राज्यकारभार गेल्यावर आपण उमेद तरी कसली बाळगायची?" पण हें आपलें बोलणें म्हणजे पवित्र "लोकशाही शासना"विरुद्ध एक आक्रमण, एक कारस्थान आहे. राजकीय सुरक्षिततेच्या विरुद्ध एक घोर अपराध आहे. आपल्या या बोलण्याची कुठें कुणाला सूचना मिळण्याचा अवकाश कीं, आपल्याला कित्येक वर्षें सक्तीच्या मजूर छावण्यांत काढावीं लागलींच म्हणून समजा! याखेरीज आपली सारी संपत्ति जप्त करण्यांत येईल. पोलीस किंवा

पक्षाच्या अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें आपण थोडे जरी संयशित ठरलांत तरी आपलें घर, फर्निचर, आणि आपलें जें कांहीं असेल त्यावर पाणी सोडावें लागेल.

जित युरोप व सोव्हिएट रशियामध्यें ज्याप्रमाणें पुष्कळशा अपराधांना विविध कायद्यांच्या द्वारें मालमत्ता जप्त करण्याचा एक "योग्य" दंड दिला जातो तसा इतर कोठेंही आढळणार नाहीं. प्राचीन अथवा आधुनिक गुंडांनीं हजारो, लाखो लोकांची संपत्ति दडपण्याचे इतके सुरक्षित व सोपे उपाय कधींच शोधून काढले नव्हते. बंदूक दाखवून रुपये लुटण्याची कांहीं गरज नाहीं. फक्त पोलिसाकडे तक्रार केली कीं झालें. किंवा गुप्त पोलिसांना स्वतःलाच आपलें घर आवडलें आणि त्यांनीं आपल्याला देशांतून बाहेर काढण्याचें मनावर घेतलें कीं बस्स झालें! कोणत्याही निमित्तानें कां होईना, कोणत्याही लाल शासनान्तर्गत स्थानिक कम्युनिस्ट कॉमिंटर्ननें विजयप्राप्तीसाठीं दिलेल्या आदेशांतल्या सातव्या अंगाचें आपण पालन करीत आहोत म्हणायचे! तो आदेश असा ...... "वर्गशत्रूंची संपत्ति ....... अथवा कोणत्याही न्यायालयाच्या निर्णयानें जप्त झालेली कांहीं लोकांची संपत्ति." यामधून पक्षासाठीं पैसे जमा झाले पाहिजेत.

शेवटचें वाक्य सनदशीरपणाचें इतकेंच नव्हे तर स्पृहणीय देखील वाटतें. पण न्यायालय याचा अर्थ कम्युनिस्टाच्या शब्दकोशांत काय आहे! शब्दार्थाची फोडझोड करणारे त्याचे क्रांतिकारक ज्याला "लोकशाही न्यायालय" म्हणतात तेंच कम्युनिस्टांचें न्यायालय. कॉमिंटर्ननें आपल्या आदेशामध्यें सत्ताहरणानंतर प्रत्येक चांगल्या कम्युनिस्टानें काय करावें हें सांगितलें आहे. त्यांत लोकवादी न्यायालयाची अशी व्याख्या दिली आहे. "लोकवादी न्यायालयांत पक्षाचा एक सभासद, दोन गुप्त सभासद, किंवा पक्षाबद्दल सहानुभूति बाळगणारे दोन सभासद न्यायाधीश म्हणून असले पाहिजेत. एकाच गटाचे तीन न्यायाधीश असल्यावर "कायदेशीर" जमीला सीमाच उरत नाहीं. त्यांनीं पूर्व युरोपांतील कम्युनिस्ट पक्षाला गेल्या कांहीं वर्षांत करोडो रुपयांची संपत्ति लुटून, मिळवून दिली आहे. आपणच आपले कायदे बनवले आणि विशेषतः एकच डिक्री लागू केल्यानंतर त्या कायद्यान्वयें आपण करूं शकणार नाहीं असें कोणतें काम उरेल?

## प्रत्येक गोष्टीसाठीं कम्युनिस्टांजवळ एक कायदा आहे.

लाल "बाहुली" सरकारें अखंड डिक्रीचा क्रम चालू ठेवतात. त्यांच्या असहाय्य जनतेची कायदेकानू, निर्बंध, निरीक्षण आणि संभवनीय दंड याखालीं मुस्कटदाबी होत असते. चालू कायद्यांचें सतत सशोधन केलें जातें. आणि शृंखलाबद्ध, नियंत्रणाखालीं दडपलेल्या नागरिकांभोंवतीं आणखी आणखी साखळदंड आवळले जातात. सोव्हिएट न्यायशास्त्रांतल्या "अमूल्य अनुभवांनीं" प्रेरित होऊन काढलेल्या या डिक्र्या मूळ डिक्र्यांच्या सुधारून वाढवलेल्या आवृत्त्या किंवा त्यांच्या नकला असल्या तरी मूळ डिक्र्यांपेक्षां यांचे दांत जास्तच तीक्ष्ण असतात. कम्युनिस्ट कायदे व डिक्रीया १५-२० पानें भरून किंवा कधीं कधीं शेंकडों पानांच्या असतात. 'बाहुली' राज्यांत १९४५ नंतर इतक्या हजारों कायद्यांच्या घोषणा झालेल्या आहेत कीं त्याची संपूर्ण सूची बनवली तर हजारों पानांचीं कित्येक पुस्तकें तयार होतील. यांनीं पूर्व युरोपच्या आर्थिक, सामाजिक व राजकीय सांच्याचें स्वरूप पार बदलून टाकलें इतकेंच नव्हे तर त्याचबरोबर घटनात्मक मूल्यें व अत्यंत प्राथमिक स्वरूपांची व्यक्तिगत सुरक्षितताही नष्ट करून टाकली आहे.

कम्युनिस्टांच्या दूरगामी कायद्यांपासून बचाव करण्याचा एकच उपाय आहे. आणि तो म्हणजे मृत्यु ! हे कायदे म्हणजे कम्युनिस्टांचा विजय व कायमची सत्ता प्रस्थापित करण्याचीं साधनें आहेत. याची चांगली कल्पना येण्यासाठीं आपल्याला एक गोष्ट समजून घेतली पाहिजे. ती म्हणजे निःशंक व कार्यक्षम अशा कारस्थानी लोकांच्या हातांत कायदा गेला कीं त्याचें सामर्थ्य फार विलक्षण असतें. जगांतील सर्वांत पराक्रमी गुंडाना किंवा एखाद्या राज्यांत राजकीय संघटनेच्या स्वरूपांत वावरणाऱ्या गुंडांना कायदे बनवण्याचें सामर्थ्य म्हणजे एक अभेद्य अस्त्र मिळालेलें असतें. सर्व प्रकारें यांचा दुरुपयोग करण्याचें व पापाचरणाचें यानें स्वातंत्र्य मिळतें इतकेंच नव्हे तर तीं पापें न्याय्य ठरवलीं जातात. झोटिंगशहा स्वतःसाठीं स्वतःच आज्ञापत्र तयार करतात आणि......आपल्या गरजेप्रमाणें इतर हजारों लोकांसाठीं आज्ञापत्र तयार करीत असतात.

नऊ कोड पूर्व युरोपियनांची काय अवस्था झाली किंवा स्वतंत्र राष्ट्राच्या प्रत्येक नागरिकावर कोणतें संकट येऊं शकेल हें समजून घेण्याचा मार्ग असा : असें समजा कीं नुकतेंच ज्यांनीं सत्ताहरण केलें आहे अशा आपल्या देशांतील कम्युनिस्टांचे आपण पुढारी आहांत. संसद, सशस्त्र सैन्य व पोलीस आपल्या आज्ञेंत आहेत. तेव्हां आपण आतां आपल्या देशाचें कम्युनिस्टीकरण कसें कराल ? अर्थातच, लोकशाहीवादी स्वतंत्र विचाराच्या देशभक्त नागरिकांना आधीं अधिकारावरून खालीं ओढणें आपलें पहिलें काम ! जितक्या लौकर जमेल तितके उद्योगधंदे, गिरण्या, कारखाने, शेतें वगैरे मालमत्ता सरकारी म्हणून जाहीर करावी लागेल. परंतु सार्वजनिक खात्यांतील लाखों नोकरांना योग्य कारण सांगितल्याशिवाय आपण नोकरीवरून कसें काढणार ? क्रेमलिन पद्धतीच्या सुधारणांना स्थायी स्वरूप देणाऱ्या ' त्या ' प्रकारच्या कायद्यांखेरीज आपण त्यांची करोडों रुपयांची खाजगी मालमत्ता तर कांहीं गडप करूं शकत नाहीं ! यासाठीं निव्वळ पोलीस हाताशीं असून भागत नाहीं. पोलिसांना अंमलबजावणी करतां येईल अशाच तऱ्हेचे कायदे हवेत. आणि पुन्हां न्यायाधीश व न्यायालयें यांवर आपलेंच नियंत्रण हवें. कारण त्याशिवाय या झोटिंगशाही कायद्यांची नीट अंमलबजावणी होते कीं नाहीं हें आपल्याला कसें समजणार ? तेव्हां या ठिकाणीं आपणच आपले कायदे केलेत, आपलींच न्यायालयें बनवलींत व आपलेच न्यायाधीश नेमलेत कीं बस्स् ! झालें काम ! हीच कॉमिंटर्नच्या आदेशानुसार " प्राथमिक " आवश्यकता आहे. हा केवळ रूढिनिष्ठ कम्युनिस्टांचा कार्यक्रम आहे. पण जित देशांमध्यें हा कार्यक्रम अत्यंत क्रूरपणें व कुशलतेनें अमलांत आणला गेला आहे.

**" कम्युनिस्ट-सेवक न्यायाधीशांनीं न्यायालयें भरून टाका. "**

पक्षसभासदांची संख्या एकंदर लोकसंख्येच्या शेंकडा १ किंवा २ टक्केच असतांना—बहुतेक पूर्व युरोपांत असेंच आहे—कम्युनिस्टांना पुरेसे न्यायाधीश कसे मिळतात ? प्रथम त्यांचा भर ' सहानुभूति ' बाळगणाऱ्या मित्रांवर असतो. नंतर कम्युनिस्ट " बाहुल्या " आणि कांहीं पक्षसभासदांना "लोकशाहीवादी न्यायाधीश म्हणून नेमलें जातें. कायदेमंत्र्यांकडून,

नव्या राज्याच्या डोळ्यांत भरण्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या संधिसाधु लोकांची व गुप्त रूपानें कम्युनिस्ट असलेल्या पण " स्वतंत्र " नागरिक म्हणून वावरणारांची न्यायखात्यांत भरताड रचली जाते; याच पद्धतीनें एक हजार रुमानियन न्यायाधीशांच्या जागीं दुसरे लोक नेमले गेले. रुमानियन वकिलांची जुनी संस्था नष्ट करण्यांत येऊन त्या जागीं कम्युनिस्ट संचालित " वकिली विद्यापीठ " स्थापन करण्यांत आलें. केवळ बुखारेस्टमध्येंच वकिलांची संख्या १२,००० वरून घटवून २,१०० करण्यांत आली. याच एका पद्धतीनें गुलाम राष्ट्रांत कायद्यांच्या कार्याचें व खात्यांचें सोव्हिएटीकरण करण्यांत आलें. तरीसुद्धां इतक्या शीघ्रगतीनें हजारों न्यायाधीश कसे बनवले जातात हें स्वतः कम्युनिस्टच चांगल्या प्रकारें सांगू शकतील. कॉमरेड शूबर्ट-च्याच प्रकरणाकडे लक्षपूर्वक पहा ना !

२४ जुलै ( १९५१ ) रोजीं जे लोक ( प्रागच्या प्रावदाची सूचना आहे ) स्लोव्हाक विश्वविद्यालयाची डॉक्टर ऑफ लॉज ही परीक्षा व सरकारी परीक्षा या दोन्हींमध्यें उत्तीर्ण झाले त्यांच्यांतच कॉमरेड शूबर्ट हेही होते. कॉमरेड शूबर्ट यांच्या प्रकरणाबद्दल मजुरांना एक प्रकारची विशेष आस्था वाटते—कारण कॉमरेड शूबर्ट एकेकाळीं मजूर होते.—शूबर्टनीं राजकीय अधिकाऱ्यासाठीं ठेवलेला एक वर्षाचा अभ्यासक्रम पुरा करण्याचें ठरविलें. फेब्रुआरी १९४९ मध्यें त्यांनीं अभ्यासाला सुरवात केली. अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर जिथून त्यांनीं " फौजदारी कायद्याचें पूर्ण ज्ञान " मिळवलें व मार्क्सवाद व लेनिन-वादाचें आपलें ज्ञान जास्त सखोल बनवलें, त्या ब्रातिस्लावा येथील राजकीय मुकदम्याच्या कचेरींत त्यांना अंमलदार नेमण्यांत आलें आणि लौकरच फौजदारी कायद्याचा एक सहकारी अध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली.

अशा तऱ्हेनें कॉमरेड शूबर्ट, विश्वविद्यालयांत फक्त अठरा महिने शिक्षण घेतल्यानंतर एका मामुली मजुराच्या जागेवरून वर चढून राजकीय अंमल-दाराच्या जागेवर जाऊन बसले. कम्युनिस्ट सत्ता स्थापन झाल्यानंतर सुरवातीच्या काहीं महिन्यांत प्राथमिक सोव्हिएट कायद्यांचा अभ्यास संध्याकाळीं फक्त कांहीं तास करावा आणि लोकप्रिय शासन किंवा " लोकशाहीवादी न्यायाधीश " बनावें असें भाग्य कित्येक साध्यासुध्या मजुरांना लाभलें.

अगदीं अलीकडे देखील जित राज्यांमध्यें फक्त एक वर्ष कायद्याचा अभ्यास केलेल्यांची न्यायाधीश म्हणून नेमणूक होत असे. आजदेखील या जागांसाठीं मजूरवर्गांतून उमेदवार निवडले जातात. चेकोस्लोव्हाकियाच्या दुय्यम कायदेमंत्र्यानें १९५१ मध्यें अशी घोषणा केली कीं त्यांच्या देशांतल्या ४०,००० 'लोकशाहीवादी' न्यायाधीशांपैकीं अर्धे न्यायाधीश मजूर वर्गांतून आलेले आहेत याचा अर्थ असा कीं एकट्या चेकोस्लोव्हाकियामध्यें देखील १९४८ नंतर तीन वर्षांत २०,००० मजूर न्यायाधीश बनले. ही एकच वस्तुस्थिति जरी डोळ्यांसमोर आणली तरी तीवरून देखील कम्युनिस्ट न्यायखात्याच्या कार्यपद्धतीची, कार्यक्रमाची व निर्णयाची योग्य ती कल्पना येऊं शकते.

"न्यायाधीशानें सर्वहारक वर्गाच्या पक्षाच्या बाजूनेंच कायद्याचें वाचन केलें पाहिजे." बुखारेस्ट सरकारचें कायद्याचें पत्र "नूतन न्याय" यानें असें गंभीरपणें सांगितलें आहे. आतां न्यायाच्या समतोलपणाचा प्रश्नच कुठें राहिला? न्यायाधीशाच्या रूपानें जे मजूर न्यायालयांत बसलेले असतात त्यांना सोव्हिएट कायदा म्हणजे काय हें जास्त जाणून घेण्याची काडीमात्र आवश्यकता नाहीं. त्याचें काम इतकेंच कीं विविध वर्गावर सूड उगवण्याचें एक शस्त्र म्हणून कायद्याचा उपयोग करायचा, कम्युनिस्ट पक्षाच्या उद्दिष्टांची पूर्तता करायची, या उद्दिष्टांना विरोध करण्याची कल्पना जरी कोणाच्या मनांत आली तरी त्यांना धमकवायचें, घाबरवायचें, तुरुंगांत डांबायचें किंवा ठार मारायचें. पोलंडमध्यें एका डिक्रीद्वारा (जून १९५०) जेव्हां स्वतंत्र वकिलांचा धंदा नष्ट करण्यांत आला तेव्हां "मजूर वर्गाच्या कल्याणाच्या विरोधी काम" करणाऱ्या वकिलांविरुद्ध कायदेशीर कारवाई सुरू झाली. कायद्यांवर कम्युनिस्टांनीं विजय मिळवलेला आहे. आणि त्याच कायद्यांच्या साहाय्यानें त्यांनीं पूर्व युरोपावर संपूर्ण विजय मिळवला आहे. तरीदेखील दर आठवड्याला, दर महिन्याला नवीन नवीन आदेश निघत आहेत आणि त्या आदेशांमध्यें नवीन नवीन संशोधन चालूं आहे.

**हे आदेश कम्युनिस्ट कायदे व कचेऱ्यांची आगळी क्रूरता कित्येक पटींनीं वाढवीत आहेत.**

आमच्याजवळ कांहीं प्रमुख विभागांचें संक्षिप्त चित्रण करण्यापुरतीच या पुस्तकांत जागा आहे. खरें म्हणजे या विषयावर एक मोठा थोरला ग्रंथ रचतां येईल, आणि त्याची आवश्यकताही आहे. त्या पुस्तकामध्यें काय असेल? आणि त्याचें नांव काय असेल? "कम्युनिस्ट 'न्याया'मध्यें आपली काय स्थिति होईल?" हेंच तें पुस्तक! कम्युनिस्टाचा सूड उगवण्याच्या कांहीं प्रकारांचें वर्णन खालीं दिलें आहे. आपण यांतून बचावलांत तर आपल्याला फारच भाग्यवान म्हटलें पाहिजे.

## कम्युनिस्टांचे फौजदारी कायदे—

सोव्हिएट रशियाच्या नमुन्याबरहुकूम सर्व जित देशात फौजदारी कायदेपद्धति चालू आहे. ५८ व्या परिच्छेदांत असें म्हटलें आहे: "मजुरांचे, शेतकऱ्याचे व सोव्हिएटांचे अधिकार उलथून पाडण्यासाठीं, त्यांचें नुकसान करण्यासाठीं किंवा त्यांना कमजोर बनवण्यासाठीं जें जें कांहीं केलें जाईल तें तें... किंवा सोव्हिएट संघाची बाह्यसुरक्षितता सर्व-हारक क्रांतीच्या आर्थिक, राजकीय व राष्ट्रीय कार्यक्रमाला बाध आणून त्याला निर्बल बनवणार प्रत्येक काम क्रांतिविरोधी समजलें जाईल." आपल्या अस्वस्थपणामुळें जरी आपण एकाद्या अधिकाऱ्याच्या मनासारखें काम करूं शकला नाहीं तर तेवढ्यावरून देखील तो अधिकारी आपल्याला कित्येक वर्षें सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठवूं शकतो.

५८ व्या परिच्छेदाला अनुसरून,......ज्या कुटुंबांतील एकादा मनुष्य सैन्यातून पळून देश सोडून गेला असेल त्या कुटुंबांतल्या सर्व प्रौढवयीन माणसांना पांच ते दहा वर्षें शिक्षा दिली जाते व त्यांची सर्व संपत्ति व मालमत्ता जप्त केली जाते......"देशद्रोही कुटुंबांतील सर्व प्रौढवयीन मंडळींना व अपराधाच्या वेळीं त्यांच्याजवळ असणाऱ्या सर्व इतर लोकांना पांच वर्षें सैबेरियाच्या अतिदूर इलाख्यांत पाठवून निर्वासित केलें जाईल." ......याचा अर्थ हळू हळू ठार मारणें! कोणत्याही एका व्यक्तीच्या अपराधासाठीं त्याची बायको, बहीण, भाऊ, आई बाप, आते, मामे, चुलत भाऊ-बहिणींना देखील कठोर शिक्षा भोगावी लागते.

सरकारी विभागांना अथवा राष्ट्रीय अर्थ-व्यवस्थेच्या संचालनांत ज्यायोगें विघ्न उपस्थित होईल, किंवा ज्यायोगें कायद्याचें उल्लंघन होऊन इतर कोणत्याही प्रकारें राज्याच्या सामर्थ्याला नुकसान पोंहोचेल असें कोणतेंही कार्य गुन्हा समजलें जाईल. (५९ वा परिच्छेद–सोव्हिएट फौजदारी कायदा–) असें काम करणाराचें स्वातंत्र्य दहा वर्षांसाठीं हिरावून घेतलें जाईल. जो वाहतुकीच्या नियंत्रणाचें उल्लंघन करील, किंवा गार्डीची नादुरुस्ती केल्याबद्दल ज्याला दोषी धरलें जाईल......" त्याच्या या बेकायदेशीर वागण्यानें जर आगगार्डीतील सामान, आगगाडीचे रूळ यांना नुकसान पोंचलें, तसेंच गाड्या अगर जहाजें ठराविक वेळेला पोंचण्यांत अडथळा उत्पन्न झाला... रिकामे ट्रक एका ठिकाणीं एकत्र करण्यास त्रास झाला, ट्रक अगर जहाजें वाटेंत थांबण्यास, मालगाड्या न चालण्यास मदत झाली......" तर... तर काय? प्रत्येक सोव्हिएट वाहतूकखात्यांतील नोकरावर सैबेरियाच्या भयाचें भूत आपला अंमल गाजवीत असतें. गाडीला उशीर झाला किंवा ट्रक रिकामा राहिला तरी तेवढें देखील कारण पुरतें. परंतु बाहुली राज्यांतील प्रत्येक नोकराचें दैनंदिन काम देखील अतिशय संकटमय बनलेलें आहे. मॉस्कोनें जित राष्ट्रांमध्यें अत्यंत व्यापक स्वरूपांत व अत्यंत संदिग्धपणें अपराधांच्या व्याख्या बनवून देण्यांत येणाऱ्या शिक्षांमध्यें फारच "प्रशंसापूर्ण" सुधारणा घडवून आणल्या आहेत.

आपण जर रुमानियाचे नागरिक असाल तर अस्तित्वांतही नसलेल्या कायद्यांचा भंग केल्याबद्दल आपल्याला शिक्षा मिळूं शकेल. आजपर्यंत जेवढे कायदे लिहिले गेले त्यांमध्यें न्यायाचें असें विडंबन कोठेंही झालेलें नाहीं. त्यामुळें यावर विश्वास देखील बसत नाहीं. रुमानियाच्या फौजदारी कायद्याचें एक संशोधन असें केलेलें आहे......(एप्रिल १९४९)...... "ज्यायोगें आर्थिक, सामाजिक किंवा राजकीय सांच्याला धक्का पोंचेल असा प्रत्येक गुन्हा समाजाला धोका देणारा आहे. कायद्यांत स्पष्टपणें अशा चुकांचा निषेध केलेला नसला तरी देखील अशा धोका देणाऱ्या गुन्ह्यांना शिक्षा दिली जाईल." कोणतें काम न करण्याचा गुन्हा करून आपण कम्युनिस्ट राज्यव्यवस्थेला धोका पोंचवला आहे हें कम्युनिस्ट न्यायाधीशाच

ठरवणार ! प्रचलित कायद्यांत सांगितल्याप्रमाणें अपराधाची जबाबदारी ( ही आपलीच जबाबदारी आहे ) किती प्रमाणांत धरायची व त्याची मर्यादा काय ठरवायची ह्याचा निर्णय घेतला जाईल. कम्युनिस्ट न्यायालयाच्या दृष्टीनें अशा अपराध्याला देहान्ताची शिक्षा देखील मिळूं शकते. निदानपक्षीं सक्तीच्या मजूरछावण्यांत राहण्याची दीर्घकालीन शिक्षा होईल व त्याचबरोबर आपली सारी मालमत्ताही जप्त केली जाईल. हें " लोकशाही राज्यां"तील प्रचलित फौजदारी कायद्याचें सर्वव्यापी स्वरूप आहे.

**आर्थिक अपराध—**

कम्युनिस्ट कायद्याच्या नव्या स्वरूपाचा जो कांहीं सर्वसामान्य अर्थ होतो त्या अर्थानुरूप कायद्याच्या अंतर्गत नोकरी करणाऱ्या प्रत्येक जित राष्ट्रांतील नागरिकाला भयंकर कडक शिक्षा दिली जाते. शेंकडों प्रकारचीं कामें " आर्थिक नुकसान " या सदराखालीं घातलीं गेलीं आहेत. १९५० मध्यें पोलंडच्या शासनकर्त्यांनीं दोन डिकऱ्या काढल्या आणि " ज्या गुन्ह्यांमुळें राज्याच्या आर्थिक अथवा सामाजिक हिताला बाध येईल " अशा गुन्ह्यासाठीं स्वतंत्र न्यायालयाची स्थापना केली. लांच देणें-घेणें, सट्टेबाजी करणें इत्यादींपासून ते थेट " मजुरांच्या हिताला नुकसान पोंचेल अशा तऱ्हेनें समाजांत घबराट निर्माण करणें " या प्रकारच्या सर्व संदिग्ध गोष्टींचा या गुन्ह्यांत समावेश होतो. भविष्यकालीं दुराचार करूं शकेल या आरोपाखालीं देखील हीं स्वतंत्र न्यायालयें शिक्षा देऊं शकतात. आपण नकळत कांहीं बोलून गेलांत आणि त्यानें " घबराट पसरविण्याचें " काम होईल असें या शासकांना वाटल्यास आपली निव्वळ खरडपट्टीच निघेल असें नव्हे तर आपण असा गुन्हा करूं शकाल, कदाचित् पुढच्या वर्षी करूं शकाल असाही गुप्त पोलीसाला किंवा एकाद्या कम्युनिस्ट अधिकाऱ्याला संशय आल्यास आपल्याला या आरोपाखालीं तुरुंगांत पाठवलें जाणें शक्य आहे. आपल्याबद्दल कोणाला व किती संशय आहे यावर हें सर्व अवलंबून आहे.

रुमानियांत काम करणाऱ्या अभागी व्यक्तींना निम्नलिखित सर्वव्यापी अपराधांसाठीं एक ते बारा वर्षांपर्यंत शिक्षा भोगावी लागते. " राजकीय

योजनांची पूर्तता करणाऱ्या सरकारी हुकुमानुसार काम न केल्यास...... राजकीय योजनेमध्यें उल्लेख नसला तरी एकाद्या वस्तूचें उत्पादन, वितरण, उपभोगाबाबतचें दिग्दर्शन आणि संघटना याबाबत दिलेल्या आदेशांबर-हुकूम काम न केल्यास......ही गोष्ट कम्युनिस्ट राज्यांत प्रत्येक वस्तूच्या निर्मितीबाबत......मग ज्याला सरकारी नियंत्रित कापड लागतें असा मुलांचे पंचे बनवण्याचा धंदा का असेना, पण त्याचें वितरण व उपभोगा-संबंधीं कायद्याबाबत प्रत्येक व्यक्तीला वरील नियम लागू पडतो...... कोणतें काम आदेशानुसार झालें नाहीं हें मात्र लाल नोकरशहाच ठरवतात. या कायद्याच्या "एक ते बारा वर्षां" पर्यंतच्या शिक्षेचा धोका टाळून आपण कशाही तऱ्हेनें आपलें पोट भरूं शकत नाहीं. हा रुमानियाच्या डिक्रीचा आर्थिक अपराधाबद्दलच्या शिक्षेचा पहिला परिच्छेद झाला. तिसऱ्या परिच्छेदांत गुन्ह्याचे आणखी पांच प्रकार दिले आहेत. त्यांबाबत ६ वर्षेपर्यंत शिक्षा होऊं शकते.

"उत्पादनाचें कोणतेंही यंत्र जाणूनबुजून किंवा निष्काळजीपणानें तोडल्या मोडल्यास या अपराधाबद्दल कोणाही रुमानियन रहिवाशाला ६ वर्षांची शिक्षा होऊं शकते. अतिपरिश्रमामुळें त्याच्या हातून कांहीं चूक झाल्यास तोही तितकाच गंभीर गुन्हा होतो. इतर कोणत्याही प्रकाराच्या अपराधासाठीं देखील पांच ते पंधरा वर्षांची कडक शिक्षा भोगावी लागते. शेवटीं पांचव्या परिच्छेदांत सोव्हिएट 'कायद्याचा' एक अपूर्व नमुना बघायला सांपडतो. "कोणताही कायदा प्रत्यक्ष मोडण्याइतकाच तो मोडण्याचा प्रयत्न करणें हाही गंभीर गुन्हा आहे."—आपण एकाद्यावर गोळी झाडलीत, पण आपला नेम चुकला, तरी देखील आपण हत्येला जबाबदार धरले जातां, हत्येचा गुन्हा आपल्यावर शाबीत होतो. या सर्व गोष्टींवरून हें स्पष्ट होतें कीं "लोकशाही वाद," "शांति" इत्यादि शब्दांचे कम्युनिस्ट जसे अर्थ लावतात तसाच त्यांचा "कायदा" या शब्दाचा विलक्षण अर्थ आहे. आणि हा अर्थ कोणत्याही सभ्य व्यक्तीनें आजपर्यंत लावलेल्या अर्थाच्या सर्वस्वी विपरीत अर्थ आहे. दुतोंडी कायद्याच्या भाषेनें साऱ्या जगाला एक दिवस जखडून टाकणारे साखळदंड बनवले जात आहेत.

**सरकारी संरक्षण, " शांतिनियम " वगैरेंना धोका पोंचवणारे गुन्हे—**

एल्ब झीलच्या चेक व जर्मन किनाऱ्यांमध्यें फिरणाऱ्या एका जहाजावर एक खलाशी काम करीत असे. या जहाजावरील खलाशांवर संरक्षण पोलिसांचा कडक पहारा असतो. एका रात्रीं आपल्या कामावरून परत आल्यावर तो खलाशी गणवेष घालूनच एका उपाहारगृहांत खायला बसला. शेजारच्या एका मेजावरून कोणीतरी विचारलें, " वर्तमानपत्रांत छापून येते तितकी पश्चिम जर्मनीची परिस्थिति सध्यां खरोखरच वाईट आहे का ?" खलाशानें मोठ्या प्रामाणिकपणानें सांगितलें कीं, " पश्चिम जर्मनींतल्या कोणत्याही दुकानांत आपल्याला अगदीं योग्य किंमतीला कोणतीही वस्तु मिळूं शकते आणि ज्याला जें हवें तें खरेदी करतां येतें. " त्या खलाशाचें जेवण पुरें होण्याच्या आधींच त्याला अटक करण्यांत आली. खोट्या अफवा उठवण्याच्या आरोपाखालीं त्याला सहा महिन्यांची शिक्षा झाली !

लाल सरकारचे सोव्हिएट धर्तीवरचे " शैक्षणिक-मजूर-कायदे—याचा अर्थ सक्तीच्या मजूर छावण्याबाबतचे कायदे—कम्युनिस्ट " कायद्यां"त सर्वांत महत्त्वाचे व सर्वांपेक्षां भयंकर आहेत. या कायद्यांबद्दल " सक्तीच्या मजूर छावण्या " या विभागांत सविस्तर सांगितलें आहे. परंतु सक्तीच्या छावण्यांत पाठविण्यांत येणाऱ्या बहुसंख्य व्यक्तींना ' मृत्युमुखां'त टाकलें जातें, किंवा ' उपाशी मारलें ' जातें; अशी परिस्थिति असल्यानें इथें यासंबंधीं थोडेंफार सांगणें जरूरीचें आहे. इतक्या मोठ्या प्रमाणावर आणि इतक्या निर्दयतेनें, तसेंच इतक्या दीर्घकाळांत पण हळू हळू माणसाला नष्ट करण्याच्या पद्धति आजवर कधीं अस्तित्वांतही आल्या नव्हत्या किंवा कधीं उपयोगांतही आणल्या गेल्या नव्हत्या. कारण "पुन्हां शैक्षणिक मजुरीसाठीं." पाठवल्या जाणाऱ्या लोकांपैकीं शेंकडा ६० टक्के लोकांना हळू हळू आणि कांहीं अनिश्चित काळांत ठार मारलें जातें. कम्युनिस्ट कायद्याचें प्रमुख अंग अक्षरशः असें आहे—

" कराल तरीही मराल; न कराल तरीही मराल ! "

समजा, नकळत आपल्या हातून पकड किंवा काड्यापेटी खालीं पडली; यामुळें जर खरोखरच पुष्कळ नुकसान झालें तर आपल्याला जाणूनबुजून मोडतोड करण्याच्या व जित देशांविरुद्ध कारस्थान करण्याच्या आरोपाखालीं देहान्त शासन दिलें जातें. " लोकशाही राज्याच्या अर्थव्यवस्थेला नुकसान " पोंचवण्याच्या आरोपावरूनच ही शिक्षा होते असें नव्हे. उदाहरणार्थ......रुमानियांत " जाणूनबुजून आपलें काम पुरें करणें किंवा निष्काळजीपणानें काम पुरें न करणें " या दोन्हींबद्दल देहान्त शासनें दिलें जातें. कोणत्याही प्रकाराच्या उद्योगधंद्यांत, वीज किंवा गॅस कारखान्यांत काम करणाऱ्या लोकांना हा कायदा लागू केला जातो. जंगलांत आग लागली, आगगाडीच्या अगर रेडियोच्या सामानाची नासधूस झाली तर या आगीचें व नासधुशीचें कारण कांहींहीं असलें तरी " राजकीय अर्थव्यवस्थेच्या सुरक्षेविरुद्ध कारस्थान " असा याचा अर्थ न्यायालय लावूं शकतें. अशा प्रकारच्या सर्व अपराधांसाठीं देहान्ताची शिक्षा दिली जाते.

देहान्त शिक्षेचा जित राष्ट्रांच्या कायद्यामध्यें आणखी एक प्रकार आहे. इतर अनेक कायद्यांप्रमाणेंच न्यायालयाच्या इतिहासांत हा प्रकार म्हणजे एक अजबच म्हटला पाहिजे. " ज्या राज्यांत मजुरांच्या हातीं सत्ता आहे " अशा " इतर राज्यांविरुद्ध " घडलेल्या किंवा इतर देशांच्या मजूरवर्गाविरुद्ध केलेल्या गुन्ह्याबद्दलही देहान्त शिक्षा मिळते. क्रेमलिनच्या गुन्ह्यासंबंधीच्या अत्यंत सुपीक डोक्यांतून निघालेली ही चीज आहे. एकाद्या रुमानियन देशभक्ताला, सोव्हिएट रशिया, पोलंड, अल्बानिया किंवा क्वचित् उत्तर कोरियाच्या " आर्थिक समृद्धि " विरुद्ध कारस्थान रचण्याच्या गुन्ह्याबद्दल गोळीला बळी पडावें लागतें. ट्रान्सिलव्हॅनियाच्या मांस डबेबंद करण्याच्या एखाद्या कारखान्यांतील कोणत्याही मजुराला आपलें काम चांगलें न करण्याच्या आरोपाखालीं गोळी घातली जाऊं शकते. कारण काय तर त्यानें सोव्हिएट उजबेकिस्तानच्या मजूरवर्गाच्या आर्थिक सुरक्षिततेला नुकसान पोंचविलें ! !

कम्युनिस्ट कायद्यांत, " यासाठीं, त्यासाठीं, सर्वांसाठीं " देहान्त शिक्षा लिहिलेली आहे. नुकताच कांहीं वर्षांपूर्वी जुन्या जितराष्ट्र लष्करी न्याय व

सैनिक फौजदारी कायद्याच्या विद्यमानें अशा तऱ्हेचा शासनांचा आगळा प्रयोग करण्यांत आला. हंगेरीच्या १९४८ च्या फौजदारी कायद्यासंबंधीच्या संहितेमध्यें देहान्त शासनाच्या परिभाषांचे पंधरा विभाग दिले आहेत. चेकोस्लोव्हाकियाच्या कायद्याच्या संहितेंत अशा प्रकारचे बारा विभाग आहेत. परंतु आपल्या व आपल्या कुटुंबीयांना भोगाव्या लागणाऱ्या कठोर शिक्षेचा धोका पत्करून देखील दरवर्षी शेंकडों पूर्व युरोपियन अधिकारी व सैनिक पश्चिमेकडे पळून येत आहेत.

कम्युनिस्ट कायद्याचा शेवटचा परिच्छेद म्हणजे मृत्यु ! आणि लहान सहान अपराधासाठीं देखील तो सतत जबडा पसरून उभा असतो. वास्तविक कचेरींतील कामें म्हणजे एक प्रकारचें लष्करी कोर्ट मार्शलच असतें. ऑगस्ट १९५१ मध्यें तीन चेकोस्लोव्हाकियन निर्वासितांना खोटीं रेशन-कार्डें तयार करण्याच्या अपराधाखालीं मामुली तपासाअंतीं गोळ्या घालण्यांत आल्या. कम्युनिस्ट कायद्याचें ध्येय म्हणजे आतंकाची छाया जिकडे तिकडे पसरून ठेवणें आणि त्या आतंकाच्याच आधारावर राज्य करणें हेंच होय. गुप्त पोलिसांच्या फौजा आणि शेंकडों शिक्षा-नियमांच्या आधारानें या व्यवस्थेचें संचालन कसें होतें हें समजण्यासाठीं आपल्याला प्रथम पूर्व युरोपांतील प्रत्येक रहिवाशाला या व्यवस्थेनें आपल्या जाळ्यांत कसें संपूर्णपणें पकडून ठेवलें आहे हें प्रथम बघितलें पाहिजे.

● ● ●

# खाद्य ! एक अस्त्र ! : ५ :

" मी आणि हेलन पोलीसच्या गाडीची वाट पहात बसलों आहोंत. ती गाडी आम्हांला कोठें घेऊन जाणार आहे, कांहींच कल्पना नाहीं. मी आपल्या शेजारणीजवळ हें लिहून ठेवीत आहे. आज पहाटे चार वाजतां दारांत संकट येऊन उभें राहिलें. आम्हांला आमचें सामान आवरण्यासाठीं फक्त एका तासाचा अवधि देण्यांत आला. मला फक्त थोडेसे कपडे आणि तुझ्या वडिलांचीं पत्रें घेतां आलीं. बाकी सर्वांवर पाणी सोडावें लागलें. आम्ही स्वतः वाहून नेऊं शकूं एवढेंच सामान बरोबर घेण्याची आम्हांला परवानगी आहे. "

एका ८२ वर्षांच्या म्हातारीचें हें पत्र आहे. तिनें यापूर्वी रुमानियाच्या रेड-क्रॉसमध्यें प्रमुख अधिकारी म्हणून काम केलें होतें. एका आठवड्यानंतर तिला ज्या शहरांत निर्वासित करून आणून ठेवलें होतें तिथून तिनें पत्र लिहिलें : " हा माझा नवा पत्ता. खेड्यांतल्या एका घरांतल्या एका खोलींत आम्ही पांचजणी आहोंत. दुर्भाग्यवशात् हेलन मागें क्लजमध्येंच राहिली. तिला ट्रकमध्यें बसून लागोपाठ तीन दिवस प्रवास करणें झेंपलें नाहीं. तिला वरचेवर मूर्च्छा येत होती. आम्हांला तिला एका इस्पितळांत सोडणें भाग पडलें. त्यानंतर तिची कांहींच बातमी कळली नाहीं. तिची माझी आतां पुन्हां गांठभेट होईल अशी कांहीं आतां मला खरेंच आशा वाटत नाहीं. "

पूर्व युरोपांतून " उचलबांगडी " झालेल्या हजारों, लाखों लोकांपैकीं कित्येकजण घाईघाईनें चारपांच ओळी खरडून पश्चिमेकडे राहणाऱ्या आपल्या नातलगांना आपली हकीकत कळवीत असतात. हंगेरीहून एक पत्र आलें आहे. त्याची सुरुवातच अशी—"प्रिय भाई, हें माझें अखेरचेंच पत्र आहे

असें मला वाटतें. माझ्याजवळ फक्त एक गाठोडें आहे. बाकीचें सामान चोरीलाच जाणार !—"

रशियाच्या एम. व्ही. डी. च्या नेतृत्वाखालीं रशियन गुप्तपोलीस अगदीं हृदयहीनतेनें सर्व गोष्टी अमलांत आणीत असतात. निर्वासित लोकांना सुरवातीला " पृथक केंद्रां "त नेलें जातें. सोव्हिएट रशियामध्यें १९२२ पासून जें काय घडत आलें आहे तेंच या केंद्रांत घडतें. निर्वासितांच्या हलवाहलवीबाबत गुप्त पोलिसांजवळ सगळे छापील हुकूम असतात. यापैकीं एका हुकुमविभागांत निर्वासिताना आपल्या कुटुंबापासून वेगळें काढण्याच्या पद्धतीबद्दल सांगितलेलें असतें. ती पद्धति अशी —" निर्वासित केल्या जाणाऱ्या व्यक्तीला व तिच्या कुटुंबांतील इतर दोघां जणांना पुढें त्यांची ताटातूट होणार आहे याबद्दल कांहीं न सांगतां बरोबरच घेऊन जावें... रेल्वे स्टेशनवर पोंचल्यावर कुटुंबांतील प्रमुख व्यक्तीला कुटुंबप्रमुखासाठीं खास गाडींत नेऊन बसवावें, इतर कुटुंबीयांना तिथेंच राहूं द्यावें—" बाल्टिक राज्यांतील लोकांना निर्वासित करण्याबद्दल एम्. व्ही. डी. नें दिलेल्या गुप्त आदेशांमधून वरचा उतारा घेतला आहे. पण आज हा हुकूम संपूर्ण जित युरोपमध्यें सार्वत्रिकपणें अमलांत आणला जात आहे.

कुटुंबांतल्या लोकांपासून वेगळें करणें याचा अर्थ वर सांगितला तोच. याचा अर्थ निष्पाप मुलें, पतिपत्नि किंवा कुटुंबांतलें इतर कोणीही जवळचे नातेवाईक असोत. पोलादी पडद्यामागच्या देशांत पक्षांच्या अधिकाऱ्यांना जीं कामें उपयुक्त वाटतात त्या कामासाठीं थोड्या मोठ्या वयाच्या मुलांना घेतलें जातें. लहान लहान मुलांना आपल्या आयांपासून हिरावून नेले जातें आणि नर्सरी, अनाथालयें किंवा पक्षांच्या पाठशाळेंतून घोर कम्युनिस्टी-करणासाठीं ठेवलें जातें.

बुडापेस्टचें दैनिक " स्जाबाद नेप " साऱ्या जगाला आश्वासन देऊं पाहतें—" आम्ही नेहमीं मानवाला कल्याणकारक होणाऱ्या सिद्धान्ताचेच पालन करतों. फक्त अमीर आणि जनरल यांनाच निर्वासित केलें गेलें आहे—" हें " मानवकल्याण " कशा तऱ्हेनें व्यवहारांत आणलें जातें ?

श्रीमती स्टीफन नेगी १९५१ मध्यें उन्हाळ्यांत हंगेरीहून पळून आली. वैधव्य आल्यानंतर आपला दोन वर्षांचा मुलगा लुई याचें पालनपोषण करण्यासाठीं ती एका कारखान्यांत काम करीत असे. याच वेळीं सरकारनें लष्करांत सोव्हिएट छापाच्या स्त्रियांच्या पलटणी बनवायला सुरुवात केली. आणखी एक कम्युनिस्ट डिक्री जाहीर झाली. " लष्करांत भरती झालेल्या स्त्रियांच्या मुलांचें पालनपोषण सरकार करील व मातांना जास्त वेतन देण्यांत येईल." श्रीमती नेगी कारखान्यांत दिलेलें काम पुरें करूं शकली नाहीं त्यामुळें लाल मॅनेजरनें लष्करभरतीच्या स्त्रियांच्या यादींत तिचें नांव दाखल केलें. तिला प्रथम महिला ब्रिगेडमध्यें भरती केलें आणि मुलासहित राकोसी बालगृहांत पाठवण्याचा हुकूम देण्यांत आला. बालगृहाच्या अधिकाऱ्यांनीं तिला सांगितलें कीं सरकार मुलाच्या योग्य शिक्षणाची व्यवस्था करील व त्यासाठीं तिला २००० फोरिण्ट (जवळजवळ २०० रुपये) मिळतील. आई रडायला लागली, विनवण्या करायला लागली, निष्फळ भांडायलाही लागली. तिच्या मुलाला जबरदस्तीनें तिच्यापासून हिसकावून घेतलें गेलें. तिचा मुलगा पुन्हां कधींच तिच्या दृष्टीस पडला नाहीं. शेवटीं जेव्हां ती ऑस्ट्रियाला पळून आली तेव्हां तिच्याजवळ एक सरकारी "पावती" होती. तींत लिहिलें होतें.—

> " राकोसी बालगृह असें प्रमाणपत्र देतें कीं श्रीमती स्टीफन नेगी उर्फ जूलिया कोव्हॅक्स जनसेनेच्या पहिल्या स्त्रीब्रिगेडची स्वयंसेविका आहे. तिनें आज आपला दोन वर्षांचा मुलगा लुई याला २००० फोरिण्टवर राज्याच्या हातीं सोंपविले आहे. तिनें मुलावरचे सारे अधिकार सोडले असून ते राकोसी बालगृहाच्या स्वाधीन केले आहेत."

कम्युनिस्ट राज्यांतील मजूर वर्गाच्या स्त्रियांच्या तान्ह्या मुलांना जबरदस्तीनें व सरकारी पद्धतीनें हिरावून घेतलें जातें, मग निर्वासित आर्यांना त्यांच्या मुलांच्या " वर्गशत्रु " समजून त्यांची मालमत्ता लुटली गेली तर त्यांत नवल तें कोणतें ? उचलबांगडी झालेल्या मातांच्या मुलांसाठीं रोख पैसे

मोजण्यांत लाल सरकारच्या लुटारूंना कांहींही दिक्कत वाटत नाहीं. "कुटुंबी-यांची ताटातूट करणें" हें सरकारी तत्त्व आहे. ते बदला घ्यायचा म्हणून पाळायचें. तसेंच तरुण पिढीला आपल्या कबजांत घेऊन पुरतें जिंकून घेण्यासाठीं या तत्त्वाचें पालन करायला नको का ?

**कम्युनिस्ट पोलीसराज्याच्या सरकारच्या शासनाखालीं सर्व-सामान्य लोकांची काय अवस्था होते ?**

कोणाही व्यक्तीला, मग ती पुरुष असो अगर स्त्री असो, सर्वव्यापी पोलीसखात्याकडे आपलें नांव नोंदवावें लागतें. साऱ्या युरोपभर प्रचलित असलेल्या पद्धतीप्रमाणें प्रत्येक व्यक्तीला एकएक ओळखपत्र दिलेलें असतें. तरी-देखील कम्युनिस्ट राज्यांत दोनदोनदां, तीनतीनदां सरकारीं तिकिटें बनवावीं लागतात. त्याशिवाय आपण रोजमजुरी मिळवूं शकत नाहीं. इतकेंच काय पण रस्त्यांवरून हिंडूंफिरूं सुद्धां शकत नाहीं. जित राष्ट्रांतील कम्युनिस्ट प्रत्येक व्यक्तीवर संपूर्ण नियंत्रण रहावें म्हणून आगखी तीन प्रकारचे उपाय अमलांत आणतात; ( १ ) रेशन कार्डांची व्यवस्था; प्रत्येक व्यक्तीला तिचा राजकीय हुद्दा किंवा मेहनतमजुरी, याच्या प्रमाणांत व यांच्या स्वरूपाचें अन्न मिळूं शकतें. ( २ ) "कार्य-पुस्तक" हें असल्याखेरीज कोणालाही नोकरी मिळूं शकत नाहीं किंवा नोकरींत कोणी टिकूं शकत नाहीं. ( ३ ) लोक-संख्येची राष्ट्रव्यापी नोंदणी—या पद्धतीनें प्रत्येक नागरिकाचें नांव पोलीस-खात्यांत निरनिराळ्या विशिष्ट विभागांमध्यें नोंदलें जातें. ही नोंदणी भावी आवश्यकतेसाठीं असते. प्रत्येक व्यक्तीच्या ओळखपत्राबरोबरच हेही उपाय अमलांत आणून कम्युनिस्ट अधिकारी वयांत आलेल्या नागरिकाबद्दल दोनदोनदां तीनतीनदां माहिती मिळवतात.

आपण कोणत्याही कम्युनिस्ट राज्यांत रहात असलांत तरी पोलीसांच्या प्रत्येक ठिकाणीं असलेल्या या नियंत्रणाच्या कचाट्यांतून सुटूं शकणार नाहीं. आज आपण पूर्व युरोपांत रहात असाल तर पोलीसला पूर्वसूचना दिल्याखेरीज आपण आपलें बिऱ्हाड बदलूं शकत नाहीं. सरकारी परवानगी मिळाल्या-खेरीज तुम्ही आपल्या खाजगी मालकीचें देखील घर विकूं शकत नाहीं. आपल्याला कितीही नुकसान आलें तरी जी किंमत ठरेल किंवा सांगितली

जाईल त्याच किंमतीला घर विकावें लागेल. कोणाला घर विकायचें हें देखील आपल्याला सांगितलें जाईल. किंवा...घर विकण्याचा आपला अधिकारही कदाचित् हिरावून घेतला जाईल !

**अन्न आणि भूक हीं राजकीय अस्त्रें आहेत.**

आपण किती निष्ठेनें कम्युनिस्ट राज्याची सेवा करतां, शासनकर्त्यांच्या दृष्टीनें आपल्या कार्याचें काय मूल्य ठरतें, किंवा आपल्याकडून राज्याला धोका आहे असें समजून क्रेमलिन आपल्याला ठार मारण्याच्या विचारांत आहे... या गोष्टींवर आपल्या अन्नाचें प्रमाण ठरवलें जातें. सोव्हिएट रशियाइतक्याच निर्दयतेनें अन्नाच्या प्रमाणाची ही पद्धति जित युरोपांतही अमलांत आणली जाते. नवे स्टॅलिनवादी उमरावच आपल्याला किती व कसलें अन्न द्यायचें हें ठरवतात. आपलें पोट व आपली भूक राज्याच्या दयेवर अवलंबून असते. व्यवहारांत या तत्त्वाचें संक्षिप्त वर्णन असें करतां येईल--" कॉमरेड लोकांना ओ येईस्तों खायला घाला, त्यांच्या अनुयायांना व सहकाऱ्यांना पोटभर द्या आणि धनिकवर्ग व इतर " वर्गशत्रूंना " उपाशी मारा ! "

नागरिकांचे तीन किंवा चार गट पाडून, रेशन कार्डाच्या मदतीनें कम्युनिस्ट हें काम करतात. पहिल्या गटांत कम्युनिस्ट अधिकारी, पोलीस व फौज यांतील उच्चाधिकारी, मॉस्कोसाठीं वेश्यावृत्ति करणारे लेखक आणि कलावंत, तसेंच उच्च दर्जाचे इतर खुषमस्कऱ्ये यांचा समावेश होतो. विशेष प्राधान्य मिळालेल्या यांच्या रेशनकार्डांचा उपयोग मुख्यतः पूरक अन्न मिळण्याकडे होतो; कारण या नव्या लाल उमरावांना विजेत्यांचे परंपरागत खाण्यापिण्याचे विशेषाधिकार मिळालेले असतात. कम्युनिस्टांच्या " पुरवठाखात्यांतून "--ज्याला पोलंडमध्यें यू. झेड्. म्हणतात--यांना खास सामान घेण्याचे अधिकार मिळालेले असतात. ही मोटमोटालीं कोठारें किंवा " पक्षाचीं " दुकानें असतात. या दुकानांत अगर कोठारांत जनतेच्या शत्रूंकडून " जप्त केलेलें व निर्वासिताकडून हिरावून घेतलेलें सामान भरलेलें असतें--कांबळीं, गालिचे, फर्निचर, चित्रें, फरकोट, कपडे, खाण्यापिण्याचें सामान, स्वयंपाकघरांतील भांडींकुंडीं, दारू वगैरे प्रकारचा माल असतो. सर्वांत वरच्या दर्जाचा कम्युनिस्ट सभासद फक्त आपलें रेशनकार्ड

दाखवून मन मानेल ती वस्तु खरेदी करूं शकतो. क्रेमलिनच्या उच्चाधिकाऱ्यांना वर्षाच्या बोनसच्या स्वरूपांत प्रत्येक वस्तु मोफत मिळते.

अतिपरिश्रम करणाऱ्या मजुरांपैकीं ज्यांच्याबद्दल चांगलें मत असेल अशांनाही प्रथम दर्जाचीं रेशनकार्डें मिळतात तरीपण इतर सर्व बाबतींत त्यांना दुसऱ्या गटाचे नागरिक समजलें जातें. सरकारी नोकर, कचेरींतील नोकरवर्ग, अध्यापक, व इतर पांढरपेशा कार्यकर्त्यांना दुसऱ्या दर्जाचें रेशन मिळतें. त्यांच्या कामाला तें पुरेसें समजलें जातें. वास्तविक तीन गटाचींच रेशन कार्डें असायचीं. पण रेशन मिळण्याची सहज सोय व्हावी म्हणून चार गट केलेले असतात. परंतु कम्युनिस्ट पक्षाच्या नियमांचेंही रेशन कार्ड हिरावून घेतलें जातें--पक्षाधिकारी व पोलीस यांच्याकडून शिक्षा मिळण्याआधीं जिथून खाणें मिळतें अशाच ठिकाणीं प्रथम नाजुक वार केला जातो. वास्तविक भोजनाचा अधिकार आपला; पण इथें तो पक्षाचा व राज्याचा सर्वाधिकार समजला जातो.

भोजनाचे सैद्धान्तिक अधिकार ज्यांना मिळतात अशा भाग्यशाली लोकांपैकीं आपण असलांत तरी देखील हीच गोष्ट लागू पडते. कारण सर्व प्रकारच्या रेशनच्या सवलती निषिद्ध असणारे असे लाखों पांचव्या गटाचे पूर्व युरोपियन आहेत. या बहिष्कृत नागरिकांसाठीं सोव्हिएट कम्युनिस्टांचे खालील नियम आहेत--

## त्यांना उपाशी मारा, किंवा उपाशी ठेवून आपले दास बनवा !

कांहीं खास प्रकारच्या लोकांना कमी अन्न द्यायचें आणि तें कमी कमी करीत जायचें ही व्यवस्था कोणत्याही पोलीसराज्यांत सहज होण्यासारखी असतें. हें कसें केलें जातें याबद्दल १९५१ च्या अन्नवस्त्र-संबंधाच्या रुमानियाच्या सरकारी डिक्रीमध्यें माहिती मिळते. सर्व खाजगी व्यापाऱ्यांना व स्वतंत्रपणें काम करून पोट भरणाऱ्या लोकांना तसेंच त्यांच्या कुटुंबीयांना रेशन कार्डें दिलीं जात नाहींत. अडीच एकरांपेक्षां जास्त शेतजमीन असलेले जमीनमालक, स्वतंत्रपणें शेती करणाऱ्या शेतकऱ्यांचे नोकर, सेवानिवृत्त झालेले लोक या सर्वांना हाच नियम लागू केला जातो. कोणीही स्वतंत्रपणें उपजीविका

करीत असेल, किंवा आपलें म्हातारपणचें आयुष्य आरामांत व स्वतंत्रपणें चालवतां येण्याइतके ज्यानें पैसे साठवले असतील, अशा लोकांना रेशन मिळत नाहीं. हे लोक मग काय करणार ! कसे जगणार !

अपुरें रेशन मिळणाऱ्या लोकांप्रमाणच त्यांना सरकारी रेशन दुकानांत सहा ते दसपट जास्त किंमत देऊन मर्यादित प्रमाणांत खाण्यापिण्याच्या वस्तु मिळूं शकतात. या किंमती अशा प्रकारच्या आहेत...... (रुमानियाच्या १९५१ च्या किंमती)...... २० औंसांच्या रोटीसाठीं ३८ सेंटऐवजीं २·८० डॉलर द्यावे लागतात. एक क्वार्ट (जवळजवळ तीन पावशेर) दुधासाठीं २ डॉलर; एक डझन अंड्यांसाठीं ६·६५ डॉलर; सॉसेज (मिळत असल्यास) दर पौंडाला ८ डॉलर; ज्या लोकांना रेशन अपुरें पडतें त्यांना दरमहा ४० ते ७५ डॉलर मिळकत; आणि त्यांतून इतक्या किंमती देऊन हे पदार्थ घ्यायचे ! ज्यांना रेशन कार्डें अजीबात मिळत नाहींत त्यांना प्रत्येक खाद्यपदार्थासाठीं इतके पैसे मोजावे लागतात, आणि कमींत कमी पदार्थ खावे लागतात. सर्व जित युरोपात फक्त लाल शासनकर्ते आणि मजूर सोडल्यास १९४९ नंतर इतर सर्व लोकाना खाण्याची अत्यंत टंचाई भासूं लागली आहे. आणि ती दिवसेंदिवस वाढत आहे. एका डेन्यूबच्या राजधानीच्या ठिकाणच्या गृहिणीनें या टंचाईचे परिणाम असे सांगितले—

" दीड महिना झाला; आम्हांला मांस मिळालें नाहीं; रेशन कार्डावरही नाहीं आणि सरकारी दुकानावरही नाहीं. चोर बाजारांत फक्त मांस आहे पण नवे अमीर लोकच तें विकत घेऊं शकतात. मी तीन तास रांगेत उभी होतें. दुकानात हाडांखेरीज विकायला ठेवलेलें कांहींच नव्हतें. मी दिवसभर या दुकानापुढून त्या दुकानापुढें रांगेत उभी होतें. मी आशाळभूतपणें दोन तास वाट पाहिली तेव्हां एक लहानसा मासा आम्हांला विकत मिळाला. ७५ सेंट देऊन आपण एक पौंड पालक विकत घेऊं शकतां. दुसरी कसली भाजी मिळतच नाहीं. आम्ही डुकरांना खायला घालतों तसले लहान लहान बटाटे थोडेसे आहेत. ( पूर्व युरोपांतील खूप मोठ्या बटाट्यांच्या पिकापैकीं बहुतांशीं बटाटे व्होडका तयार करण्यासाठीं रशियांत पाठविले जातात. )

गेल्या रविवारीं एक कोंबडा विकत घ्यावा असें मला वाटलें, पण एका कोंबड्यासाठीं ७ डॉलर देणें आम्हांला शक्य नव्हतें. तेव्हां आम्ही अंडीं आणि पालक यावर कसेंबसें भागवलें. पण थोड्याच वेळांत आम्हांला कडकडून भूक लागली. दररोज मी घरीं परत येतें पण कांहींही विकत न घेतां रिकाम्या हातांनीं येतें. माझ्या पोटऱ्या आणि पाय इतके आंबून गेले आहेत कीं आतां आणखी उभें राहणें मला शक्यच नाहीं."

पूर्व युरोपांतील लोक थोडीशी रोटी खातात. महिन्यामहिन्यांत त्यांना मांस दृष्टीस पडत नाहीं. आणि तेथें मुबलक असणारा गहूं, धान्य, गोमांस, डुकराचें मांस, अंडें, कोंबड्या वगैरे माल मोठ्या प्रमाणांत रशियांत पाठवला जातो. पोलंड आणि रुमानियांत ( कदाचित् इतर देखील कोठें ) "मांसाचीं सोव्हिएट कार्यालयें" उत्तम चालतात. रुमानियांत मांस डबे-बंद करून सोव्हिएट संघाकडे पाठवणारे कारखाने याच कामामुळें चालू राहिले आहेत. त्याचबरोबर युद्धसामुग्रीच्या नांवाखालीं रशियन लोक "बाहुली राज्यांतून" खाद्यपदार्थ व धान्य फार मोठ्या प्रमाणावर गोळा करीत आहेत. आणि यामुळें "खाद्यभांडारांत" राहणाऱ्या लोकांना थोड्या रेशनवर गुजराण करावी लागत आहे. क्रेमलिनला तर हेंच हवें आहे. भूक हें विजय व नियंत्रण यांचें एक मोठें शक्तिशाली अस्त्र आहे.

"बाहुली राज्यांतील" रेशनव्यवस्था बंद न होतां जास्त जास्त कडक होत चालली आहे. चेकोस्लोव्हाकियांत रेशनची टंचाई आणि वाढलेल्या व महाग किंमती यामुळें १९५१ च्या उन्हाळ्यांत हरताळ व दंगे होऊं लागले. खाणींचें शहर क्लादनो येथें पोलिसांकडून सहा मजूर मारले गेले. क्रोनोमध्यें बायकांनीं खाद्यपदार्थांच्या दुकानाच्या कांचा फोडायला सुरुवात केली. ताबडतोब संरक्षक पोलिसांच्या नव्या तुकड्या तिथें येऊन हजर झाल्या. इतकेंच काय पण मजुराच्या शहरसैन्यानें त्या क्रोधाविष्ट स्त्रियांमध्यें हस्तक्षेप करण्याचें नाकारलें. पण निराश होऊन साहसी कार्याला प्रवृत्त होणें म्हणजे पहाडावर अश्रू ढाळण्यासारखेंच आहे; कम्युनिस्टांच्या पोलिस फौजा इतक्या मजबूत आहेत कीं प्रत्येक ठिकाणीं दंगेखोरांचा ताबडतोब बंदोबस्त केला जातो. पण या गोंधळांत—

## रेशनकार्ड नसलेल्या बहिष्कृत नागरिकांचें काय होतें ?

आपल्या सांठवलेल्या पैशांपैकीं अगदीं शेवटच्या पैशापर्यंत ते सरकारी दुकानांतून अगर चोरबाजारांतून महागाईच्या वस्तु विकत घेतात. नंतर आपल्या मौल्यवान वस्तु ते एकामागून एक विकायला काढतात. त्यांना हेंच करायला भाग पाडावें हीच तर कम्युनिस्टांची इच्छा असते. बहुसंख्य लोकांजवळ जिवंत राहण्याचा हा एकच उपाय असतो. " वर्गशत्रूंना " जबरदस्तीनें गरीब बनवण्याच्या या पद्धतीचें नुकत्याच आलेल्या निर्वासित लोकांनीं फार हृदयविदारक वर्णन केलें आहे—

" दररोज हातांत कांबळी, गालिचे, तसबिरी, फरकोट, जुने कपडे किंवा कांहींतरी घेऊन रस्त्यांत हिंडणारे लोक आपल्याला दिसतील. बहुतेकांजवळचें असलें सामान फारसें मौल्यवान नसतें. कारण खऱ्या मौल्यवान वस्तु बहुतेकांनीं आधींच विकून टाकल्या आहेत. हे लोक सामान गहाण ठेवून घेणाऱ्या किंवा जुना माल विकत घेणाऱ्या दुकानांत जातात. दुकानदार जें काय देईल तें घेणें भाग पडतें. घरांतून हळू हळू सर्व मौल्यवान वस्तु बाहेर पडल्या आहेत. हजारों कुटुंबें अशीं आहेत कीं पक्षाधिकारी किंवा रशियन यांनीं घरें जप्त केल्यामुळें यांना आपल्या सर्व वस्तूंना मुकावें लागलें आहे. यांना केवळ एक किंवा दोन खोल्यांना पुरेसें फर्निचर ठेवण्याची परवानगी मिळाली. आणि यांतून कित्येक फारसे श्रीमंत नव्हतेच; आपले साधारण मध्यम वर्गाचेच होते. आतां तर हे लोक नेहमींच उपाशी रहात असल्यामुळें आपल्याजवळ असेल नसेल तें त्यांना विकावें लागतें. कांहीं तर असे आहेत कीं उन्हाळा आल्यावर ते आपला एकुलता एक गरम कोट विकून टाकतात. आणि त्याच वेळेला त्यांना ही जाणीव असते कीं आपण पुन्हां कांहीं तो विकत घेऊ शकणार नाहीं.

पोलादी पडद्यामागें वस्त्रप्रावरणें अत्यंत महाग आहेत. सरकारी दुकानांत रुमानियामध्यें ओव्हरकोटच्या कापडाची किंमत एका वाराला ३०० डॉलर इतकी आहे. पुरुषांच्या सूटचें कसलेंही कापड २०० डॉलर वार आहे. रेशन कार्ड असणाऱ्या भाग्यवान् लोकांला देखील एका पुरुषी सुटासाठीं २७६ डॉलर व बुटांच्या एका जोडाला ८३ डॉलर द्यावे लागतात.

आणि रुमानियांच्या मजुराचें वेतन सर्वसाधारणपणें दरमहा ४७·७५ डॉलर असतें. सेवानिवृत्त झालेल्या व थोड्या पेन्शनवर दिवस काढणाऱ्या लोकांना आयुष्यांत पुन्हां कधीं नवे बूट वापरायला मिळतील ही आशाच नसते !

पण पूर्व युरोपियनांपैकीं रेशन कार्ड बाळगण्याचा ज्यांचा अधिकारच हिरावून घेतलेला आहे असे लोक अत्यंत उपाशी व जास्त दुर्दैवी म्हटले पाहिजेत. या लोकांची संख्या किती आहे हें नक्की सांगणें अशक्य आहे. कदाचित् पोलादी पडद्यामागच्या सर्व देशांत मिळून, परिवारांतल्या लोकांसह मोजदाद केली तर असे लोक कमींत कमी ८० लाख ते १ करोड भरतील. त्यांना समजून उमजून हळू हळू उपाशी मारण्यांत येत आहे. राजकीय वर्चस्व प्रस्थापित करण्याचें एक साधन म्हणजे भूक आणि वर्गभेद नष्ट करण्याचें साधन म्हणजे रेशनव्यवस्था आणि या साधनांचा अवलंब करून सोव्हिएट कम्युनिझमनें जगापुढें एक आगळें उदाहरण ठेवलें आहे.

लोकांना हळू हळू उपाशी मारण्याचा कार्यक्रम तयार करणाऱ्या लोकांच्या मनांत मानवतेला उखडून टाकण्याची ही पद्धति मोठ्या प्रमाणावर अमलांत आणतांना किंचित् मात्र चलबिचल होत नाहीं. संयुक्त राष्ट्रसंघांतील कोणतेंही सत्यशोधक न्यायालय १९४९ नंतरच्या लाल बाहुली राज्यांतील अशा प्रकारच्या मृत्युसंख्येची अंदाजीं अनुमानें काढण्यावांचून कांहींही करूं शकणार नाहीं. एवढें मात्र नक्की कीं पूर्व युरोपियनांना आज हळू हळू मृत्यूच्या दाढेंत नेऊन सोडल जात आहे किंवा उपाशी ठेवून त्यांना, उपायविरहित रोगांना बळी दिलें जात आहे पुढच्या कांहीं वर्षांत कम्युनिस्टांच्या या "अज्ञात–उन्मूलना"ला बळी पडलेल्यांची संख्या नात्सी गॅस चेंबरमध्यें मारल्या गेलेल्या लोकांच्या संख्येपेक्षां देखील इतकी वाढेल कीं त्याची कल्पनाच करतां येणार नाहीं. परंतु स्वतंत्र जगाचा रोष बाहेर पडूं नये म्हणून वर्तमानपत्रांच्या शीर्षकांचा हा विषय होऊं नये याची खबरदारी घेतली जाते. जनतेची हत्या करणारी अशी कोणती पद्धत इतक्या बेमालूमपणें स्वतःला लपवूं शकली आहे ! आधुनिक काळांत फक्त सोव्हिएट शासनाखालींच या पद्धतीची आगळी उन्नति झाली आहे.

परंतु लाखों उच्च आणि मध्यमवर्गीय पूर्व युरोपियनांना उपाशी मारायला क्रेमलिन एवढें कां टपलें आहे? याचें कारण इतकेंच कीं बाहुली राज्यांत बहुसंख्य असलेले लोकच सुशिक्षित आहेत. आणि म्हणून त्यांचे "भांडवल-शाही मानदंड" आहेत. कांहीं लोकांना फाजील खर्च करण्याची संवय होती खरी, पण बहुसंख्य लोकांचें जीवन चांगल्या प्रकारें व्यतीत होत असे. पण सोव्हिएट रशियांतील जीवनाशीं तुलना करतां यांचें जीवन फारच उच्च प्रकारचें होतें. त्यामुळें पश्चिमेकडील संस्कृतीमुळें मिळणाऱ्या सवलती यांना विषासारखा वाटूं लागल्या. इतकेंच काय आपल्या गत जीवनाची आठवण काढून कोणी सुस्कारे सोडले अथवा अश्रु ढाळले तरी तो देखील कम्युनिस्ट व्यवस्थेला धोका आहे असें समजलें जातें. या लोकांचे स्वतंत्र विचार असतात, स्वतंत्र आदर्श असतात व तुलना करतांना वेगळे आधार यांच्या डोळ्यांसमोर असतात, एवढ्यावरूनच हे लोक कम्युनिस्टांना पाहवत नाहींत. म्हणूनच बोल्शेव्हिक शासनाला हे लोक सतत धोका निर्माण करणारे मानले जातात. त्यांना 'सुधारणें' अशक्य आहे. त्यांच्या आवडी निवडी कधींही असभ्य किंवा अशिष्ट बनवणें शक्य नाहीं. किंवा त्यांची विचारशीलता कोणत्याही प्रकारें आपण विकृत बनवूं शकूं असा कम्युनिस्टांना विश्वास वाटत नाहीं. जोंपर्यंत असे लोक जिवत आहेत तोंपर्यंत पूर्व युरोप आपल्या मुठींत आला आहे अशी मॉस्कोला कधींही खात्री वाटणार नाहीं. या सर्व उच्च आणि मध्यमवर्गीय लोकांसाठीं—कुठेंही कम्युनिस्ट शासन अमलांत येऊं द्या—मॉस्कोचें एकच उत्तर आहे..."त्यांना दरिद्री बनवा; उपाशी मारा; उपाशी ठेवून त्यांना दास बनवा!"

## घरांतला निवांतपणा असह्य व अशक्य आहे.

जग ज्याला कुटुंबांतला निवांतपणा म्हणून समजतें तसला निवांतपणा कम्युनिस्ट व्यवस्थेमध्यें कधींच कायम राहूं शकत नाहीं. प्रत्येक नागरिकाचें घर पक्षाला घुसायला उघडें असतें. किंवा तें घर म्हणजे कम्युनिस्ट आंदो-लकांचा अड्डा बनतें. पक्षाचें वाङ्मय छापणारे, मोहल्ल्याची देखरेख ठेवणारे, मोहल्ले किंवा घरें याचे "सेक्रेटरी," पोलिसांच्या सेवेसाटीं दिलेल्या घरांचे चौकीदार किंवा गृहनिरीक्षक, व विविध कम्युनिस्ट संस्थांचे प्रतिनिधि

या सर्वांचा त्या घरावर सतत हल्ला होत राहतो. मॉस्कोच्या शांति-आंदोलनाला पाठिंबा देण्याच्या निमित्तानें " गृहशांति समिति " स्थापन करण्याची एक नवी युक्ति आहे. या समितीचे पुढारी पक्षाचा प्रचार करतां करतांच हेरगिरीही करतात व तऱ्हेतऱ्हेची दडपणें आणीत असतात. घरांतील निवांतपणावर व्यवस्थित आक्रमणांच्या रूपानें कशा तऱ्हेनें दडपणें आणलीं जातात याचें स्पष्ट वर्णन बुडापेस्टच्या एका दैनिकानें दिलें आहे—

शांति समितीच्या सामुदायिक सभा नियमितपणें चालू असतात. यामध्यें एकमजली घरांत राहणारे भाडेकरू शांतिसंघर्षाच्या तात्कालिक प्रगतीवर विचारविनिमय करतात. गृहसमेलनांमध्यें भाडेकरूंनीं आपल्या कर्तव्याचें योग्य प्रकारें कसें पालन करावें यासंबंधींच्या पुस्तकांचें समालोचन केलें जातें......प्रत्येक माडीच्या घरावर व दारावर उत्पादन वाढवण्यासाठीं केलेल्या कार्याची एक सूचि चिकटवली जाते. प्रथम प्रथम लोकांना वाटलें कीं उघडउघड ही आपली चेष्टा चालली आहे; पण नंतर याचा प्रभाव यांतल्या सामर्थ्याची त्यांना जाणीव झाली.

आपल्याला राजकारणाबद्दल मुळींच आस्था वाटत नाहीं असें सांगणाऱ्या श्रीमती जाको यांच्या बाबतींत असेंच घडलें. पण जेव्हां स्वतःच्या केलेल्या कामांची यादी आपल्या दरवाज्यावर लागलेली तिनें पाहिली तेव्हां ती आपल्या वांट्याच्या कामापेक्षां शेंकडा १४० ते १६० टक्के काम जास्त करायला लागली. श्रीमती जाकोच्या कामानें गडबड उडून गेली. श्रीमती किसनें आपल्या पतीला विचारलें कीं 'श्रीमती जाको माझ्यापेक्षां जास्त काम कसें करूं शकते?' तेव्हांपासून कॉमरेड किस पण सतत आपल्या कामांत प्रगति करीत आहेत. भाडेकरूंच्या संविधान सन्मानासाठीं भाडेकरूंनीं विजेचा खर्च कमी करण्याचें मान्य केलें. विजेचा खर्च कमी करण्याबद्दल तीन सभासदांची समिति आहे. ( दिवा मालवा, श्रीमति किस, दिवा मालवा ! ) या घरांतले भाडेकरू व शेजारच्या दोन घरांतले भाडेकरू यांच्यांत विजेचा खर्च कमी करण्याची चढाओढ लागली.

**हेरांच्या भीतीनें जगणें असह्य करून सोडलें आहे.**

पोलीस राज्याच्या झोटिंगशाहींत कधींही न राहिलेल्या पश्चिमेकडच्या नागरिकांना कोणत्याही राष्ट्रावर शासन करणाऱ्या कम्युनिस्टांच्या ज्या पद्धतीची फारच थोडी माहिती समजली आहे ती पद्धत अशी—" कम्युनिस्ट सरकारें जाणून बुजून सर्व जनतेमध्यें भय व आतंक यांच्या पैशाचिक रूपानें सतत प्रचार करीत असतात. " " कायम भीतीची " एक समाज-मनोवृत्ति तयार करायची आणि ती कायम टिकवायची हें या सरकारचें वैशिष्ट्य ! जीवनाच्या कोनाकोपऱ्यांत शिरतांना आपण चुकीचीं पावलें कुठें टाकीत आहांत, किंवा आपल्या दोषाचा काय अर्थ होऊं शकतो हें सतत आपल्याला सांगितलें जातें. कोणिही व्यक्ति, मग ती पक्षाची अंधानुयायी असेना अगर पक्षाची सभासद का असेना—तिला स्वतःबद्दल कधींच निश्चिती वाटत नाहीं. आपल्याला आणि आपल्या कुटुंबाला खरें स्वातंत्र्य कधींच मिळणार नाहीं ही भयंकर टोंचणी प्रत्येकाला सतत लागलेली असते. राष्ट्रव्यापी नोंदणी, रेशन कार्डांची व्यवस्था, कार्यपुस्तकें, प्रवासाचे परवाने, व खाजगी जीवनावर सतत असलेलें नियंत्रण यामुळें अनिश्चितता व संशयाची भावना हळू हळू पण कित्येक पटीनें सतत वाढत असते. पोलिसाला व पक्षाला प्रत्येक गोष्ट माहीत असावी लागते. प्रत्येक व्यक्तीला सतत अशी जाणीव दिली जाते..." तुम्ही कुठेंही जा, कांहींही बोला, पण लक्षांत ठेवा, तुमच्यावर सतत डोळे रोखलेले आहेत. "

आपल्या देशांत कम्युनिस्टांनीं सत्ताहरण केल्यावर आपण त्यांतून बचावूं शकाल असें का आपल्याला वाटतें ?

आपण जोंपर्यंत कम्युनिस्ट, संधिसाधु, खुषमस्कऱ्ये, घृणा व असत्य यांचे प्रचारक, हेर किंवा जासूद बनत नाहीं—आज पूर्व युरोपच्या साडेसात करोड जनतेच्या जीवनांत यांचें होकारात्मक उत्तर मिळतें तोंपर्यंत आपल्या-पैकीं बचावणाऱ्यांचें प्रमाण १००० मध्यें १ असेंच पडेल; आणि तें सुद्धां आपण पळून जाऊं शकलांत तरच !

●●●

## शेतकऱ्यांचा स्वातंत्र्यलढा : ६ :

ऑगस्ट महिन्याची सकाळ; बारा वर्षांचा एक ट्रान्सिल्व्हनियाचा मुलगा गांवतल्या देवळांत गुपचूपपणें आला. आरकस प्रदेशांतील सामुदायिक शेतावरचे रुमानियन शेतकरी संकेताची वाटच पहात होते. दोन वर्षें पीक अगदींच घसरलें होतें, पण त्या मानानें १९५१ सालीं अकल्पितपणें व असाधारणपणें उत्तम पीक निघालें. या वर्षी शेतकऱ्यांना खरी बचत होण्याची आशा होती. आणि याच वेळीं नागरिक पोलिसांना पुढें करून पीक गोळा करणारे सरकारी लोक सर्व कांहीं घेऊन गेले. त्या मुलाला आपल्या पित्याच्या कटु निराशेची आठवण झाली. त्यानें देवळांतली घंटा पकडून जोरजोरानें वाजवायला सुरुवात केली.

घंटेचा आवाज ऐकून आरकसचे शेतकरी आपल्या घराघरांतून धांवत सुटले आणि ग्रामभवनाचा दरवाचा तोडून आंत घुसले. सभासद म्हणून त्यांचीं नांव ज्या सरकारी दप्तरांत व कागदपत्रांत नोंदलेलीं होतीं तीं दप्तरें व ते कागद त्यांनीं फाडून टाकले. कम्युनिस्ट पोलिसांचा शिपाई ( हा तिथें राहणारा नव्हता ) उगाचच आपलें पिस्तुल हलवीत होता. आणि अचानक त्यानें एक गोळी घालून त्या मुलाला ठार मारलें. पांच मिनिटांतच रागावलेल्या शेतकऱ्यांनीं त्याला लाथा-बुक्क्यांनीं तुडवून ठार मारलें. नंतर त्याच दिवशीं स्टॅलिनहून—पूर्वी याला ब्रासॉव म्हणत असत—ट्रक भरभरून शिपाई येऊन पोंहोंचले. त्यांनीं कित्येक डझनावारी शिपायांना अटक केली; त्यांचा पुढें कांहींच पत्ता लागला नाहीं. आणि अशा तऱ्हेनें आरकसमध्यें १९५१ च्या ऑगस्टमध्यें सुरू झालेली क्रांति संपुष्टांत आली.

काहीं आटवड्यांपूर्वीच बल्गेरियाच्या कम्युनिस्टांनी शहरवासीयांची एक " पीकफौज " बनवली आणि बोवाटिया नांवाच्या गांवाला पाठवली. या लोकांनीं यंत्रांचीं मोडतोड केली. यांपैकीं कांहीं हेर होते. ते बंदुका रोखून शेतकऱ्यांच्या घरांत घुसले व लपवलेलें धान्य शोधूं लागले. शेतकऱ्यांना हातांतलें काम टाकणें शक्य नसल्यामुळें त्यांनीं आपल्या बायकांना यां कारवाईविरूद्ध निषेधाचें निदर्शन करण्यासाठीं शहरसेनेच्या प्रमुख कार्यालयांत पाठवलें. शेतकऱ्यांच्या बायकांची रागाची आरडाओरड आणि उगारलेल्या मुठी पाहून शहरसैन्याचा प्रधान भेदरून गेला. त्यानें ओरडून एक गोळीबाराचा हुकूम दिला. ज्यावेळीं गोळीबार बंद झाला तेव्हां बायका-मुलांचीं वीस प्रेतें पडलेलीं होतीं. कम्युनिस्ट ज्याला " बोवाटोवाचें बंड " म्हणतात त्याचा असा शेवट झाला !

पोलंडच्या लुटज्रा नांवाच्या गांवांत ( ही देखील जुलै १९५१ मधली गोष्ट आहे. ) एका कम्युनिस्ट ट्रॅक्टर ड्रायव्हरला निश्चित हुकूम मिळाले होते. त्यानें गांववास्यांच्या खासगी मालकीच्या बगीच्यांमधल्या जमिनीच्या हद्दीवर नांगर फिरवायला सुरुवात केली. हे बगीचे म्हणजे त्यांचें हिवाळ्यांतील भोजनाचें मुख्य साधन. या बगीच्यांच्या हद्दी नाहींशा करण्याचा मुख्य उद्देश म्हणजे शेतकऱ्यांच्या जमिनीचा शेवटचा तुकडाही हिरावून घेणें हा होता. एका शेतकरणीनें आपल्या कुटुंबाच्या जमिनीच्या हद्दीवर नांगर चढवलेला पाहिला. ती धांवत ट्रॅक्टरच्या ड्रायव्हरजवळ गेली आणि जमिनीवर लोळण घेऊन म्हणाली, " आधीं तुला मला मारावें लागेल. " ड्रायव्हरनें शिव्यांची लाखोली वाहायला सुरुवात केली; पण ती आपल्या जागेवरून तसूंभरही हलली नाहीं. ते गांववाले देखील फार हट्टी होते. त्यांना एक उदाहरण हवें होतें. त्या ड्रायव्हरनें ट्रॅक्टर चालवला व तो त्या शेतकरणीच्या पायांवरून गेला. शेवटीं तो पाय कापावा लागला !

या प्रसंगानंतर त्या इलाख्याच्या कम्युनिस्ट वर्तमानपत्रांत पुढीलप्रमाणें हकीगत प्रसिद्ध झाली : " लुटज्रा गांवांत आपल्या शेताचें सामुहीकरण होत असलेलें पाहून एक शेतकरीण इतकी खूष झाली कीं आपल्या हातांत फुलें घेऊन ट्रॅक्टर ड्रायव्हरला देण्यासाठीं धांवली. पण ती

ट्रॅक्टरजवळ 'जोतांनीच पाय घसरून नेमकी यंत्रासमोर पडली. आणि अचानक ट्रॅक्टर तिच्या अंगावरून गेला."

एका जमिनीच्या तुकड्यासाठीं आपलें जीवन धोक्यांत घालणाऱ्या कोणी तरी शेतकरणी असतील का ? अशा हजारों बायका आहेत. कोणत्याही शेतकऱ्याचें जमीन हेंच जीवन असतें. कम्युनिस्टीकरणांतून बचाव करण्या-साठीं पूर्व युरोपियनांचा लढा १९४९ पासून चालत आला आहे. दरवर्षी या लढ्याचा जोर वाढतच आहे. हें युद्ध अशा प्रकारचें आहे कीं त्यांत युद्धसमाप्तीचा तह नाहीं, किंवा प्रत्यक्ष युद्धसमाप्तीही नाहीं. आणि जोंपर्यंत क्रेमलिन शेतकऱ्यांची जमीन हिरावून घेण्याचा क्रम चालू ठेवील तोंपर्यंत या लढ्याचें हें स्वरूप कायमच राहील. कारण या जमिनीचे ते मालक आहेत, ती त्यांना प्रिय आहे आणि त्यांचें स्वातंत्र्य अभेद्य रीतीनें या जमिनीशीं निगडित झालेलें आहे.

**पूर्व युरोपांतील शेतकऱ्यांना सामुहीकरणाची सक्ति करण्यावर कम्युनिस्ट इतका जोर कां देतात ?**

कारण स्वतंत्र विचाराबद्दल प्रसिद्ध असलेल्या शेतकऱ्यांना आपल्या काबूत ठेवण्याचा हा एकच उपाय आहे. लेनिननें असंदिग्धपणें याची व्याख्या केलेली आहे. त्यानें म्हटलें होतें कीं, " शेतकरी म्हणजे भांडवल-शाही वर्गाचा शेवटचा गट आहे. " कम्युनिझमच्या अंतर्गत अशी गोष्ट असते कीं जो स्वतः आपला मालक बनूं शकेल अशा शेतकऱ्यांच्या जमिनी हिरावून घेणें प्रथम जरुरीचें आहे. लेनिननें रशियामध्यें बोलशेव्हिकांच्या अनुभवाचें वर्णन केलें होतें......" जमीनदारांना मारून हांकलणें किंवा भांडवलदारांना पळवून लावणें कठीण नव्हतें. " पण शेतकऱ्यांना आपल्या जमिनीपासून विभक्त करणें हा वर्गसंघर्षाचा सर्वांत कठिण व महत्त्वाचा भाग आहे. कारण शेतकऱ्यांवर संपूर्ण विजय मिळवल्याखेरीज कम्युनिस्टांची सत्ता कायम टिकणें असंभवनीय आहे. (कोणत्याही पश्चिम देशांतील शेतकऱ्यांनाही ही गोष्ट लागू पडते.)

शृंखलांनीं बद्ध केलेल्या अत्यंत दरिद्री अशा स्वरूपांत जित युरोपांतील शेतकऱ्याचें परिवर्तन घडवून आणावयाचें हें क्रेमलिनचें ध्येय ! कम्युनिस्टांनीं

१९४५–४६ च्या जमीनसुधारणेपासून सुरुवात केली आणि त्या कार्याच्या साहाय्यानें जमीनदारी नष्ट केली. जमीनदारांनीं व देवळांनीं–विशेषतः हंगेरी व पोलंडमध्यें–गेल्या कित्येक पिढ्यांपासून सामंतशाही रियासतींवर आपला पूर्ण अधिकार प्रस्थापित केलेला होता. या सामंतशाही जमीनदारांनीं काळ बदलल्यावर आपण काळाबरोबर बदलण्याचें नाकारलें. त्यांनीं सुरवातीलाच स्टॅलिनवाद्यांना एक सामर्थ्यशाली अस्त्र मिळवून दिलें, तें म्हणज शेतकऱ्याचें सहकार्य. मोठमोठ्या जमीनदाऱ्यांचें पुन्हां विभाजन करून स्टॅलिनवाद्यांनीं हें शेतकऱ्यांचें सहकार्य मिळवलें.

पण जाणूनबुजून फसवण्याचा हा क्रेमलिनचा एक डाव होता. जमिनीचे हे तुकडे मुळांतच इतके लहान होते कीं जमीनमालक कसाबसा त्यावर गुजराण करीत असे. आणखी कांहीं ऋतु निराशाजनकच झाले असते तर सामुहिक शेतीकरणासाठीं यांना सहज भाग पाडतां आलें असतें. दिवाळें काढा किंवा आमच्यांत सामील व्हा––ही लहान शेतकऱ्यांना हवालदिल करण्याची कम्युनिस्टांची पद्धत आहे.

पण शेतकऱ्याची जमीन हिरावली गेली तरी त्याच्या हटवादी स्वातंत्र्याच्या संवयी व त्याचा आत्मा यांना कसें तोडणार? या बाबतींत आतां तीस वर्षें उलटलीं तरी देखील शेतकऱ्याची मान फारशी खालीं झुकलेली आढळत नाहीं. अशा तऱ्हेनें पूर्व युरोपांतील शेतकऱ्यांना शृंखलाबद्ध करून दडपून टाकण्यासाठीं कम्युनिस्टांची क्रूर लढाई आतां सुरू झाली आहे. पण त्यांना अशा घोर लढाईला तोंड द्यावें लागणार आहे कीं त्याची आतांच कांहीं कल्पना करतां येणार नाहीं. या लढाईत सहा जित राष्ट्रांतील (यांत पूर्व जर्मनी नाहीं) जवळजवळ साडेपांच करोड शेतकरी आणि त्यांचीं कुटुंबीय मंडळी सामील झालेली आहेत. "कम्युनिझमच्या मार्गांत शेतकरी हीच सर्वांत मोटी अडचण आहे" हें लेनिनचें कथन हे शेतकरी दररोज सिद्ध करून दाखवीत आहेत.

पण पूर्व युरोपांतील बहुसंख्य शेतकरी आपल्या सामर्थ्याच्या प्रत्येक साधना-निशीं सामुहीकरणाला विरोध करीत आहेत. कोयता आणि नांगर चालवि-णाराच आज क्रेमलिनचा सर्वांत मोठा विरोधक आहे. कम्युनिझम आणि

शेतकरी यांच्यांतली लढाई सर्वांत मोठी लढाई आहे. पण शेतकरी इतक्या दृढपणें व साहसानें सामुहीकरणाला विरोध कां करतात ? याचें उत्तर दुसऱ्या एका प्रश्नाच्या उत्तरांत मिळतें—

## कम्युनिस्ट राज्यांत शेतकऱ्यांची काय स्थिति होते ?

त्यांना दिवसें-दिवस सतत एका दडपणाखालीं राहावें लागतें. त्या दडपणामुळें शेताच्या मालकाला आपला कार्यक्रम ठरवतां येत नाहीं. स्वतःचा आत्मा स्वतःचा आहे हें म्हणण्याची देखील सोय नाहीं. लाल राज्यांतील शेतकरी नोकरशहांच्या कडक हुकुमाशिवाय जर कशाची निर्मिति करूं शकत असेल तर ती म्हणजे मुलांची ! ( मुलांवर सर्वाधिकार मिळवण्याचे उपाय देखील पक्षाजवळ आहेतच म्हणा ! ) शेतकऱ्यांना काय करायला सांगितलें जातें तें लक्षपूर्वक पहा. हंगेरियन सरकारनें पशूंच्या राष्ट्रव्यापी वृद्धिसंबंधीं १९५० मध्यें काढलेला एक हुकूम याची साक्ष पटवील——

प्रत्येक हंगेरियन शेतकऱ्याच्या कोंबड्यांनीं १९५२ मध्यें १९५० पेक्षां दर कोंबडीमागें २० याप्रमाणें जास्त अंडीं दिलीं पाहिजेत असा सरकारी हुकूम होता. त्याच्या डुकरानें २२० पौंड चारा खाऊन प्रत्येकीं ४० पौंड वजन वाढविलें पाहिजे...इत्यादि . या अटळ ध्येयाच्या पूर्तीसाठीं शेतकरी व त्याचा परिवार यांना किती नुकसान सोसावें लागतें याची कम्युनिस्ट आयोजकाना तिळमात्र पर्वा नाहीं. पण शेतकऱ्याच्या मागें आणखीही बऱ्याच काळज्या आहेत. सरकारी हुकुम असा आहे कीं १९५३ पर्यंत हंगेरीच्या गुरांची संख्या ३७,०००; डुकरें दहा लाख; मेंढ्या पांच लाख व कोंबड्या ५०.३ लाख इतकी वाढली पाहिजे. प्रत्येक शेतकऱ्याला स्वतंत्र कोटा मिळतो. दर शेंकडा गायींना किती वांसरें होतील हें सरकार ठरवतें. तसेंच दर शेंकडा किती घोडे, किती डुकरें व किती बकऱ्या होतील हेंही सरकारच ठरवतें. १९५३ पर्यंत मैगयार शेतकऱ्यांनीं आपल्या प्रत्येक गाईचें दूध ४०० क्वार्ट वाढवलें पाहिजे, मग गाय कितीही म्हातारी किंवा आजारी असो ! चारा सुकला, कीड पडली किंवा परमेश्वराची आणखी कांहीं मर्जी फिरली तरी १९५२ पर्यंत गायींनीं सरकारी बेड्यावर ३,३०० क्वार्ट

आणि सामुहिक वेड्यांवर २,७०० क्वार्ट इतकें दूध वाढविलें पाहिजे आणि शेतकऱ्याच्या खाजगी गायींनीं २,५०० क्वार्ट दूध वाढविलें पाहिजे.

पण शेतकऱ्यांनीं किती वस्तु निर्माण करायच्या एवढाच मात्र हुकुम त्याला दिला जात नाहीं हं ! प्रत्येक वस्तूचा किती हिस्सा तो आपल्यासाठीं च आपल्या कुटुंबासाठीं ठेवूं शकत नाहीं, त्याच्या वार्षिक पैदाशीचा कितवा हिस्सा त्याला सरकारनें ठरवलेल्या किंमतीला —ही किंमत खुल्या बाजारापेक्षां कमी असते—सरकारी कोठारें, भांडारें वगैरे मध्यें दिला पाहिजे हें देखील सरकारच ठरवतें.

उदाहरणार्थ, १९५१ मध्यें चेकोस्लोव्हाकियाच्या शेतकऱ्यांना "सक्तीनें द्याव्या लागणाऱ्या" वस्तूंचीच गोष्ट घ्याना—! प्रत्येक गायीमागें २००० क्वार्ट दूध, दर २५ एकर जमिनीमागें ३०८० पौंड मांस ( गाय व डुकराचें मांस ), प्रत्येक कोंबडीमागें १८० अंडीं, ८८ रत्तल बदकें, ६६० पौंड भाजीचें बीं, आणि मारलेल्या प्रत्येक डुकरामागें १५ पौंड चरबी व दुसऱ्या प्रकारची ११ पौंड चरबी—

अर्थात या सर्व वस्तु पूर्णपणें न देण्यासाठीं शेतकऱ्यांनीं टाळाटाळी केली किंवा कांहीं युक्तिप्रयुक्ति अवलंबिली तर त्यांत आश्चर्य तें काय ? जी वस्तु देण्यामुळें त्यांच्यावर हलाखीची पाळी येते अशा वस्तूंची सरकारकडून भयंकर लूट केली जाते. १९५१ मध्यें हंगेरीच्या शेतकऱ्यांना २२० पौंड गव्हाच्या बदली फक्त १८ फोरिण्ट मिळाले (चोर बाजारांत याची किंमत ८०० फोरिण्ट होती. ) खाजगी शेतकऱ्याकडून १८ फोरिण्टच्या भावानें घेतलेला गहूं सरकारनें सरकारी शेतावर काम करणाऱ्या लोकाना ८० फोरिण्टला विकला व अशा तऱ्हेनें शेंकडा ४०० पेक्षां जास्त फायदा उठवला.

पण शेतकरी काय करणार ? त्याला कांहीं दिवस सामुहिक शेतीवर काम करावें लागतें. त्याला आपले हे दिवस या शेतीसाठीं द्यावेच लागतात, नाहीतर............"पैदास निरीक्षकां"कडून त्याच्या पिकाची व जनावरांची तपासणी केली जाते. यांचीच फेर तपासणी "पिकांचे कॉमिसार" करतात. त्याच्या गांवांवर आणि माल देण्याच्या अड्ड्यांवर

सशस्त्र' सैनिकांचा पहारा राहतो. "योग्य वेळीं व योग्य प्रकारें" माल देण्याची वेळ कम्युनिस्ट डिक्रीद्वारें निश्चित ठरवली जाते. तो आपला हिस्सा पुरा देऊं शकला नाहीं तर? पांच दिवसांच्या उशीरासाठीं पैदाशीच्या शेकडा ३ टक्के व वीस दिवसांपेक्षां जास्त उशीर लागल्यास पैदाशीच्या शेकडा १० टक्के भाग जास्तीचा म्हणून द्यावा लागतो.

या गोष्टींखेरीज पुन्हां आर्थिक गुन्हा व कारस्थान यासाठीं जित देशांचे स्वतःचे कायदे आहेतच. आपल्या गव्हाचा कांहीं हिस्सा किंवा डुकराच्या मांसाचे कांहीं तुकडे जो लपवून ठेवील त्या शेतकऱ्याला कित्येक वर्षे सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठविलें जाऊं शकतें व पुष्कळदां पाठविलें जातेंही. आपल्या आजारी बायकोसाठीं किंवा मुलांना गरज असेल तर थोडेसें अन्न लपवून ठेवल्याबद्दल देहान्ताची शिक्षा आहे. ही देखील पुष्कळदां दिली जाते. जर शेतकऱ्यानें रोष किंवा क्रांतीच्या भावनेची जराशी चुणूक दाखवली तरी कम्युनिस्ट शिपाई कोणत्याहि क्षणीं त्याच्या घरांतून एक लपविलेली बंदूक बाहेर काढूं शकतात आणि बंदूक लपविणें हा तर फार गंभीर गुन्हा आहे. हा शेतकरी कुठेंहि असो, कोणीही असो, या तीनपैकीं एकतरी आपत्ति त्याच्यावर नक्की ओढवणारच! त्याला फसवून, गरीब बनवून, कर न दण्याच्या अपराधाखालीं त्याची जमीन जप्त करून त्याला कोणत्याही एकाद्या सामुहिक अथवा सरकारी फार्ममध्यें सामील करून घेतलें जातें. त्याच्याजवळ इतक्या जास्त वस्तू मागावयाच्या कीं तो त्या कधींच पुऱ्या देऊं शकत नाहीं. मग अर्थातच हळूहळू त्याचें दिवाळें निघेल आणि शेवटीं त्याचे सामुहीकरण होईल किंवा त्याला सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठविलें जाईल. तिथें अर्थातच हळूहळू मरणाची वाट चालण्याचीच संभावना अधिक. दहांपैकीं एक म्हटली तरी चालेल!

## शेतकऱ्याच सामुहीकरण कम्युनिस्ट कशा प्रकारें करतात?

**लालूच दाखवून**—वर्गद्वेषाचा प्रचार करून शेतकऱ्यांमध्यें फूट पाडा—हा तर सर्व गोष्टींचा पायाच आहे. एक ते दहा एकर जमीन असणाऱ्या लहान शेतकऱ्यांना पुन्हां पुन्हां असें बजावलें जातें कीं, जास्त जमिनवालच त्यांचे खरे शत्रु होत. हे "अमीर शेतकरी" सामान्य

शेतकऱ्यांच्या गरिबीवरच मोठे होतात आणि कम्युनिस्ट सरकार मुख्यतः गरीब शेतकऱ्यांच्या रक्षणासाठीं स्थापन झालें आहे. यांना सर्वांत जास्त गरजेच्या व सर्वांत आवडणाऱ्या वस्तू देण्याचें आश्वासन दिलें जातें. ते ते सामुहिक फार्म बनविण्यास तयार असतील तर सुरवातीला सरकारला धान्य न पोंचविण्याची देखील यांना मुभा असते. स्वतंत्र शेतकऱ्याला कधींही न मिळणाऱ्या सवलती म्हणजे नवीं यंत्रें, कमी नुकसान, जास्त पैदास, एक नवीन सुखाचें आयुष्य, अशा सवलतींचा यांना मोह पाडला जातो. त्या सुरवातीला दिल्या जातात. पक्षप्रचारक प्रत्येक वस्तु देण्याचा वायदा करतात. जसजसे अधिकाधिक ग्रामीण शेतकरी सामुहीकरणाला आपली संमति देतात, तसतसा भ्रमाचा भोपळा फुटूं लागतो; पण सुरवातीला हजारों, लाखों शेतकऱ्यांना तऱ्हतऱ्हेच्या खोट्यानाट्या आश्वासनांनीं फसवलें जातें.

**दडपण व प्रचार**—कम्युनिस्टांनीं ग्रामीण इलाख्यांत "जनतेचे शिक्षक" ठिकठिकाणीं पेरले आहेत. हे शेतकऱ्यांना सामुहिक शेती करण्यासाठीं एकसारखे चिथावणी देत असतात. कित्येक वेळां शेतकऱ्यांना यासाटीं प्रवेशपत्र भरायला हे भाग पाडतात कित्येक वेळां शेतकरी सामुहिक नांगरणीसाठीं अर्जावर सह्या करतात आणि नंतर त्यांना समजून येतें कीं, तो अर्ज सामुहिक शेताच्या स्थापनेसाठीं होता. आणि अशाच तऱ्हेनें आणखीही गांवें खोटेपणानें जाळ्यांत अडकतात.

**धूर्तपणा व फसवेगिरी**—मांजरीचीं नखें काढण्याइतकेंच शेतकऱ्याला नागविण्याचे कम्युनिस्टांजवळ कितीतरी उपाय आहेत. एकमेकांबद्दल चहाड्या सांगण्याबरोबरच शक्तीचेहि प्रयोग मोठ्या धूर्तपणें केले जातात. कित्येकदां गुप्त पोलीस एखाद्या गावावर हल्ला करून शेतकऱ्यांच्या घरांतील फर्निचर व घरें देखील जप्त करतात. दुसऱ्या दिवशीं एखादा पक्षप्रचारक तिथें येऊन निर्लज्जपणें म्हणतो, "सामुहिक शेतीमध्यें सामील व्हा म्हणजे तुमच्या सर्व वस्तु परत मिळतील."

**लुबाडा ! खूप लुबाडा ! !**

या प्रकरणासाठीं लागणारीं सर्व हत्यारें लाल नोकरशहांच्या हातांत पाजळलेलीं आहेत. खाजगी शेतकऱ्यासाठीं उत्पादनाचीं लक्ष्यें फार उच्च प्रकारचीं ठेवलीं जातात. याशिवाय शेतकऱ्याला आपल्या शेतावर पोंचण्यासाठीं कित्येक मैल लांब चालून जावें लागतें. पुष्कळ वेळ काम करून देखील तो फारच थोडी पैदास करूं शकतो. तो इतका थकून जातो कीं त्याला कोणत्यातरी सामुहिक शेतांत सामील होणें भाग पडतें. पण बहुधा स्वतःच्या मालकीच्या घरांत राहण्याची परवानगी मिळण्यासाठीं अक्षरशः त्याला सरकारी अधिकाऱ्यांजवळ भीक मागावी लागते.

अत्यंत भारी कर लावून लुबाडणें हा कम्युनिस्टांचा अत्यंत लाडका उपाय आहे. कित्येक वर्षांपासून सांठून राहिलेल्या करांचा फायदा घेतला जातो. जो शेतकरी पूर्वीचे कर देत नाहीं त्याला आगामी वर्षांत जास्तच भारी कर द्यावा लागतो. पोलंडमध्यें एका वर्षांत शेंकडा १५० टक्के कर वाढवला गेला आहे. पुढच्या वर्षी हेच कर आणखीही वाढवले जातील आणि इकडे खाद्यपदार्थांवर सरकारकडून मिळणाऱ्या किंमती शेंकडा ५० टक्के कमी केल्या आहेत.

## शेतकऱ्यांनीं सामुहीकरणाचा विरोध कशा प्रकारें चालूं ठेवला आहे ?

आरकसमध्यें देवळांतील घंटा वाजवणारा मुलगा आणि बोवाटोवाचीं हुतात्मे बनलेलीं स्त्रिया-मुलें हीं शेतकऱ्यांच्या विरोधाचीं प्रमुख व दुःखदायक उदाहरणें आहेत. सामुहीकरणाला सुरुवात झाल्यानंतर पूर्व युरोपातील शेतकऱ्यांनीं शेंकडों वेळां शारीरिक धक्काबुक्की किंवा सामना दिला आहे. पण शेतकऱ्यांचा विरोध विविध स्वरूपाचा असतो. ते आपल्या विशिष्ट परिस्थितीला अनुसरून प्रत्येक मार्गानें सामुहीकरणाला विरोध करतात. अतिशय भारी कर भरण्यापेक्षां ते आपल्या खाजगी जमिनीपैकीं कांहीं भागावर लागवडच करीत नाहींत व अशा प्रकारें कित्येक एकर जमिनीचें पीक मारलें जातें. सरकारनें ठरवलेल्या किमतीला जनावरें विकून आपली लूटमार होऊं देण्यापेक्षां गुपचुपपणें जनावराना ठार मारणें त्याना पसंत पडतें. ते जाणूनबुजून चांगल्या जातीच्या जनावरांना ठार मारतात; ओझीं

वाहणाऱ्या जनावरांकडून जास्त काम करून घेतात, आपल्या जास्तीच्या कोंबड्या नासवून टाकतात. सामुहीकरणाबद्दल वाटणाऱ्या अत्यंतिक घृणेमुळें चांगला शेतकरी नासधूस करणारा बेताल शेतकरी बनला आहे. कम्युनिस्ट नोकरशाही व प्रत्यक्ष होणारे अन्याय यामुळें व्यक्तिगत आस्था नष्ट करून टाकली आहे. व प्रामाणिकपणें आजवर केले जाणारे कठिण परिश्रम आत्मदण्डनेप्रमाणें शेतकऱ्यांना वाटूं लागले आहेत. सामुहिक शेतांमध्यें किंवा बाहेर लाल नोकरशहांना शेतकऱ्यांनीं जास्तींत जास्त सतावून सोडलें तर तें न्यायोचितच नाहीं का ?

पक्षाचे सामुहीकरणकर्ते आणि अनुयायी यांना उन्मत्त बनवणारा विरोधाभास यामुळें उत्पन्न होतो. कोणतीही गोष्ट कोणत्या मर्यादेपर्यंत जाणूनबुजून केलेलें नुकसान म्हणून समजायची ? कोणत्याही कामाला कोणत्या मर्यादेपर्यंत अयोग्य समजायचें ?—आणि विशेषतः सरकारी शेतकीशासनांत तथाकथित तज्ञ व दुर्व्यवस्थेनें भगदाडें पाडलीं आहेत अशी अवस्था असतांना—डुकरें किंवा कोंबडे अत्यंत कामामुळें मेले कीं रोगानें मेले हें कसें समजायचें ?

उन्हाळ्यांत हजारों एकर पीक "अचानक लागलेल्या आगींत" भस्मसात् होऊन जातें. कित्येक शेतकऱ्यांना आग लावण्याच्या आरोपाखालीं फांशीं दिलें गेलें. पण आग लागणें चालूंच आहे. भयंकरांत भयंकर शिक्षा होऊनही डुकरें आणि गायी यांना अयोग्य मार्गानें मारणें चाललेंच आहे. सामुहीकरण जसजसें वाढत आहे व आपला पाश अधिकाधिक आवळीत आहे तसतसा शेतकऱ्यांचा विरोध तीव्र होत चालला आहे. गुलाम राष्ट्रांच्या जनतेमध्यें केवळ शेतकरी हाच एक असा घटक आहे कीं त्याला विरोध करण्याची संधि मिळूं शकते व तो तिचा फायदा घेत आहे. एक प्रकारची गनिमी काव्याची लढाई खेळून ते अधिकाधिक विरोध करीत आहेत. उफाळून येणारा राग व जुन्या युक्त्याप्रयुक्त्या यांच्या सरमिसळीच्या लढाईत—

**सामुहिकपणें निर्वासित करण्याचें काम व क्रूर हत्याकांड चालूं असूनही शेतकऱ्यांचीं बंडें होतच असतात.**

गांवांत जाणूनबुजून करण्यांत येणाऱ्या मोडतोडीची पूर्व युरोपियनांचा बहादुरी कम्युनिस्ट कायद्यांच्या कडकपणाशीं अजमावली पाहिजे. एक कायदा असा आहे—"असा सामुहिक अथवा सरकारी संपत्तिबद्दल कोणत्याही प्रकारचा निष्काळजीपणा, शेताचीं अवजारें व जनावरें यांचें नुकसान करणारें कोणतेंही काम देशद्रोह व राज्याच्या शत्रूंना मदत आहे असें मानण्यांत येईल." पण सतत देहान्त शिक्षा देण्याचें सत्र चालू असूनही शेतकऱ्यांचा हटवादीपणा कांहीं मोडतां आलेला नाहीं. गुलामासारखें काम करतांना व द्वेषपूर्ण शोषण चालू असतांनाही त्यांची लेशमात्र पर्वा न करतां शेतकऱ्यांचा राग वरचेवर प्रकट होत असतो. पोलादी पडद्यामागें आमरण कैद व देहान्त शिक्षा यांना देखील सैरवैरपणें पण सतत होत राहणाऱ्या शेतकऱ्यांचा विद्रोह नष्ट करण्यांत यश आलेलें नाहीं.

स्वतंत्र शेतकऱ्यांचें कोणतेंही कृत्य अक्षम्य ठरत नाहीं. कारण त्याला नियंत्रणाखालीं ठेवतां येत नाहीं; जमिनीच्या मालकीसंबंधीं त्याला वाटणारी तीव्र ओढ आणि आपल्या जीवनावर आपलेंच स्वामित्व असावें ही त्याची आकांक्षा, या सर्व गोष्टी करतां येत नाहींत. म्हणूनच कम्युनिस्ट निर्दयतेनें त्यांचा सूड उगवीत असतात. रुमानियाचा एक चक्षुर्वैसत्यं अहवाल आहे—"कित्येक गांवच्या लोकांना तळघरांत कोंडून ठेवण्यांत आलें. या तळघरांमध्यें गुडघ्यांइतकें पाणी सांठलेलें होतें. दोन दिवसांनीं या लोकांना बाहेर काढलें तेव्हां जिवंत माणसापेक्षां मेलेल्यांचीच संख्या जास्त भरली. कांहीं जणांना इतकें मारण्यांत आलें कीं त्यांच्या बरगड्यांचा चक्काचूर झाला. इतर सगळे मरून गेले. "सर्व अमीर शेतकऱ्यांना रोटीसाठीं भीक मागतांना पाहण्याची आमची इच्छा आहे," असें म्हणणाऱ्या दुसऱ्या शहरांतल्या पक्षसभासदांनीं यांना मारलें होतें.

शेतकऱ्यांवर दया केली जात नाहीं व तेही दया दाखवीत नाहींत. वाऱ्याच्या झोतानें ठिणग्या जास्त जास्त प्रज्वलित व्हाव्या त्याप्रमाणें शेतकऱ्यांचा राग भडकत असतो. स्वातंत्र्यासाठीं चाललेला हा यांचा लढा नजीकच्या भविष्यांत लौकर संपेल असें दिसत नाहीं. अगर त्यांच्यापैकीं बहुसंख्य लोकांना कैदखान्यांत कोंडून ठेवण्यामध्यें अगर ठार मारण्यामध्यें

स्टॅलिनवाद्यांना यश मिळालें तर काय होईल? पश्चिमेकडच्या लोकशाही राज्यांतल्या प्रत्येक नागरिकाच्या दृष्टीनें हा व्यक्तिगत धोका असून त्याला फार महत्त्व आहे. जर पुष्कळशा जमिनीचे मालक असलेल्या शेतकऱ्यांना आपल्या जमिनीपासून दूर करून निर्वासित अगर नष्ट करण्यांत आलें तर पूर्व युरोप कायम सोव्हिएटीकरणाच्या जवळ जाऊन पोंहोंचला आहे असें मानणें भाग पडेल. पश्चिमेविरुद्ध सफलतापूर्वक युद्ध करण्याची क्रेमलिनची शक्ति फार वाढेल. सोव्हिएट वर्चस्वाविरुद्ध भविष्यकाळीं मोठ्या प्रमाणावर लपूनछपून गनिमी काव्यानें लढण्याचा संभव फार कमी होईल. पूर्व व पश्चिम यांचें युद्ध झालेंच तर इतका काळ लागेल कीं त्याची कल्पनाच करणें कठीण!

**मॉस्कोनें पूर्व युरोपांतील स्वतंत्र जमीनदार, अमीर व मध्यमवर्गीय शेतकऱ्यांचा जो नियमितपणें विनाश चालविला आहे त्याच्या मागें हाच अर्थ दडलला आहे.**

एक गोष्ट स्पष्टपणें लक्षांत घेतली पाहिजे. पोलादी पडद्यामागच्या देशांत क्रेमलिनच्या सुसंघटित योजनेच्या द्वारें भविष्यकाळीं मानवी जीवनाचा अत्यंत भयंकर व क्रूरपणें संहार व्हायचा शिल्लक आहे. ज्याचा नाश करायचा अशा या देशांतील लाखों शेतकऱ्यांवर क्रेमलिनचा डोळा आहे. संयुक्त राष्ट्रें व स्वतंत्र सरकारें यांनीं कांहीं जबरदस्त उपाय योजला तरच सोव्हिएट " शुद्धि "मध्यें विलंब होईल किंवा तिचें प्रमाण कमी होईल. पण जर संयुक्त प्रयत्नानें अगदीं लौकर व एकादा प्रबल कार्यक्रम आंखला जाईल तरच हें कार्य होऊं शकेल. ज्यांना अमीर शेतकरी म्हटलें जातें त्यांचा कायमचा अंत करण्याच्या आपल्या योजनेची स्टॅलिनवाद्यांनीं वारंवार घोषणा केलेली आहे. हें विनाशक कार्य म्हणजे नात्सींच्या गॅस चेंबरचें कम्युनिस्ट रूपांतर आहे; पण हें जास्त दीर्घकाळ टिकणारें व अत्यंत क्रूर उपायांनीं परिपूर्ण आहे. १९५३ किंवा १९५४ पर्यंत हें कार्य आपला संपूर्ण जोर पकडील. एकादें महायुद्ध सुरू झाल्याखेरीज हें कार्य थांबण्याचें कोणतेंही चिन्ह दिसत नाहीं—किंवा अमीर शेतकऱ्यांचा व्यापकपणें विनाश व्हायला सुरवात झाल्याबरोबर संयुक्त राष्ट्रांनीं मोठ्या दृढपणें हस्तक्षेप केला

तरच हें कार्य थांबण्याचा संभव आहे. कांहीं होवो, पण आपल्याला कांहीं माहीत नाहीं ही सबब सांगण्याची संधि आतां स्वतंत्र राष्ट्रांतील पुढाऱ्यांना मिळणार नाहीं. जमिनींचे मालक असलेल्या शेतकऱ्यांना मोठा प्रमाणावर निर्वासित करण्याच्या व ठार मारण्याच्या आपल्या योजनांची कम्युनिस्ट आरडून ओरडून घोषणा करीत आहेत—बल्गेरियाच्या एका दैनिकानें अशी घोषणा केली—" शहरांत भांडवलशाही वर्ग मुळापासून उखडून टाकण्यांत आला असला तरी अजून शहरांत असें झालेलें नाहीं. आतां भांडवलशाही वर्गानें गांवामधल्या श्रीमंत शेतकऱ्यांमध्यें आपले पाय रोवले आहेत. देशांतील अर्थव्यवस्थेमधून श्रीमंत शेतकऱ्यांना बाहेर पडायला आमचा पक्ष व सरकार भाग पाडीत आहे. श्रीमंत शेतकऱ्यांचा नाश अनिवार्य आहे... आतां त्यांना कोणतेंच स्थान राहिलेलें नाहीं ! "

हंगेरीचे प्रमुख कम्युनिस्ट पुढारी मात्यास राकोसी यांनीं फेब्रुआरी १९५१ मध्यें अशी घोषणा केली......" आमच्या विकासांत सर्वांत मोठा अडथळा हा आहे कीं आमचा एक पाय समाजवादी जमिनीवर असला तरी दुसरा पाय शेंकडों, हजारों खाजगी शेतांमध्यें अडकला आहे." त्यांनीं हंगेरीच्या सगळ्या मध्यमवर्गीय शेतकऱ्यांना आपले " पक्के शत्रु " म्हणून जाहीर केलें आहे. वेळ येतांच यांची वाट लावली पाहिजे. पोलादी पडद्यामागच्या प्रत्येक देशांत स्टॅलिनवादी हीच व्यापक व्याख्या पसरवीत आहेत.

थोडेसें सोपें गणित केलें तर ही गोष्ट जास्त स्पष्टपणें लक्षांत येईल. वारंवार हजारों विशेषणें देण्यापेक्षां थोडेसें गणित जास्त समजावून देतें. हंगेरीमध्यें सरकारी सूचीप्रमाणें श्रीमंत व मध्यमवर्गीयांची संख्या मोजलेली आहे ती पहा; श्रीमंत शेतकऱ्यांच्या कुटुंबांत जवळजवळ ४,६६,००० माणसें; मध्यमवर्गीय शेतकऱ्यांच्या कुटुंबांत जवळजवळ ४,९३६,००० माणसें; एकंदर संख्या ३४ लाख पुरुष, स्त्रिया व मुलें थोडी जास्तच; हंगेरीची लोकसंख्या ९५ लाखांपेक्षा थोडी जास्त; अशा तऱ्हेनें देशाच्या लोकसंख्येच्या शेंकडा ३३ टक्के जनता जमिनीची जप्ती, निर्वासन, सक्तीची मजुरी व पूर्ण विनाश यांच्या साहाय्यानें सामुहीकरण करण्याच्या सूचीमध्यें नादला गेलेली आहे.

मात्यास राकोसी हंगेरीचे " बाहुली-झार " आहेत. तरीदेखील स्टॅलिन-वाद्यांच्या दुसऱ्या पायाखालीं दडपल्या गेलेल्या लोकांना धमकावण्याची त्यांची ताकत नाहीं. त्यांनीं सप्टेंबर १९५१ मध्यें बाजारांत भाषण करीत असतांना " देशांतील जमिनीची मालकी असलेल्या प्रतिकारकर्त्यांची " निंदा केली होती; त्यावेळीं त्यांना या लोकांच्या अटळ आस्थेची व तीव्र ओढीची आठवण झाली. राकोसीनें कटाक्षानें म्हटलें होतें—" जिथें आधींच एक करोड चाळीस लाख लोक बेकार आहेत व जिथें शेतकरी आपल्या मुलांना नासकीं फळें खायला घालतात त्या अमेरिकेंत मला जायचें आहे. "

मध्येंच एक शेतकरी उठून ओरडला, " या नालायकांना असेंच हवें. यांना अमेरिकेला जाऊं दे."

या उपहासपूर्ण वाक्याबरोबर शेतकरी श्रोते हंसत उठले. ते हंसून आणि टाळ्या वाजवून राकोसीच्या तोंडावरच त्याची टिंगल करूं लागले...

असे आहेत पूर्व युरोपांतले लाखों शेतकरी ! जोंपर्यंत त्यांच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत स्वतंत्र जीवनाचें कम्युनिस्टीकरण करण्याच्या कार्याला ते विरोध करीत राहतील. अजून जे लोक स्वतंत्र आहेत त्यांनीं या लोकांची आठवण विसरतां कामा नये.

देवळांतली घंटा वाजवण्यामुळें ट्रान्सिल्व्हानियाचा एक मुलगा मारला गेला. त्यानें ती घंटा काय फक्त आरकसच्या शेतकऱ्यांसाठींच वाजवली होती ? त्या घंटेचा आवाज साऱ्या जगभर घुमत होता.

●●●

कम्युनिस्ट शासनामध्यें ट्रेड युनियनिस्टांनीं कोणत्याही प्रकारचा क्षोभ दाखवला तरी त्यांची तीव्र निराशाच होते. निराशा होत असली तरी देखील ते सतत आपला क्षोभ प्रकट करीतच असतात. पोलंडच्या जवळ-जवळ ६००० मजुरांनीं २९ जुलै १९५१ रोजीं विलना येथील चौकांत एकत्र जमून ज्या वेतनव्यवस्थेमुळें त्यांच्या वेतनांत घट झाली होती त्या व्यवस्थेविरुद्ध क्षोभ प्रदर्शित केला होता.

गुप्त पोलीस व लष्करी पलटणींनीं क्षोभ निदर्शकांवर सर्व बाजूंनीं हल्ला केला. त्यांची फाटाफूट करून त्यांना मारलें. शेंकडों लोकांना गिरफदार केलें. दुसऱ्याच दिवशीं बंदूकधारी शिपायांनीं गोळीबार करून मजुरांच्या चाळीस पुढाऱ्यांना ठार केलें—मजुरांना क्रेमलिननें आपल्या खाक्याची थोडीशी चुणूक दाखवली. मजुरांचें आंतरराष्ट्रीय गीत " हे जगतांतल्या दुःखीजनांनो, उठा, जागे व्हा. " पण धाकदपटशा व मारपीट करून सर्वहाराचे रक्षक त्या गीतांतले शब्द बदलून " भुकेच्या गुलामांनों, पडून रहा " असें गीत तयार करीत आहेत. त्यांनीं पूर्व युरोपांतल्या दीड करोड औद्योगिक मजुरांना एकत्र बांधलें आहे खरें; पण ते दुर्दशा व बेड्या यांमध्यें ! " न्याय प्रहार-वृष्टि करीत आहे "—पण बोल्शेव्हिक क्रांतीच्या आसनावरून नव्हे; तर स्वतंत्र राष्ट्रें व बाहेरच्या जगांतील ट्रेड युनियन संस्थांकडून !

**जित युरोपांत कम्युनिस्ट शासनामुळें मजुरांची काय अवस्था झाली आहे ?**

मजुरांचा स्वतंत्र संमेलनाचा अधिकार, सामुदायिक रीतीनें आपल्या मागण्या पुढें मांडण्याचा, ट्रेड युनियनांच्या निवडणुकांत स्वतंत्र मत

देण्याचा, एक नोकरी सोडून दुसरी नोकरी धरण्याचा व हरताळ पाडण्याचा अधिकार इत्यादि सर्व अधिकार मजुरांच्या हातून काढून घेण्यांत आले आहेत. लष्करांतल्या शिपायांप्रमाणेंच कम्युनिस्ट सरकार मजुरांची भरती करतें व वाटेल त्या ठिकाणीं नोकरशाहीच्या हुकुमाप्रमाणें काम करायला भाग पाडतें. एका दिवसाच्या वेतनासाठीं किती प्रमाणांत काम करायचें हें रोजीं कामाचें प्रमाणही सरकारच ठरवतें. त्याचप्रमाणें सरकार ठरवील तेंच वेतन मजुरांवर लादलें जातें. त्यांच्याकडून जास्त काम करून घेतलें जातें; पण या जास्तीच्या कामाचा मोबदला फार करून त्यांना मिळत नाहींच. एक खाजगी 'कार्यपुस्तक' त्यांच्याजवळ असतें. त्या पुस्तकाबरोबरच त्यांचें नांव नोंदलें जातें. पण या पुस्तकांत एकदां नांव दाखल झालें कीं नोकरी सोडायची झाल्यास खूप कडक शिक्षा भोगावी लागते. आणि या पुस्तका-शिवाय नोकरीच मिळत नाहीं. मजुराला सक्तीनें कांहीं तास किंवा कांहीं दिवस फुकट काम करावें लागतें. आणि अशा कामाला, राज्यासाठीं "स्वेच्छेनें केलेलें काम" असें नांव दिलें जातें. ज्या पूर्व युरोपला क्रेमलिननें "मजूर व जनतेचें लोकशाही राज्य" म्हणून संबोधलें आहे तिथल्या स्त्रीपुरुष मजुरांची ही अवस्था !

उदाहरण म्हणून कम्युनिस्टांचा एक मजुरांसंबंधीचा कायदा पहा. ( हंगेरीचा ) या कायद्यान्वयें, "जो आपलें काम सोडून कंपनीच्या कायद्यांत अडथळा आणतो," त्याला पांच वर्षेपर्यंत शिक्षा देतां येते. स्टॅलिनवाद्यांच्या "मजूर अनुशासना"च्या कायद्यांनीं कामावर गैरहजर असणाऱ्या मजुरांची पगारकपात करायला सुरुवात केली आहे. गैरहजर राहण्याच्या गुन्ह्यासाठीं सक्तीच्या मजूर छावण्यांत देखील पाठवलें जातें. अगदी मामुली अपराधा-साठीं देखील मजुराचें रेशन कार्ड हिरावून घेतलें जातें.

**कम्युनिस्ट लेबर युनियनच्या सभासदांना किती पगार मिळतो ? त्यांची एकंदर कमाई किती असते ? त्यांना 'खिशांत घालण्यासाठीं' किती पगार मिळतो ?**

जित युरोपांत सगळीकडे मजुरांचा पगार दर आठवड्याला १२ ते २५ डॉलरच्या दरम्यान असतो. पण वस्तूंच्या किमतीकडे पाहिल्यास असें दिसतें

की 'बाहुलीराज्यांत ' लें वेतन जिवंत राहण्यास आवश्यक अशा पातळीपेक्षां खालीं घसरलेलें असतें. १९३८ मध्यें बाजार स्वतंत्र होते, वस्तु मुबलक मिळत असत आणि सापेक्षतेनें पाहिल्यास वस्तूंच्या किमतीही वेताच्या होत्या. या परिस्थितीच्या मानानें सध्याचें वेतन फारच कमी आहे.

कोणत्याही कम्युनिस्ट देशांत सरकारनें ठरवलेलें वेतन मजुराला स्वतः-जवळ ठेवतां येत नाहीं. मजुराच्या पगाराच्या पाकिटावर सदाच सरकारचा घाला पडत असतो. त्याला पगारकपात स्वीकार करायला भाग पाडलें जातें. ( याला ' स्वेच्छादान ' असें नांव दिलें जातें. ) आणि तो मजूरवर्गाच्या शासनाचा अनन्य भक्त आहे असें सिद्ध केलें जातें. या भक्तीचा अधिकार मिळवण्यासाठीं त्याला आपल्या मासिक उत्पन्नाचा शेंकडा १० ते १५ टक्के हिश्श्यावर पाणी सोडावें लागतें. फंड गोळा करण्याच्या त्रासदायक व प्रसिद्ध भांडवलशाही पद्धतीवर ( स्वेच्छेनें देणग्या व फंड देणें ) लाल शासकांचा विश्वास नाहीं. आणि त्यांना हें सहनही होत नाहीं. युनियनच्या प्रत्येक सभासदानें किती फंड द्यायचा हें त्याला सांगितलें जातें आणि तेवढी रक्कम आपल्या पगारांतून कापून घेतलेली त्याला आढळते ! पद्धत जास्त कार्यक्षम आहे हें मानणें भाग पडतें.

जित युरोपांत स्टॅलिनवाद्यांनीं जे भयंकर प्रमाणांत औद्योगीकरण चालवलें आहे त्यामुळेंच त्यांच्या वेतनांत इतकी घट झाली आहे. या बृहत् विकासा-साठीं कोणत्याही परदेशी भांडवलाची मदत घेतली जात नसल्यामुळें एका पोलिश अर्थशास्त्रज्ञाच्या म्हणण्याप्रमाणें विशाल आर्थिक विकासासाठीं जनतेचे श्रम हेंच मुख्य भांडवल मिळूं शकतें. औद्योगिक मजुराला फक्त रक्ताचे पाणी करूनच काम करावें लागतें असें नव्हे तर वर सांगितल्याप्रमाणें आधींच अपुऱ्या असलेल्या स्वतःच्या पगारांतून लाल सरकारला पैशांच्या रूपानेंही भांडवल द्यावें लागतें.

याखेरिज दरवर्षी कांहीं दिवस या मजुरांना सक्तीनें बिनपगारी काम करावें लागतें. या कामांना ट्रेड युनियनिस्टांची " विशेष भेट " असें म्हटलें जातें. स्टॅलिनचा जन्मदिवस, स्वातंत्र्यदिन, मे दिन व इतर लाल उत्सवांच्या दिवशीं हें काम करावें लागतें. या सक्तीच्या उत्सवासाठीं एक किंवा दोन

आठवडे काम करावें लागतें. कम्युनिस्ट अधिकारी ट्रेड युनियनच्या सभासदांकडून एक प्रस्ताव मंजूर करून घेतात. या प्रस्तावाला विरोध करायचा म्हणजे स्वतःला कडक शिक्षा करण्याची अधिकाऱ्यांना परवानगी देणें हें होय. या प्रस्तावाप्रमाणें कांहीं ठराविक दिवशीं आपल्या कामाची वेळ हे मजूर वाढवून घेण्याचें कबूल करतात, नव्हे 'शपथ' घेतात. आणि याचा "मोबदला" म्हणून त्यांना ठरल्यापेक्षां जास्त वेळ फुकट काम करावें लागतें. नऊ महिन्यांच्या अवधींत "समारंभाचें कार्य" करण्याच्या वेळा हंगेरीमधील ज्या मजुरांना दिल्या जातात त्या खालीलप्रमाणें होतः—

(१) कोरियाचा समारोह सप्ताह—१ ऑगस्ट ते ७ ऑगस्ट १९५०.

(२) हंगेरीच्या संविधानस्मृतीसाठीं—१४ ऑगस्ट ते २८ ऑगस्ट १९५०.

(३) तुरुंगांतून राकोसीची मुक्तता झाल्याबद्दलचा दहावा वार्षिक समारंभ—सप्टेंबर १९५० चा पहिला भाग.

(४) बोल्शेव्हिक क्रांतीच्या ३३ व्या वार्षिक उत्सवासाठीं—१५ सप्टेंबर ते ३० सप्टेंबर, १९५०

(५) स्थानिक सोव्हिएटांच्या निवडणुकीच्या निमित्तानें—ऑक्टोबर १९५० चा कांहीं भाग.

(६) वार्षिक योजनापूर्ति-ऑक्टोबर ते सप्टेंबर १९५० पर्यंत.

(७) स्टॅलिनच्या जन्मदिवसाच्या गौरवार्थ—डिसेंबर १९५० चा शेवटचा भाग.

(८) हंगेरीच्या कम्युनिस्ट पक्षाच्या दुसऱ्या कॉंग्रेसच्या सन्मानार्थ—जानेवारी व फेब्रुवारी १९५१.

(९) स्वातंत्र्यदिनानिमित्त—४ एप्रिल व मार्च १९५१ चा कांहीं भाग.

(१०) मे-दिनानिमित्त—एप्रिल १९५१ मध्यें.

## कामाचा कोटा व सुटा पगार

स्टॅलिनवाद्यांनीं मजुरांना फुसलावण्यापुरती सुट्या कामाची भांडवलशाही शोषण" म्हणून निंदा केली. पण १९५१ पर्यंत त्यांनीं मात्र सुटें काम

सगळीकडे प्रचलित केलें. हंगेरीमध्यें मे १९५१ मध्यें एका डिक्रीच्या द्वारें शेंकडा ५६ टक्के मजुरांना सुस्त्या कामावर लावण्यांत आलें. पुष्कळशा कारखान्यांत वेळेपेक्षां जास्त कामाचा पगार देणेंही बंद करण्यांत आलें आहे.

मजुराच्या रोजतच्या कामाचें जें प्रमाण ठरलेलें असतें त्याबद्दल कांहीं सिद्धांतही ठरलेले असतात. पण या सिद्धान्ताचा उपयोग कशा प्रकारें करायचा किंवा त्यांचा एकाद्या प्रकारें दुरुपयोग करायचा हें ठरवून हा एक शोषणाचा मार्ग तयार केला जातो. पगारांत कपात करायची म्हणजे त्यासाठीं कामाचें प्रमाण वाढवणें अत्यावश्यक असतें. उदाहरणार्थ—हंगेरीच्या सोपरन स्टेट लॉक कंपनीमध्यें कुलुपें तयार करणाऱ्या मजुरांना ( कागदोपत्रीं ) दरमहा ४६८ फोरिण्ट दिलें जातात. पण प्रत्यक्ष दररोज १३६ कुलुपें तयार करण्याची अट असते. पण कोणताही मजूर इतकीं कुलुपें तयार करूं शकत नसल्यानें सरासरी पगार दरमहा २४० फोरिण्ट इतकाच मिळतो.

शेंकडा ५ किंवा १० टक्के अत्यंत कार्यक्षम मजुरांच्या कार्यक्षमतेप्रमाणें कामाचें प्रमाण ठरवण्यांत येतें. रुमानियाच्या जहाजी कारखान्यांतल्या मजुरांना आठ तासांच्या दिवसांत ४०० खिळे जास्त ठोकणाची सक्ति केली गेली. हा कामाचा वेळ योग्यच आहे असें दाखवण्यासाठीं पीटर बानू नांवाच्या एका अत्यंद जलद काम करणाऱ्या मजुराला लाल मालकांनीं बोलवून घेतलें. ( अशा तऱ्हेचे मजूर सैतानासारखे काम करतात. आणि आपल्या ठराविक कामापेक्षां जास्त काम करून पक्षाच प्रियपात्र बनतात. ) वर्तमानपत्रांनीं बानूच्या कामाची खूप स्तुति केली. पण रेकॉर्ड मोडणारे त्यानें ठोकलेले खिळ फारच लौकर निखळले हें कळायला कांहीं वेळ लागला नाहीं. तरी देखील जहाजी मजुरांच्या कामाचें प्रमाण ८०० खिळ्यांपर्यंत वाढवण्यांत आलें. मजूर जास्तींत जास्त दररोज ४०० खिळे ठोकूं शकतो. कामाच्या जास्त प्रमाणांत त्याचा पगार कमी करण्यांत आला. इतकेंच काय, चेकोस्लोव्हाकियाच्या कोळशाच्या खाणींतील १६ ते २० वर्षांच्या नवशिक्या पोरांनादेखील या कामाच्या प्रमाणामुळें फारच धडपड करावी लागते—पहिल्या वर्षी रोज चार गाड्या कोळसे भरायचे; दुसऱ्या वर्षी पांच गाड्या !

## समाजवादी प्रतियोगिता–हिच्या द्वारें जास्त काम करणें

लौकर काम करवून घेण्याचें नांवच "समाजवादी" प्रतियोगिता आहे. एकाद्या दुकानांतले लोक किंवा कांहीं मजुरांचे गट उत्पादन प्रमाणांपेक्षां जास्त काम करण्याची चढाओढ लावतात. जो मजूर उत्पादनाचें कोणतेंही व्यक्तिगत रेकॉर्ड मोडतो त्याला "श्रम-नायक" किंवा स्टाखानोवाईट म्हटलें जातें. त्याचे इतर मजूर मित्र त्याचा तिरस्कार करतात. कारण तो आपल्या मूर्खपणामुळें प्रत्येक मजुरावर जीव घेणें कामाचें प्रमाण लादण्याची कम्युनिस्टांना संधि देत असतो. स्टाखानोवाईट बनायचें असेल तर भयंकर सहनशक्ति, थोडीशी कुशलता आणि अगदी कमी बुद्धीची आवश्यकता असते.

पोलंडचा सर्वांत पहिला स्टाखानोवाईट विनसेंष्टी रजाव्हकी यानें पहिले सोळा महिने अगदीं संचार झाल्यासारखें काम केलें. आणि नंतर त्याला घातकी रक्तक्षयानें पछाडलें. इतकें असूनही मजुरांच्या प्रतियोगितेचा प्रचार करण्यासाठीं पक्षानें त्याला दौऱ्यावर पाठवलें. रजाव्हकीच्या दौऱ्याची बातमी गुप्त ठेवण्यांत आली. आणि कांहीं दिवसांनीं तो मरण पावला. जोंपर्यंत स्टाखानोवाईट आपल्या कामाचा वेग कायम ठेवतात तोंपर्यंत त्यांना खूप खायला प्यायला मिळतें. प्रसिद्धीही खूप मिळते. जास्त काम करणारे हे लोक आपल्या मजूर मित्रांना भडकवतात. त्यांना त्रास देतात. कारण त्यांच्या कामानें प्रमाण वाढवलें जाण्यामध्यें याच लोकांचा हात असतो.

सर्व गुलाम युरोपभर सक्तीच्या जास्त कामावर कम्युनिस्टांचें श्रमविषयक धोरण अवलंबून असतें. पोलंडमध्यें झेड्. एम्. पी. (कम्युनिस्ट युवक संघ)-तर्फें गिरणी परिषदासमवेतच स्टाखनोव्हाईट मजुरांच्या शाळा स्थापन केलेल्या आहेत "अधिक कार्य" करण्याच्या अध्यापन शाळांच जाळें विणलें जात आहे. या शाळांमध्यें जास्त काम करणारे मजूर व मिस्त्री हेच शिक्षकाचें काम करतात.

## कामांत दिरंगाई किंवा जाणूनबुजून मोडतोड

गुलामांकडून काम करवून घेणाऱ्या लाल मालकांच्या डोक्यांत सतत "श्रमअनुशासना"चें भूत थैमान घालीत असतें. सर्व जित राज्यांमध्यें

या प्रकरणीं शिक्षा देण्यासाठीं कडक कायदे केलेले आहेत. या कायद्यान्वयें मजुरांना " काम सोडण्याचा " अधिकार नाहीं. तसेंच गैरहजर राहिल्यास २५ टक्के पगार कापला जातो.

परंतु इतक्या कडक शिक्षेच्या भयाला देखील अजून मजूर भीक घालीत नाहींत. अजूनही ते फार मोठ्या संख्येनें काम सोडून जातच आहेत. त्यांची सतत गैरहजेरी हा एक मोठाच प्रश्न आहे. पूर्व युरोपांतल्या शेतकऱ्यांप्रमाणेंच युक्त्याप्रयुक्त्यांनीं व कामामध्यें अडथळे वगैरे आणून मजूर मालकांच्या हुकुमशाहीला तोंड देत आहेत. कामांतली दिरंगाई किंवा झालेली मोडतोड ही साहजिक आहे कीं जाणूनबुजून केलेली आहे हें ठरवावेयाचें कसें, हा कम्युनिस्ट मालकांपुढें फार मोठा पेंचप्रसंग निर्माण झाला आहे. मजुरांनीं केलेल्या कांहीं प्रयोगांच्या उदाहरणांवरून हें समजून येईल.

**गैरहजेरी—**

हंगेरीच्या " नेपजावा " नांवाच्या एका दैनिकानें असें छापलें होतें; " गैरहजेरीमुळें एका वर्षांत ३००,००० व ४००,००० टन कोळशांचें नुकसान होतें. " ( १३ जुलै १९५१. ) अशा तऱ्हेनें सर्व जित देशांतील उत्पादनाच्या पंचवार्षिक योजनेचें बंडखोर ट्रेड युनियन संस्था फारच नुकसान करतात.

**कष्टांचें प्रमाण—**

मजूर प्रत्येक ठिकाणीं नुकसान करण्याच्या युक्तीचा अवलंब करतात. कडक शिक्षा होत असूनही ते एका ठिकाणाहून सतत दुसऱ्या ठिकाणीं जात असतात. जित राष्ट्रांतल्या स्थानांतर करणाऱ्या अशा मजरांची संख्या जरी छापली गेली नाहीं तरी मजुरांची याबद्दल जी निंदा करण्यांत येते त्यावरूनच हे समजून येऊं शकतें.

**जाणूनबुजून केलेली मोडतोड—**

फार काम करावें लागल्यामुळें चिडलेले कामगार गुंतागुंतीच्या यंत्रांमध्यें धूळ आणि माती घालतात. " मोडतोड करणारांवर सतत देखरेख ठेवली

पाहिजे " असें कम्युनिस्ट दैनिकें सतत ओरडून सांगत असतात. "यंत्रांचें नुकसान " व " मजुरांमध्यें जबाबदारीचा अभाव " यांवर तीं दैनिकें टीकेची झोड उठवतात. रुमानियाच्या तेलाच्या विहिरींना अचानक आग लागते किंवा तेलानें भरलेल्या हौदांचीं तोंडें उघडीं राहतात. आपल्याला पकडलें तर देहान्त शासन मिळेल हें माहीत असून देखील खेड्यांतले धाडसी लोक तेलाचे नळ कापतात, फोडतात. प्रत्येक जित राष्ट्रांतील कारखाने सतत अशा " दुर्घटनां"चे रिपोर्ट पाठवीत असतात. त्यांची रहस्यपूर्ण कारणें समजणें मात्र अशक्य आहे. मोडतोडीबद्दल अगदीं कडक शिक्षा देऊनसुद्धां या मोडतोडीचे प्रमाण मुळींच कमी होत नाहीं; कारण या दुर्घटना झिजलेलीं यंत्रें पुन्हां वापरल्यामुळें, नोकरशहांच्या हस्तक्षेपामुळें किंवा अडाणी मजुरांमुळें घडतात कीं जाणूनबुजून केलेल्या या मोडतोडीच्या उपायामुळें घडतात हें कोण कसें ठरवूं शकणार ?

**अस्वीकृत आणि निरर्थक उत्पादन—**

कम्युनिस्ट वर्तमानपत्रांत नेहमीं अशा बातम्या छापून येत असतात कीं— " बल्गेरिया— सप्टेंबर महिन्यांत ९ व्या कारखान्यांत वाईट माल तयार झाल्यामुळें तो निरुपयोगी माल कोठारांमध्यें जप्त करण्यांत आला." हंगेरीमध्यें पुरुषांचे कपडे तयार करणाऱ्या क्लिपैस्ट कंपनीनें कित्येक हजार सूट असें बनवले कीं तें विकायला काढणेंच शक्य नव्हतें. कारण कोट आणि पाटलोणी यांच्या रंगांत फरक होता.

औद्योगिक क्षेत्रांतल्या या अकार्यक्षमतेला स्वतः रशियन लोकच सर्वस्वीं जबाबदार आहेत. हंगेरीची अशी एक गुप्त बातमी आहे कीं सोव्हिएट संघामध्यें तयार झालेल्या कोळशाच्या व ग्रॅफाईट इलेक्ट्रोडच्या ३२ गाड्या १९४७ पासून डायसगायारांत नुसत्या पडून आहेत. इलेक्ट्रोडची तपासणी करायला लागल्याबरोबर तें ताबडतोब विरघळून गेलें. शेवटीं १९५० मध्यें बुडापेस्टनें मॉस्कोला कळवलें कीं आतां जास्त इलेक्ट्रोड पाठवण्यांत येऊं नयेत. पण जुन्या ऑर्डरी रद्द करण्यास रशियनांनीं नकार दिला व अत्यंत खराब झालेले आणि जगांतील इतर देशांपेक्षां तिप्पट महाग किंमतीला इलेक्ट्रोड पाठवणें त्यांनीं चालूंच ठेवलें.

## आगगाडीचीं इंजिनें निम्में तेल वापरून कशीं चालवावीं ?

हंगेरीच्या रेल्वे इंजिनं कारखान्याचा प्रमुख इंजिनियर जून १९५१ मध्यें युगोस्लाव्हियांत पळून आला. यापूर्वी कांहीं आठवडे हंगेरीच्या सरकारनें तेलाचा खर्च कमी करण्याबद्दल कडक हुकूम काढले होते. कमी तेल वापरून यंत्रें सतत कार्यक्षम ठेवणें अशक्य असल्यानें हा इंजिनियर आयोजकाच्या आज्ञा पाळूं शकला नाहीं. त्यामुळें याला आपला तेलाचा खर्च शेंकडा ५० टक्के कमी करण्याबद्दल कडक हुकूम मिळाला. हा हुकूम पाळण्याखेरीज त्याला गत्यंतरच नव्हतें. लौकरच तीं आगगाडीचीं इंजिनें झिजून निरुपयोगी बनलीं. या सर्वांचें कारण माहीत असूनदेखील हुकुमाचें नीट पालन झालें नाहीं म्हणून लाल नोकरशाहीनें त्या इंजिनियरला मोडतोड करण्याच्या अपराधाखालीं गुन्हेगार ठरवलें. त्याच रात्रीं तो रशियाची हद्द सोडून आला. त्याचें म्हणणें असें आहे कीं ज्यांना "ट्रूमन इंजिनें" म्हणतात तीं इंजिनें आणि युद्धानंतर नुकतींच हंगेरीमध्यें पाठविण्यांत आलेलीं अमेरिकन इंजिनें मुळींच झिजत किंवा मोडत नाहींत.

रशियन धर्तीच्या 'कार्यक्षमतेमुळें' कम्युनिस्ट नोकरशाही टाळाटाळ करणाऱ्या व असंतुष्ट मजुरांनाच अज्ञानानें मदत करीत आहे. स्त्री-पुरुषा-प्रमाणेंच स्टॅलिनवादी यंत्रांकडूनही जास्त काम करून घेतात. यंत्रांची दुरुस्ती करणें अत्यावश्यक असलें तरी देखील अशा वेळीं हे लोक म्हणतात—ही पोलिश वार्ताहराची बातमी आहे—"राजकीय योजनांमध्यें उल्लेख नसलेली कोणतीच कंपनी अशा दुरुस्त्यांची जबाबदारी घेत नाहीं. कारण दुरुस्ती-साठीं कामाचा खोळंबा झाल्यास ठरलेल्या प्रमाणांत आपण काम पुरें करूं शकणार नाहीं अशी यांना धास्ती वाटते. त्यामुळें यंत्रें अगदीं पुरतीं मोडून पडेपर्यंत वापरलीं जातात.

### तात्बान्याच्या कोळशाच्या खाणींतील दुर्घटना—

तात्बान्याच्या कोळशाच्या खाणींत १९५० सालीं डिसेंबर महिन्यांत एक दिवस धोक्याचे कंदील दिसूं लागले. भयंकर स्वरूपाची आग लागण्याचें हें दुश्चिन्ह होतें. आगीचा धोका ओळखून काम बंद करून खाणींतून बाहेर पडण्याचा मुख्य इंजिनियरनें हुकूम दिला. पण खाणीमध्यें गंभीर परिस्थिति

निर्माण झाली असल्याचें स्थानिक कम्युनिस्ट अधिकाऱ्यांनीं अमान्य केलें. त्यांनीं बुडापेस्टला अशी बातमी पाठविली कीं हा इंजिनियर जाणूनबुजून उत्पादनाला अडथळा आणीत आहे. खाणीच्या सचिवालयांतून खाणींत मजुरांना काम करायला पाठवण्याबद्दल हुकूम सुटला. मजुरांनीं काम करण्यास नकार देतांच त्यांच्यापैकीं २०० मजुरांना अटक करण्यांत आली, आणि त्यांचें भाजीपाल्याचें पीक काढणारे मळे जप्त करण्यांत आले. तरी-देखील राहिलेल्या मजुरांनीं खाणींत उतरण्यास नकार दिला.

पण लाल सरकारनें यावर उपाय शोधून काढला. शेंकडो तरुण कम्युनिस्ट डी. आय्. एस्. झेड्. युवकसंघाच्या सभासदांना खाणींत काम करण्या-साठीं पाठवलें. पण हे लोक स्वखुशीनें काम करण्यास जात आहेत याबद्दल एका कागदावर त्यांनीं सह्या कराव्या असा प्रमुख इंजिनियरनें आग्रह धरला. पक्षाच्या आज्ञेनुसार हे लोक खाणींत काम करण्यासाठीं उतरले. पहिले दोन तास कांहींच विशेष घडलें नाहीं. पण नंतर मात्र अचानक एक भयंकर स्फोट होऊन खाण फुटली. नंतर ४०० प्रेतें ढिगाऱ्याखालून बाहेर काढण्यांत आलीं. हंगेरियन वर्तमानपत्रांत या दुर्घटनेबाबत अवाक्षरहि छापण्यांत आलें नाहीं ! पांच महिन्यांनंतर स्वतंत्र युरोपनें रेडिओ व इतर गुप्त मार्गानें या दुर्घटनेचें खरें कारण व निश्चित मृत्युसंख्या प्रसिद्ध केली.

**स्त्रियांचें शोषण—**

उद्योगधंद्यांत, लष्करीकरण योजनांत, सामुहिक शेतीमध्यें, महिला-संघटनांमध्यें व अशाच इतर कामांत कम्युनिस्टांनीं पूर्व युरोपांतल्या अधिकांश स्त्रियांची कार्यशक्ति हस्तगत करून घेण्यांत यश मिळविलें आहे. त्यांच्या दुर्दशेनें स्वतंत्र देशांतल्या स्त्रियांनीं धडा घेतला पाहिजे, जागरूक राहिलें पाहिजे.

गुलाम युरोपांतल्या खाणींची दुर्दशा पाहूनदेखील मजुरांचे कम्युनिस्ट "झार" आपल्या अडचणींना कंटाळत नाहींत. पोलंड ते बल्गेरिया या विभागांत जास्त जास्त स्त्रिया व मुलींना खाणींत कामासाठीं पाठवण्यांत येत आहे. बल्गेरियाच्या खाणींमध्यें "महिला ब्रिगेड" तयार झाली आहे. सप्टेंबर १९५० मध्यें रुमानियाच्या एका प्रमुख पक्षपत्रानें भरतीसाठीं

प्रचार सुरू केला तो असा—"स्त्रियादेखील खाणींतील काम शिकूं शकतील" हें त्याचें शीर्षक. तरुण मुली व स्त्रिया रुमानियाच्या खाणींत कोळसा खणतात व गाड्या भरतात. रुमानियाच्या रोलच्या कारखान्यांत मुलींची ब्रिगेड तयार झाली आहे.

स्टॅलिनवादी पूर्व युरोपांतील स्त्रियांना अशा प्रकारें अधिकाधिक प्रमाणांत पुरुषांच्या कामावर कां पाठवीत आहेत? त्यांचा मूलभूत सिद्धान्त अगदीं स्पष्ट आहे—"विशाल औद्योगिक योजना स्त्रियांखेरीज पुऱ्या होऊं शकत नाहींत." याचा अर्थ असा कीं गुलाम युरोपांतील स्त्रियांचें सामर्थ्य ज्या कामीं उपयोगांत येण्यासारखें असेल त्या कामाला त्यांना जुंपलें जाईल. गृहिणी व तरुण मुली यांना मजुरीच्या कामावर भरती करण्यावर जास्त जोर देण्यांत येत आहे. १९५० मध्यें चेकोस्लोव्हाकियांतल्या जवळजवळ दीड लाख स्त्रियांना औद्योगिक कामांवर नेमूनसुद्धां अजूनही प्रागचे लाल पुढारी दरवर्षी दोन लाखांपेक्षां जास्त स्त्रियांची भरती करीत आहेत. १९५३ सालचें त्यांचें प्रमाण अडीच लाख आहे. नव्या श्रमशक्तीच्या हें प्रमाण शेंकडा ३३ टक्के आहे. हेंच प्रमाण पोलंड व हंगेरीमध्येंही आहे. इथें १८ वर्षांवरच्या मुलींना "घरकामाचे गुलाम" न बनण्यासाठीं बहकावलें जातें.

पूर्व युरोपांतील स्त्रियांवर नियंत्रण ठेवण्याचें हें मॉस्कोचें तंत्र लाल राज्यांत कुठेंही अमलांत आणलें जाईल. "लोकशाहीवादी महिला संघा" खेरीज इतर सर्व स्त्री-संघटना पक्षाकडून नेस्तनाबूद केल्या जातात. फक्त वरील संघटनेंतच मजूर स्त्रिया व इतर सरकारी नोकरी करणाऱ्या स्त्रियांना भाग घेण्याची सक्ति केली जाते. खोटे वायदे करून अगर पति किंवा कुटुंबीयांना राजकीय संरक्षण देण्याचें खोटें आश्वासन देऊन पुष्कळशा स्त्रियांना बहकावलें जातें. १९५२ पर्यंत पोलंड व रुमानियांत २० लाखां-पेक्षां जास्त स्त्रियांची भरती करण्यांत आली आहे. यांत पूर्व जर्मनीचा समावेश केल्यास एकंदर संख्या जवळजवळ ७० लाख होईल.

## मजुरीसाठीं पुरुषांचा शोध—

लाल सरकार मजुरांचें शोषण कसें करतें याबद्दल आतां लोकांना इतकी पक्की खात्री झाली आहे कीं बाहुली राज्यांतील वयस्क स्त्री-पुरुष श्रम

ब्रिगेड्स्मध्यें आपण होऊन भरती होण्यास कधींच तयार होत नाहींत. १९५० नंतर जित राष्ट्रांतील अधिकाऱ्यांनीं शहरांतून, खेड्यांतून स्त्री-पुरुषांचा राष्ट्रव्यापी शोध चालवला आहे. बुडापेस्ट, प्राग व वॉरसॉमध्यें पक्षातर्फे मजुरांची भरती करणारे अधिकारी व ' शिक्षक ' लोकांना रस्त्यांत अडवून त्यांचें ओळखपत्र पाहण्यास मागतात. कोणाजवळचे कागद राजकीय किंवा इतर कोणत्याही दृष्टीनें समाधानकारक न वाटल्यास त्याला पक्ष किंवा सरकार यांच्यातर्फे यांनीं ठरवलेल्या कोणत्याही कामावर पाठवलें जातें.

अधिकांश मजुरांना त्यांच्या इच्छेविरुद्ध कामाला लावलें जातें हें एकच कम्युनिस्टांच्या अडचणींचें मुख्य कारण नव्हे, तर नव्या अडाणी मजुरांना कामाची मुळींच माहिती नसते. आणि अनुभवी मजुरांना हे मजूर मुळींच आवडत नाहींत. कारण लौकरच यांना निष्णात बनवण्याचे त्यांना हुकूम सुटलेले असतात.

येत्या कांहीं वर्षांत कित्येक लाख पूर्व युरोपियनांना, त्यांची इच्छा असो वा नसो, कम्युनिस्ट युनियनांच्या मजुरांमध्यें सामील होणें भाग पडेल. परंतु हल्ली देखील सोव्हिएट औद्योगीकरणानें पोलंड व हंगेरीच्या व्यावसायिक संघटनेची दिशा पूर्णपणें बदलून टाकली आहे. तसेंच इतर गुलाम देशातही मोठें परिवर्तन घडविलें जात आहे. १९३१ मध्यें पोलंडच्या लोकसंख्येच्या शेंकडा ६१·४ लोक शेतीवर अवलंबून होते व शेंकडा ३८·६ इतर व्यवसाय-धंद्यांत गुंतलेले असत. डिसेंबर १९५० मध्यें पोलंडमध्यें झालेल्या शिरगणतीप्रमाणें फक्त शेंकडा ४५·७ टक्के लोक शेतकरी असून ५४·३ टक्के लोक इतर व्यवसायांत गुंतलेले आढळले.

रशियाच्या क्रांतिकारक औद्योगिक योजना एकेक पाऊल पुढें टाकीत आहेत. मानवी जीवनाचा जो संहार चालूं आहे त्याचा विचार केला जात नाहीं. हा संहार कित्येक स्वरूपाचा आहे. शक्तीच्या बाहेर काम, गरजेपेक्षां जास्त प्रमाणांत साधनांचा उपयोग आणि मजुरांचें स्वातंत्र्यहरण या रूपानें हा संहार सतत चालूं आहे. आणि या संहाराची किंमत देऊन रशियानें औद्योगिक योजनांचा विकास होत असल्याचें समाधान मिळवलें आहे.

●●●

# आर्थिक विजय

: ८ :

जित युरोपांतले देश सोव्हिएट रशियाच्या रथाला आर्थिक परावलंबी-पणाच्या शृंखलांनीं जखडले गेले आहेत आणि दरवर्षी या शृंखला त्यांच्या शरीराभोंवतीं जास्त जास्त आंवळल्या जात आहेत. यातना आणि शिक्षेच्या भयावह वातावरणांत त्यांना काम करावें लागतें. तसेंच मुख्यतः रशियाच्या हितासाठीं, रशियाच्या फायद्यासाठीं व रशियाचेंच सामर्थ्य वाढवण्यासाटी त्यांना उत्पादन करावें लागत आहे.

क्रेमलिनचीं मुख्य उद्दिष्टें अशीं—

( १ ) पूर्व युरोपच्या अर्थव्यवस्थेला रशियाशीं पूर्णपणें निगडित करून ठेवणें— ज्यायोगें कीं बाहुली राज्यांना सोव्हिएट व्यवस्थेंत सामील होण्यास भाग पडेल.

( २ ) गुलाम युरोपचें उत्पादन सोव्हिएट संघाच्या आर्थिक सामर्थ्याला पूरक म्हणून उपयोगांत आणायचें व त्या मार्गानें रशियाची शक्ति वाढवायची.

क्रेमलिननें सोव्हिएट व इतर जित देशांना मार्शल—योजनेंत भाग घेण्या-पासून परावृत्त करतांना असें म्हटलें होतें कीं, ही योजना अमेरिकन भांडवलशाहीचें साधन असून " युरोपची आर्थिक नाकेबंदी " करण्याचें हिचें ध्येय आहे. आणि यानंतर ज्या गोष्टीची मॉस्कोनें अत्यंत निंदा केली होती तीच गोष्ट स्वतः करायला सुरुवात केली. १९४९ च्या जानेवारी महिन्यांत परस्पर आर्थिक सहायतेच्या परिषदेंत सर्व जित राष्ट्रांना त्यांनीं गुरफटून टाकलें. याला " कॉमकोन " म्हणतात. पण विशेषतः मोलोटॉव्ह

योजना म्हणूनच ही जास्त प्रसिद्ध . आहे. ही योजना म्हणजे बाहुली राज्यांतल्या पंचवार्षिक योजनांचें ( पोलंडची षष्ठवार्षिक योजना ) मध्यवर्ती किंवा केंद्रीय यंत्र असून या यंत्रानें सर्व योजनांचीं चाकें फिरवायला सुरुवात केली. स्टॅलिनवादी भाषेप्रमाणें बघायचें झाल्यास " परस्पर-आर्थिक सहायता " याचा अर्थ रशियासाठीं व रशियाद्वारां आर्थिक शोषण हाच होय. " कॉमकोन "च्या पंचवार्षिक योजनांचें उद्दिष्ट असें आहे कीं पूर्व युरोपांतील देशांतलें औद्योगीकरण वाढवायचें म्हणजे त्यायोगें हे देश सोव्हिएटचा कच्चा माल व सोव्हिएटमधील बाजार यांवर अवलंबून राहतील. जित राष्ट्रें किंवा तेथील जनता यांच्या हातांत कांहींच नव्हतें. मॉस्कोनेंच तथाकथित राष्ट्रीय योजनेचा मसुदा तयार केला होता. बाहुली राज्यांनीं फक्त तो अमलांत आणायचा होता. क्रेमलिनच्या लाल सम्राटांनीं युद्धपूर्व " पश्चिमी साम्राज्यवादा "ला जुन्या काळची एक घोडागाडी बनवली आहे. जित राष्ट्रांतील पंचवार्षिक योजनांच्या द्वारें रशियाच्या लढाऊ व आर्थिक सामर्थ्यांत कशा प्रकारें वाढ होत आहे पहा !

मॉस्कोनें सगळीकडे जें औद्योगिक क्रांतीचें लोण पोंचवलें आहे त्याचें ध्येय कांहीं बाहुली राज्यांतील भुकेलेल्या व नग्न जनतेच्या दैनंदिन गरजा भागवणाऱ्या वस्तूंचें उत्पादन करणें हें नव्हे. त्या क्रांतीचें तत्कालीन ध्येय इतकेंच आहे कीं शस्त्रास्त्रांच्या उत्पादनासाठीं मोठमोठे उद्योगधंदे स्थापन करणें. जितराष्ट्रांतील शेंकडों नव्या योजनांचा संबंध मुख्यतः सरपण व वीज, पोलाद, यंत्रसामुग्री, सीमेंट व रसायनांच्या उत्पादनाशीं आहे. आणि हे मुख्यत्वें युद्धसामुग्रीचे धंदे आहेत.

कित्येक क्षेत्रांत या पंचवार्षिक योजना आपल्या ध्येयाच्या मार्गावर मागें पडतात; यावरून आपण गैरसमज करून घेतां कामा नये. याचें मूळ कारण म्हणजे खाणींत काम करणाऱ्या मजुरांनीं आणलेल्या अडथळ्यांमुळें कोळशांच्या उत्पादनांतील घट, मजुरांनीं जाणूनबुजून केलेली मोडतोड आणि गैरव्यवस्था. परंतु याचें दुसरेंहि एक कारण असें आहे कीं मॉस्कोचें उद्दिष्ट फारच शक्यतेबाहेरचें असल्यानें या योजना उद्दिष्टाचा कळस, गांठूं शकत नाहींत. हीं उद्दिष्टें किती अनुचित आहेत तें पोलंड, चेकोस्लो-

व्हाकिया व हंगेरीच्या १९५१ च्या योजनांवरून स्पष्ट दिसून येतें. इथें मोठमोठ्या उद्योगधंद्यांचें प्रमाण दुप्पट केलें आहे. कांहीं जित देश कांहीं क्षेत्रांत आपल्या मूळ योजनेच्या ध्येयाचा टप्पा गांठून पुढें धांवले आहेत. शेंकडा १०० टक्के ध्येयपूर्ति नाहीं तरी शेंकडा ८० ते ९० टक्के पूर्तता हीसुद्धां समाधानकारकच आहे. कित्येक नष्ट झालेल्या जीवनमानाशीं तुलना करतां पूर्व युरोपचें औद्योगीकरण अक्षरशः रक्ताचें पाणी करून उल्लेखनीय प्रगति करीत आहे.

सध्यां जित राष्ट्रांतील यंत्रांचे कारखाने मुख्यतः युद्धसाहित्य बनवण्यांत गुंतलेले आहेत. हें साहित्य म्हणजे छोटीं हत्यारें, बंदुकीच्या गोळ्या, हातबॉंब, रणगाड्यांचे विभाग, विमानांचीं यंत्रें, विमानांचे इतर सुटे भाग, आगगाडीचें सामान इत्यादि हत्यारांच्या नव्या नव्या कारखान्यांना तऱ्हेतऱ्हेचीं नावें देऊन हीं कामें छपवण्याचा हास्यास्पद प्रयत्न चालू असतो. त्यामुळें मजूर आपापसांत असा विनोद करतात कीं "आम्ही 'चॉकलेट'च्या किंवा "साबणा"च्या कारखान्यांत काम करीत आहोंत."

कम्युनिस्ट अर्थव्यवस्थेमध्यें कोणत्याही यंत्राच्या कारखान्याची व्यवस्था प्रशासकीय कार्य असें म्हणून मर्यादित केली जाते. कागदी कार्यांच्या ढिगाखालीं ही व्यवस्था दडपली जाते. व्यक्तिशः एकाद्यानें केलेल्या सूचना किंवा नवे विचार यांना अवसरच मिळत नाहीं. वेळ किंवा योग्यता असेल तरी देखील त्याचा उपयोग करणें धोक्याचेंच ठरतें. असफलता याचा अर्थ कोणत्या तरी सक्तीच्या मजूर छावण्यांमध्यें बरींच वर्षें राहणें.--तिथें जित युरोपांतील कित्येक माजी मॅनेजर व कित्येक विभागप्रमुख आधींच येऊन हजर असतात. यंत्रांच्या कारखान्यांच्या यंत्रविभागाचे तज्ञ नेहमीं संमेलनें व कागदी कार्यक्रम यांत गुरफटलेले असतात. याशिवाय पक्षानें भाग पाडल्यामुळें उत्पादन–देवाबद्दल श्रद्धा दाखवण्यासाठीं मजूर पाठवीत राहणाऱ्या "सूचनां" बरोबर त्यांना सतत डोकेफोड करावी लागते. यंत्रविशारदांना सतत आपल्या जागांवर हजर राहावें लागतें. त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्यावर लादल्या गेलेल्या योजनांच्या सूचना त्यांना पार पाडाव्या लागतात. आणि तरीदेखील वेळेवर योजनापूर्ति होणें न होणें यासाठीं त्यानाच जबाबदार

धरलें जातें. सोव्हिएट धर्तीच्या कोणत्याही उद्योगधंद्यांतलें 'जीवन' म्हणजे एक संकटपूर्ण स्वप्न आहे. आणि या स्वप्नातून प्रत्येक कार्यकर्त्याला फक्त "हें कर" आणि "हें करूं नको" याखेरीज कोणताही संदेश मिळत नाहीं.

*  *  *

लाखो, करोडो पूर्व युरोपियनांना दोन हिंवाळे लाकडांशिवाय काढावे लागले. याचा परिणाम असा झाला कीं दुसरें महायुद्ध चालूं असतांना नव्हतीं इतकीं दुःखें व रोग वाढले. ऑक्टोबर १९५१ च्या सुरवातीला चेकोस्लोव्हाकियाच्या घरांमध्यें ऊब राहण्यासाठीं रात्रीं नऊ ते सकाळीं सहा वाजेपर्यंतच वीज पुरवली जात असे. आणि दिवसभर ना ऊब ना कढत पाणी ! उपाहारगृहें, दारूचे गुत्ते, चित्रपटगृहें, नाटकगृहें यांमधील विजेचा पुरवठा शेंकडा ५० टक्के कमी करण्यांत आला. रुमानियामध्यें विजेचा खर्च कमी व्हावा म्हणून सारे उद्योगधंदे व सरकारी कचेऱ्या संध्याकाळीं साडेपांच वाजतांच बंद होत. घरांत विजेचे हीटर वापरण्यास बंदी होती. सर्व जित युरोपची हीच अवस्था आहे. तिथें पेट्रोलचेंही रेशन आहे—खुद्द तेलाचें भांडार जें रुमानिया तिथें देखील !

इतकेंच काय, कित्येक आवश्यक क्षेत्रांत या काटकसरीचा विस्तृत उत्पादनावर वाईट परिणाम होतो. उदाहरणार्थ, कोळशांची टंचाई, तेलाच्या कारखान्यांत आधुनिक साधनसामुग्रीची कमतरता, जमिनींत खड्डे पाडणारीं यंत्रें व आवश्यक यंत्रविभागांची कमतरता, इतकेंच नव्हे तर खिळे व सुया यांची देखील टंचाई भासते. पंचवार्षिक योजनांना कित्येक प्रकारच्या टंचाईचा सामना करावा लागत आहे. परंतु या योजना त्याच प्रमाणांत लाल नोकरशाहीच्या जंगलांत लाल फितीनें बांधल्या गेल्या आहेत, गुंतवल्या गेल्या आहेत.

कम्युनिस्ट राज्याच्या योजनेमध्यें लहानमोठे नोकरशहा किड्यांप्रमाणें सतत जन्माला येत असतात. या योजनांमध्यें अगदीं खालपासून वरपर्यंत सर्व काम सक्तीनें करवून घेण्यांत येत असल्यानें उत्पादनाच्या प्रत्येक क्षेत्रांत, प्रत्येक राष्ट्रीय धंद्यांत, प्रत्येक कामाच्या प्रत्येक विभागाची वारंवार तपासणी केली जाते. डोळ्यांत तेल घालून सगळीकडे लक्ष पुरवावें लागतें. प्रत्येक

व्यक्तीवर कांहीं विशेष लोकांची व 'संरक्षण' एजन्सींची कडक नजर असते. कामांतली अक्षमता किंवा ठरवलेल्या कामांत थोडीशीही घट होते कीं काय याचा हे सतत शोध घेत हिंडत असतात. सतत रिपोर्ट पाठवीत राहतात; तसेंच जाणूनबुजून केलेली मोडतोड व "वर्गशत्रू"च्या कारवायांचें प्रमाण मिळवण्याची धडपड करीत राहतात. काम करण्याची योग्यता असो वा नसो, राजकीय दृष्टीनें विश्वासपात्र होण्याला जास्त महत्त्व आहे. त्यामुळें कम्युनिस्ट शासनपद्धतींत लाळघोटे आणि संधिसाधु भरपूर आहेत. जितका व्यक्तिगत पक्षपात आहे तितकीच व्यक्तिगत द्वेषभावना किंवा सूडबुद्धीही आहे. एकादी चूक झाली कीं तीबद्दल कोणाला तरी दोषी ठरवणें भागच असतें. तेव्हां प्रत्येक कार्यालयांतले गुप्तहेर या चुकीबद्दल कोणत्या तरी व्यक्तीला किंवा विभागाला जबाबदार धरतात झालें !

सर्वांत विशेष म्हणजे या पंचवार्षिक योजनेनें असें दृश्य नजरेसमोर आणून दिलें आहे कीं हजारों नोकरशहा आत्मविरोध व घोर निराशेच्या पिंजऱ्यांत खारीप्रमाणें उड्या टाकतात, घाबरून पुढें पुढें पळतात पण कधीं मागें फिरलेले दिसत नाहींत. प्रागच्या "रूड प्रावो"नें सरळ सरळ असें म्हटलें आहे; "आमच्या अर्थव्यवस्थेचा मुख्य दोष हा कीं......अपुरी व्यक्तिगत जबाबदारी......कांहीं एका मर्यादेपर्यंत कार्यविभाजन करणें अत्यंत आवश्यक आहे;......परंतु कंपनीच्या एका डायरेक्टर ऐवजीं कित्येक डायरेक्टर असणेंही अयोग्य आहे......कारण अशा वेळीं डायरेक्टरला एकादी वस्तु हवी असेल तर त्यासाठीं कित्येक लोकांना विचारावें लागेल......बहुतकरून असें होतें कीं मंत्र्यांकडून आलेले आदेश कंपनीपर्यंत मूळ स्वरूपांत पोंचत नाहींत किंवा कधीं कधीं अजिबातच पोंचत नाहींत."

छोटे छोटे नोकरशहा चुका झाल्या किंवा कामांत अडथळे आले तर त्या जबाबदारींतून सुटका करून घेण्यासाठीं निरानिराळ्या युक्त्याप्रयुक्त्या अमलांत आणतात. नोकरीवरून बडतर्फ होण्याच्या किंवा सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठविलें जाण्याच्या भीतीपासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं अपराधी माणसाच्या हातून घडणारी पहिली प्रतिक्रिया म्हणजे स्वतःवरची जबाबदारी दुसऱ्यावर लादणें.

सर्व जित राज्यांत यंत्रविशारदांपासून ते थेट सुशिक्षित आयोजकं, इंजिनियर व सर्व प्रकारच्या तज्ञांपासून ते थेट मुख्य मिस्त्री व फोरमनांपर्यंत सर्वांचीच कमतरता आहे.

इतकें असूनसुद्धां कम्युनिस्ट तत्त्वांमुळें ही कमतरता आणखीच वाढते. गुलाम राज्यांतील हजारों सुशिक्षित कार्यक्षम व तज्ञ इंजिनियरांना "वर्गशत्रु" ठरवून पकडण्यांत आलें; पण यांना त्यांच्या जागेवरून काढणें फारच नुकसानकारक होतें. हा गोंधळ जास्तच वाढवण्यासाठीं म्हणून कीं काय कम्युनिस्ट पक्षाकडून या तज्ञ लोकांच्या जागांवर असे कम्युनिस्ट कार्यकर्ते नेमले जातात कीं ते ज्या स्थानांवर असतात तीं स्थानें त्यांच्या मानानें फारच उच्च असतात. कारण त्याचें मर्यादित शिक्षण व सामर्थ्य त्या मानानें कमी पडतें.

गुलाम युरोपांतील यंत्रविशारद कार्यकर्त्यांची ही उणीव भरून निघायला अजून कित्येक वर्षें लागतील. पण कांहीं झालें तरी एवढें मात्र निश्चित समजावें कीं, पश्चिमी लोकशाही राज्यांत सर्वसामान्यपणें जें यंत्रविशारदत्व आढळून येतें तें कम्युनिस्ट शासनव्यवस्थेखालीं त्यांच्या कार्यकर्त्यांमध्येंही सांपडणें शक्य नाहीं.

●●●

## सक्तीची मजुरी

## : ९ :

सोव्हिएट संघाच्या हजारों कैदखान्यांच्या व छावण्यांच्या प्रमाणेंच पूर्व युरोपांतल्या शेंकडों लाल तुरुंगांत व सक्तीच्या मजूर छावण्यांत होणारी उपासमार व यातना महशूर आहेत. गुलाम युरोपांतून कोणत्यातरी हिकमतींनें निसटून व पळून आलेल्या लोकांनीं प्रत्यक्ष वर्णन केलेल्या हकीकती लिहून काढायच्या म्हटलें तर कित्येक पुस्तकें भरतील. पण यांतलें खरोखर लक्षांत घेण्यासारखें वैशिष्ट्य हें कीं पश्चिमेकडच्या लोकशाही राज्यांतील जनतेचें व वर्तमानपत्रांचें आपल्याकडे मुळींच लक्ष न वेधतां क्रेमलिननें आपल्या यातना व पीडनाचा मोठ्या प्रमाणावर प्रसार केला आहे. एका देशांतून दुसऱ्या देशांत इतरांच्या नकळत त्यांचें लोण पोंचवलें आहे. बाहुली राज्यांत लाल लोकांनीं जो हाहाःकार माजविला आहे त्याच्या परिणामाबाबत अजूनही अधिकांश स्वतंत्र जनता अनभिज्ञ आहे. कम्युनिस्टांचे अपराध नात्सींइतकेच अमानुष आहेत. त्याच्या भीषणतेची आपण कल्पनाही करूं शकणार नाहीं. परंतु दूरदूरच्या लाल तुरुंगांतून व सक्तीच्या मजूर छावण्यांतून जीं अमानुष कृत्यें घडत असतात त्यांचें प्रमाण समजण्यासाठीं कसेबसे निसटून आलेले कैदी जी हकीकत सांगतात तीच साक्ष ठरेल. त्यांच्या सांगण्यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं सर्व गुलाम राज्यांत सापेक्षतः यातनांची सुधारून वाढवलेली आवृत्ति कम्युनिस्ट अमलांत आणीत असतात. आणि याला अद्वितीय असा सोव्हिएट अनुभवांच्या आधाराचा त्यांना जोर मिळत असतो. क्रेमलिननें पोलिसांकरवीं दिल्या जाणाऱ्या यातनांची प्रथा साऱ्या पूर्व युरोपांत पसरवली आहे. सोव्हिएट संघाच्या तीस वर्षांच्या अनुभवाचें हें फळ आहे.

कम्युनिस्टांच्या कैद्यांच्या छावण्यांची संख्या त्यांच्या तुरुंगांपेक्षां पुष्कळच वाढली आहे सर्व गुलाम युरोपांत दरवर्षी डझनभर किंवा वीससुद्धां नव्या छावण्या स्थापन होत आहेत. कित्येक अत्याधुनिक छावण्या २०,००० ते ४५,००० लोक ठेवण्याइतक्या मोठ्या बनवलेल्या आहेत. गुप्त बातम्यां-वरून असें दिसतें कीं अगदीं घाईघाईनें तयार करण्यांत येणाऱ्या या छावण्या जुन्या छावण्यांपेक्षां खूपच मोठ्या आहेत असें खात्रीपूर्वक म्हणतां येईल.

**पूर्व यूरोपांतल्या तुरुंगांत आणि सक्तीच्या मजूर छावण्यांत सध्यां दहा लाखांपेक्षां जास्त कैदी आहेत.**

वास्तविक पाहतां फार पूर्वकालीन पद्धतीवर अजमावण्यांत आलेली ही संख्या फार कमी आहे. संयुक्त राष्ट्र अमेरिका व चेकोस्लोव्हाकियांतल्या निर्वासित लोकांच्या म्हणण्याप्रमाणें १९५१ पर्यंत या छावण्यांत खुद्द त्यांच्या देशाचे २००,००० कैदी होते. उन्हाळयाच्या अखेरीस चेकोस्लोव्हाकियाहून आलेल्या गुप्त बातम्यांवरून असें समजतें कीं अशा एकंदर ७० ,छावण्या असून त्यांपैकीं ३० छावण्या तर जाकीमोव युरेनियन खाणींच्या जिल्ह्यांत आहेत. चेकोस्लोव्हाकियाचे मोठमोठे तुरुंग खच्चून भरलेले आहेत. त्यांत देखील ५०,००० ते १००,००० कैदी असतीलच.

निर्वासित पोलिश अधिकाऱ्यांनीं अशी बातमी सांगितली (सप्टेंबर १९५१) कीं कांहीं छावण्यांत ४००,००० ते ५००,००० मजूर कैदी आहेत. रुमानियांत ४० सक्तीच्या छावण्या असून त्यांच्यांत कमींत कमी ३००,००० ते ४००,००० मजूर कैदी आहेत. हंगेरी व बल्गेरियांत २० ते ३० मोठ्या छावण्या आहेत व तिथें वरच्यापेक्षां १०० कैदी जास्तच आढळतील. पूर्व जर्मनींत व रशियांत नात्सींनीं स्थापन केलेल्या सुप्रसिद्ध मृत्युछावण्याच स्थानिक कम्युनिस्ट उपयोगांत आणीत असून त्याचप्रकारें चालवीत आहेत. १९५१ मध्य एक पोलंडचा रहिवासी बुकेनवाल्डहून सुटून आला—हेंच तें बुकेनवाल्ड ! याच्या निर्दयपणाबद्दल असें ऐकिवांत आलें होतें व जगाला असें वाटलें होतें कीं यामुळें दुसरें महायुद्ध कायमचें थांबेल. या पोलंडनिवासी माणसाच्या सांगण्याप्रमाणें पांच वर्षांच्या कैदेनंतर व सक्तीच्या मजूर छावण्यांत राहिल्यानंतरदेखील या ठिकाणीं १०,०००

कैदी होते. त्यांत जवळजवळ ३००० स्त्रिया होत्या. तो पोलंडनिवासी म्हणाला, " मला कशासाठीं कैद केलें होतें तें शेवटपर्यंत समजलेंच नाहीं."

वरील कथनावरून असें दिसून येतें की मजूर छावण्यात व तुरुंगात १९५२ पर्यंत एकंदर जवळजवळ दहा लाख पूर्व युरोपचे रहिवासी होते. कम्युनिस्ट अमलाखालील साऱ्या युरोपांत—यांत पूर्व युरोपचाही समावेश होतो—दर साठ व्यक्तींमागें एक व्यक्ति असें कैद्यांचें प्रमाण आहे. हे सारे कैदी कम्युनिस्ट तुरुंग व सक्तीच्या छावण्या यांमध्यें आहेत. जास्त काटेकोर हिशेब करायचा झाल्यास असें म्हणावें लागेल कीं २० किंवा त्यावरील वयाच्या लोकांना वरील प्रमाण लागू पडतें. याचा अर्थ असा कीं ७० प्रौढांमध्यें एकजण कम्युनिस्टांचा कैदी आहे. तुरुंगांत व छावण्यांमध्यें पाठविण्यांत येणाऱ्या कैद्यांची संख्या दरमहा वाढत आहे.

## रशियन व्यवस्था कशी अंमलांत आणली जाते?

मजुरांना सक्तीनें कामाला लावून उत्पादन व निर्मिति करवून घेणें हा रशियाचा सर्वांत मोठा कार्यक्रम आहे. मानवशोषणाचें काम एक मोठा व्यापाऱ्यांचा गट करीत असतो. माणसांवर लादण्यांत आलेली ही फार मोठी गुलामगिरीची प्रथा आहे. संयुक्त राष्ट्रांतील आर्थिक व सामाजिक परिषदेच्या वेठबिगारीचें निरीक्षण करणाऱ्या संस्थेनें बरीचशीं प्रमाणें दाखवून ही गोष्ट पुराव्यानिशीं सिद्ध करून दाखवली आहे. आणखी कांहीं वर्षांनंतर सोव्हिएट संघांतील सक्तीच्या वेठबिगारांची संख्या कमींत कमी ८० लाख ते जास्तींतजास्त दोन करोड याच्या दरम्यान राहील असें खात्री-पूर्वक म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं.

कम्युनिस्टांनीं आपल्या वर्चस्वाखालीं असलेल्या सर्व देशांत ही पद्धत अमलांत आणलेली आहे. कम्युनिझमचें हे एक प्रमुख अंग आहे. सोव्हिएट संघाचें विजयप्राप्तीचें हें एक अमोघ अस्त्र आहे. कारण यामुळेंच ते फक्त विरोधापासून आपली सोडवणूक करून घेऊं शकतात. कम्युनिझमच्या बरोबरच सक्तीच्या वेठबिगारीचा विस्तार होणें अनिवार्य असतें, व तसा तो होतोही! या गोष्टीची संपूर्ण कल्पना येण्यासाठीं सोव्हिएट संघांत ही पद्धत

कशी सुरू झाली व ती कशा प्रकारें अमलांत आणली जाते हें जाणून घेणें अत्यंत आवश्यक आहे.

डिसेंबर १९१८ मध्यें सोव्हिएट संघानें मान्य केलेल्या मजूरकायद्यांत यां वेठबिगारीला स्थान देण्यांत आलें. या कायद्याच्या पहिल्या कलमांत असें लिहिलें होतें कीं १६ वर्षांखालील व ५० वर्षांवरील वयाच्या व्यक्तींना व शारीरिक दृष्टीनें अयोग्य अशा व्यक्तींना सोडून इतर सर्वांना सक्तीच्या वेठबिगारीला बांधलें जावें. १९२२ मध्यें सोव्हिएट गुन्हेगार कायद्यान्वयें "ज्यांचें कार्य क्रांतिविरोधी ठरत नाहीं" अशा सर्व व्यक्तींना शिक्षा म्हणून या सक्तीच्या मजुरीला जुंपण्यास सुरुवात झाली. अशा प्रकारें राज्यकारभाराला विरोध करतील अशा संशयास्पद लोकांना बोलशेव्हिकांनीं सत्ताग्रहणानंतर पहिल्याच वर्षीं आपल्या जाळ्यांत अडकवून टाकलें.

असेंही आढळून येतें कीं सुरवातीला एक फार मोठी गुलामगिरीची पद्धत सुरू करण्याच्या इराद्यानें कांहीं "मजुरींतून पुनः शिक्षण" देण्याची पद्धत अमलांत आणली गेली नव्हती. परंतु बोल्शेव्हिकांच्या नव्या राज्यांच्या अंतर्गत असलेल्या "राज्यानें" म्हणजेच जी. पी. यू. नें ( नंतर यांचें नांव एम्. व्ही. डी. असें पडलें ) लौकरच या पद्धतीचा दुष्ट प्रयोग सुरू केला.

सक्तीच्या वेठबिगारीची सर्व व्यवस्था रशियाच्या एम्. व्ही. डी. पोलीसांच्या हातांत असते. ही एम्. व्ही. डी. संस्था हजारों मजूर छावण्यांची व्यवस्था पाहते; इतकेंच नव्हे तर या संस्थेतर्फे कित्येक सरकारी उद्योगधंदे, सामुदायिक शेती व इतर पुष्कळ धंद्यांच्या मजूर कैद्यांना मक्ते देण्यांत येतात. या कामांत सोन्यांच्या खाणी खोदणें, लाकूड कापणें, मासे डबाबंद करणें, रेल्वे व रस्ते तयार करणें, तेलाचें उत्पादन वगैरे कित्येक गोष्टींचा समावेश होतो. पंचवार्षिक योजनेसाठीं सोव्हिएट योजना एजन्सी स्थापन झाली होती. तिथून पळून आलेल्या एका कार्यकर्त्यानें असें सांगितलें कीं १९३९–४० मध्यें सोव्हिएट-मधील सर्वांत मोठी निर्मिति व उत्पादनाचा शेंकडा १४ टक्के काम एम्. व्ही. डी. या संस्थेनें वेठबिगार करणाऱ्या एजंन्सी संस्थांमार्फत करवून घेतलेलें आहे. दुसऱ्या कोणत्याही मंत्रालयानें ठरवून दिलेल्या कामाच्या प्रमाणापेक्षां हें काम खूपच जास्त होतें. गुलाग नांवाची अशीच एक संस्था आहे.

ही संस्था तथाकथित "सुधारणा छावण्यांची" सर्व व्यवस्था पाहाते. या छावण्यांमध्यें अक्षरशः लाखों कैद्यांना मृत्युमुखांत लोटण्यांत येतें. संयुक्त राष्ट्रसंघाच्या वेठबिगार निरीक्षण संस्थेचे निरीक्षक-डायरेक्टर एलबर्ट कॉनरॅड हरलिंग—यांनीं अधिकृतरीत्या असें जाहीर केलें आहे कीं, १६० खाणींच्या छावण्या, ७५ लांकूड व्यापाराच्या छावण्या ४१ कारखाने व इतर डझनांवारी उद्योगधंदे एम्. व्ही. डी. या संस्थेच्या हातीं आहेत.

दुसरें महायुद्ध संपल्यावर ही व्यवस्था पूर्व युरोपांतही अमलांत आणण्यास सुरुवात झाली. सुरवातीसुरवातीला कम्युनिस्टांनीं नात्सींचें समर्थन करणारे व देशद्रोही अशा लोकांसाठींच या कैद्यांच्या छावण्यांची स्थापना केली. लौकरच "जनतेचे शत्रु" या सदरांत पोलादी पडद्यामागील देशांतले उच्च श्रेणीचे जमीनदार, सरदार—दरकदार, श्रीमंत उद्योगपति, न्यायाधीश व सैन्यांतील अधिकारी यांचीही गणना होऊं लागली. थोड्याच दिवसानंतर लोकशाही-विरोधी पक्षांच्या पुढाऱ्यांवर पाळी आली. त्यानंतर तिरस्कृत अशा श्रीमंत वर्गाची घटका भरली व नंतर मात्र कोणाही संशयास्पद व्यक्तीचें नांव या सदरांत गोवलें जाऊं लागलें. "वर्ग-शत्रूं"च्या या वाढत्या समूहाचें शेवटीं करायचें काय ? तेव्हां रशियाप्रमाणेंच इथेंही त्यांना कम्युनिस्टांसाठीं काम करण्याकरतां वेठीला धरण्यांत आलें.

## परदेशांतील जनतेला कम्युनिस्ट गुलाम बनवीत आहेत--

१९४५ मध्यें बल्गेरियाच्या शासकांनीं शैक्षणिक-मजूर-समूह" स्थापन केले. अशाच प्रकारें इतर कित्येक वेठबिगारीचे कायदे कम्युनिस्ट अमलाखालील देशांत प्रचलित करण्यांत आहे आहेत. चेकोस्लोव्हाकियाच्या वेठबिगार छावण्यांचा कायदा म्हणजे याचें उत्कृष्ट उदाहरण होय. याच्या दुसऱ्या विभागान्वयें १८ ते ६० वयाच्या कोणत्याही व्यक्तीला "लोकशाही व्यवस्था व आर्थिक जीवनाला धोका पोंचवणारी" या नांवाखालीं दोषी ठरविण्यांत येईल. आणि हें काम करण्याचा अधिकार तीन कम्युनिस्टांची एक "संस्था" तयार होते त्या संस्थेला आहे, कोणत्याही प्रकारचा खटला न चालवतां अशा व्यक्तींना तीन महिन्यांपासून दोन वर्षांपर्यंत सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठवलें जातें आणि या कायद्याचें उद्दिष्ट असें

म्हटलें जातें कीं, "त्यायोगें प्रत्येक नागरिकाला आपलें देशाबद्दलचें कर्तव्य नीट पार पाडण्याचें उत्तम शिक्षण मिळावें !"

रशियाची गुलामव्यवस्था अशा प्रकारें सबंध पूर्व युरोपाच्या सोव्हिएटीकरणाचें प्रमुख अंग बनलेली आहे. बाहुली राज्यांतल्या कैद्यांना देखील सोव्हिएट रशियांतील छावण्यांसारख्याच छावण्यांत ठेवलें जातें. या छावण्यांवर फार कडक पहारा असतो. कैद्यांनीं पळून जाऊं नये म्हणून तारा गुंडाळलेल्या असतात. तसेंच छावण्यांभोंवतालच्या या तारांमधून विजेचा प्रवाह सोडण्यांत येतो. देखरेख ठेवण्यासाठीं चारी बाजूंना उंच मनोरे असतात व त्यांवरून सतत रात्रभर प्रकाशझोंत फेंकले जातात. कैद्यांनीं आपली संपूर्ण सहनशक्ति खर्च करून काम करावें यासाठीं भुकेचा तोडगा उपयोगांत आणला जातो. कैद्यांची मृत्युसंख्या फार आहे. एम्. व्ही. डी. च्या नियंत्रणाखालीं आज लाखों पूर्व युरोपचे रहिवासी पंचवार्षिक योजना पुरी करण्याच्या कामांत गुंतलेले आहेत आणि या योजनेचें ध्येय मात्र रशियाचें युद्धसामर्थ्य वाढविणें हें आहे.

गेल्या कांहीं वर्षांतल्या कायद्यावरून असें दिसून येतें कीं गुलामगिरीची पद्धत दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. जानेवारी १९५१ मध्यें सबंध केंद्रीय राज्यांसाठीं प्रागमध्यें एक केंद्रीय मजूर कार्यालय स्थापन करण्यांत आलें. प्रत्येक बाहुली सरकारला असा हुकूम झाला कीं त्या सरकारनें सक्तीच्या वेठबिगारीसाठीं मिळणाऱ्या मजुरांची संख्या या कार्यालयाला कळवावी. एका सोव्हिएट प्रतिनिधीचें म्हणणें असें होतें कीं प्रमुख कामासाठीं, उदाहरणार्थ, डॅन्यूबच्या काळ्या समुद्राचे कालवे खोदण्यासाठीं—निरनिराळ्या पूर्व युरोपांतल्या राज्यांतील कैद्यांची निश्चित संख्या कार्यालयाला लिहून कळवावीच लागे. अशा प्रकारें मॉस्कोच्या नियंत्रणाखालीं जित राष्ट्रांतील सक्तीच्या वेठबिगार मजुरांचें भांडार भरत चाललें आहे. पूर्व युरोपांतील वाढत्या गुलामांसाठीं जास्त जास्त कैद्यांच्या छावण्या स्थापन करण्यात येत आहेत.

प्रत्येक गुलाम देशांत मजुरांची अत्यंत कमतरता असूनदेखील कम्युनिस्ट पंचवार्षिक योजनांमध्यें अत्यंत कठीण कठीण कार्यक्रम ठरविण्यांत आले

आहेत. मोठमोठ्या कैद्यांच्या छावण्या स्थापन होण्याचें अंशतः हें एक कारण आहे. दोन तीन वर्षांनंतर डी. जी. आर्. एम्. द्वारां बुखारेस्टचें लाल सरकार सक्तीच्या वेठबिगारीसाठीं जवळजवळ आणखी ५ लाख कैदी मिळवूं शकेल असें एक अनुमान काढण्यांत येत आहे. स्वतंत्र जगानें कसेंही करून खालील गोष्टी माहीत करून घेतल्याच पाहिजेत—

पूर्व युरोपांत गुलाम बनण्यासाठीं म्हणून कम्युनिस्टांच्या ताब्यांत कित्येक लाख उमेदवार आहेत. "संदिग्ध" म्हणून ज्यांची यादी बनविण्यांत आली आहे अशांमध्यें कित्येक लाख मध्यमवर्गीय नागरिक व सुस्थितींतले स्वतंत्र शेतकरी आहेत. निर्दयपणें लादलेले भयंकर कष्ट व असह्य दुर्दशा यांच्यामुळें काम हातून होऊं न शकलेले जे लाखों मजूर रोषाला पात्र होतात त्यांना जाणून बुजून मोडतोड केल्याच्या आरोपाखालीं "पुनः शिक्षण" देण्याकरतां निर्वासित केलें जातें. अशा लोकांना जोंपर्यंत काटेरी तारांच्या कुंपणाआड कैद करून ठेवलें जात नाहीं तोंपर्यंत आसपासच्या राज्यांवर आपलें नियंत्रण अपुरेंच आहे असें सतत कम्युनिस्ट समजत राहणारास गुलामगिरीच्या पद्धतीचा जितका जास्त विस्तार होईल तितका पूर्व युरोप जास्त "सुरक्षित" होईल अशी सोव्हिएटांची व्याख्या आहे. अर्थातच १९५४ पर्यंत गुलाम युरोपांत कम्युनिस्टांच्या गुलामांची संख्या वीस ते तीस लाखपर्यंत वाढेल असें सहज समजण्यास हरकत नाहीं. स्टॅलिनवादी लोक या देशांचा उपयोग रशियासाठीं वेठबिगारीचें भांडार म्हणून करीत आहेत.

## रशिया व सैबेरियामध्यें गुलामांसाठीं आगगाडीचा रस्ता

हजारों, लाखों, पूर्व युरोपांतील कैद्यांना नियमितपणें आज सोव्हिएट कैद्यांच्या छावण्यांत पाठविलें जातें. फार पूर्वीपासून नव्हे पण १९५१ नंतर मात्र कैद्यांसाठीं एक सोव्हिएट आगगाडी कार्पेथियनहून पुढें जाते.

१९५० मध्यें ५०,००० हंगेरियन कैद्यांना सक्तीच्या सोव्हिएट मजूर-छावण्यांत पाठवण्यांत आलें होतें. त्यांच्याबरोबर बाहुली राज्यांतलेही हजारों कैदी होते. एका नियमित कार्यक्रमानुसार हें स्थलांतर प्रत्यक्ष घडवून आणलें

जातें. दर आठवड्याला जित राष्ट्रांतील कैद्यांनीं भरलेली एक आगगाडी किंवा दोन गाड्या पश्चिम कार्पेथियाच्या उझोरोद नांवाच्या गांवाहून निघतात. या प्रवाशांना सोव्हिएट गुलाग छावण्यांपर्यंत जायचें असतें. तिथें पोंचल्या-नंतर बहुतेकजण मरून जातात.

एक मरण आलें तरच कैद्यांना आपल्या जीवनांतून सुटका मिळूं शकतात. पूर्वीचें पोलिश पण आतांचें रशियन शहर लुवाव हें असें ठिकाण आहे कीं तिथून परत जिवंत येण्याची कैद्यांना कधींच आशा नसते. पूर्व युरोपांतील कैद्यांना एकत्र जमाविण्याचें हें ठिकाण असून इथून त्यांना वेठबिगारीसाठीं रशियांत पाठविलें जातें. एवढ्यातेवढ्यासाठीं रशियन पहारेकरी त्यांना निर्दयपणें मारतात. या छावणीचा एकच कायदा आहे आणि तो म्हणजे ठोसा आणि बंदुकीचा दस्ता. रात्रंदिवस लोक मरत असतात आणि मृतांची संख्या वाढतच जाते.

लुवाव शहरीं पोंचल्यानंतर जिवंत राहण्याची कैद्यांना आशाच नसते. आणि कोणी जिवंत राहिलाच तरी परत स्वतंत्र होऊंच शकत नाहीं. ही गुलामगिरीची व्यवस्था आपली शिकार अक्षरशः पचवून टाकते. वेठ-बिगारीचीं कामें वाढत आहेत व त्याचबरोबर मृतांच्या संख्येंत भर पडत आहे. बाहुली राज्यें व सोव्हिएट संघ यांच्या पंचवार्षिक योजनेच्या वाढत्या गरजा पुऱ्या करण्यासाठीं लाल सरकारांना कधींच पुरेसे गुलाम मिळणार नाहींत.

"वर्गशत्रुत्व आणि राजकीय अविश्वास" हीं आर्थिक कारणांपेक्षां जास्त महत्त्वाचीं व सामर्थ्यवान् कारणें आहेत. सर्वसामान्यतः हीं तिन्हीं प्रकारचीं दडपणें सोव्हिएट राज्यव्यवस्थेंत आढळतात. कम्युनिस्ट राज्यांतून कधींही गुलामगिरी नाहींशी होणार नाहीं. कारण हें राज्य स्वतःच गुलाम आहे. पहाऱ्याच्या जाळ्यांत गुरफटलेलें क्रेमलिनचें जें भयंकर बाह्यस्वरूप आहे तेंच त्याचें सत्यस्वरूप आहे. स्टॅलिन आणि पोलितब्रो यांना पूर्व युरोपच्या अधिकांश जनतेची सतत भीति वाटत असते. कारण ही जनता सुस्थितींत असून कट्टर कम्युनिस्टविरोधी आहे. अशा तऱ्हेनें सक्तीची वेठ-बिगार हें उत्पादनाचें अनिवार्य असें सोव्हिएटांचें साधन आहे, इतकेंच

नव्हे तर " वर्गशत्रूं " चीं हाडें खिळखिळीं करून या हाडांच्या सांपळ्यांना मुडदे बनवण्याचेंही तें एकमेव साधन आहे. जगांतील सर्वांत मोठी सैनिक-शक्ति ही साऱ्या इतिहासांत अपूर्व मानली जाते–तीसुद्धां क्रेमलिनच्या या भयविव्हल लोकांना " संरक्षण " देण्यास असमर्थ आहे. सामुदायिक कैद व मानवी हाडांच्या सांपळ्यांपासून स्वतःचें संरक्षण करण्यासाठीं अजूनही ते सतत झटत आहेत.

सबंध पूर्व युरोपांतील अशा तऱ्हेची सक्तीच्या वेठबिगारीची स्थापना म्हणजे स्वतंत्र जगांतील व विशेषतः अटलांटिक राष्ट्रसमुदायांतील प्रत्येक नागरिकाला एक धोक्याची सूचना आहे. क्रेमलिननें आपल्या या धोरणानें असें दाखवून दिलें आहे कीं ज्या ज्या ठिकाणीं कम्युनिस्ट सत्ता प्रस्थापित होईल त्या त्या ठिकाणीं लाल सरकारला गुलामगिरी स्थापन करून तिचा प्रचार करणें भागच आहे. कोणत्याही देशांतील अधिकांश जनतेला वेठ-बिगारीला जुंपल्याशिवाय कम्युनिस्ट आपली सत्ता कायम राखूं शकणार नाहींत. लाल शासनान्तर्गत प्रत्येक व्यक्ति कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें गुलाम बनते–यांमध्यें पक्षाचे सभासद असलेल्या " मालक-गुलामां "चाही समावेश होतो—–पश्चिमी लोकतंत्रवादी, मुख्यतः उच्च मध्यमवर्गीय जनते-इतके, जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही ठिकाणी भावी कैदीठावण्यांसाठीं उमेदवार सांपडणार नाहींत. हें सत्य पक्कें ध्यानांत धरणेंच योग्य होईल. पूर्व युरोप ही पहिली पायरी आहे, सर्वांचा पाया आहे. पार्श्वभूमि आहे.

पण स्टॅलिनवादी कोणती मर्यादा गांठण्याचें धाडस करतील ? पूर्व युरोपांतल्या कम्युनिस्ट अमलाखालच्या प्रत्येक देशांत या प्रश्नाचें उत्तर सांपडेल. दरवर्षी हें उत्तर फार मोठ्या प्रमाणावर प्रबळ बनत चाललें आहे. गुलामगिरीचा महान् निर्माता स्वतः याला असें कांहीं मानवद्वेषपूर्ण उत्तर देत आहे कीं त्याची कल्पनाच करणें कठीण !

युद्ध संपल्यानंतर सुरवातीच्या दिवसांत एकदां स्टॅलिननें त्या काळच्या पोलिश सरकारचे नेते स्तानिस्लॉ मिकोलाजिक यांच्याशीं मोठ्या उत्साहानें महान् स्लाव्ह-साम्राज्याबद्दल चर्चा केली होती. हें साम्राज्य सैबेरियाच्या प्रशान्त किनाऱ्यापासून, रशियांतून आक्रमण करीत पोलादी पडद्याच्या मध्य-

युरोपीय सरहद्दीपर्यंत पसरलें जाईल. श्री. मिकोलाजिक म्हणाले, " पण हंगेरीचे रहिवासी कांहीं स्लाव्ह नाहींत.'' ते म्हणाले, कीं "अशा तऱ्हेनें दडपलें जाण्यापूर्वी हंगेरीचे रहिवासी आपली सर्व शक्ति पणाला लावून विरोध करतील."

स्टॅलिननें शांतपणें व दृढ विश्वासपूर्वक सांगितलें, " हंगेरीचा प्रश्न म्हणजे आगगाडीच्या एका डब्याचा प्रश्न आहे."

' हंगेरीच्या ६५ लाख रहिवाशांपैकीं बहुसंख्य लोकांना आगगाडीच्या डब्यांत कैद करून निर्वासित करायला जर क्रेमलिनचे शासनकर्ते तयार आहेत तर पश्चिमेकडच्या जनतेवर याहीपेक्षां घोर अत्याचार करायला ते कचरणार नाहींत हें आम्ही स्पष्टपणें कां समजूं नये ? हंगेरीचा प्रश्न सोडविण्या-साठीं स्टॅलिननें सुचवलेला " आगगाडीच्या डब्या" चा उपाय अमलांत आणायला सुरुवात झाली आहे. हंगेरीखेरीज इतर पांच देशांतही हाच उपाय चालूं आहे. लाल गुलामराज्याच्या विस्ताराबरोबरच हे उपायही मोठ्या आश्चर्यजनक रीतीनें कार्यक्षम बनत चालले आहेत.

●●●

## चर्चवर विजय

## : १० :

१९५० सालच्या वसंतऋतूपासून सप्टेंबर १९५१ च्या दरम्यानच्या काळांत कम्युनिस्टांनीं पूर्व युरोपांतील कॅथॉलिक चर्चें आपल्या ताब्यांत घेतलीं. त्यांचा व्हॅटिकन अधिकार हिरावून घेतला व अशा प्रकारें पोलादी पडद्याच्या शेवटचा सैद्धान्तिक विरोध नष्ट करून टाकला. सोव्हिएटांनीं मिळवलेल्या इतर कित्येक बाबतींतल्या विजयप्राप्तींच्या वेळीं अशा प्रकारचें कौशल्य दिसून आलेलें नव्हतें. प्रत्येक राष्ट्रांत प्रत्येक धर्मीयांना जें स्वमत-स्वातंत्र्य असतें त्याच्या दृष्टीनें हा चर्चवरचा कम्युनिस्टांचा विजय म्हणजे एक अशुभ लक्षणच समजलें पाहिजे.

कॅथॉलिक चर्चवर कम्युनिस्ट सरकारांनीं जें वर्चस्व प्रस्थापित केलें आहे त्याचा वास्तविक अर्थ व त्यायोगें होणारे परिणाम यांची अजूनही कित्येक अमेरिकन लोकांना पुरेशी कल्पना आलेली नाहीं. क्रेमलिननें व्हॅटिकनवर आज जो घातकी प्रहार केला आहे तसा आजपर्यंत कित्येक पिढ्यांत त्यांनीं सहन केला नसेल. परंतु पूजाअर्चेच्या या क्षेत्राबाहेर कम्युनिस्टांनीं काय काय केलें आहे व तें कसें कसें आहे हें अजूनही पुष्कळशा पश्चिमी नागरिकांना माहीत नसावें ही मोठी नवलाची गोष्ट आहे. कोणतीही धर्मसंघटना,—मग ती ईसाई, यहुदी, मुसलमान— असूंदे, ती क्रेमलिनच्या धोरणाला बळी पडल्यावांचून राहात नाहीं. कोणताही आस्तिक कितीहि कट्टर भक्त व निष्ठावंत असला तरी त्याला आपली धर्मसंस्था कम्युनिस्ट कपट-बाजीच्या दडपणाखालीं निर्बल बनवल्यावांचून गत्यंतर नसतें.

बल्गेरिया व रुमानिया येथील ग्रीक ऑर्थडॉक्स चर्चेसूची हीच अवस्था झाली. तसेंच पोलादी पडद्यामागील लहान लहान व निर्बल अशा प्रॉटेस्टंट

व यहुदी धर्मसमुदायाला याच परिस्थितीचा अवलंब करावा लागला. रोमन कॅथॉलिक चर्चें हीं संख्या, संघटना व आर्थिक परिस्थिति यांबाबत सुरवातीला सामर्थ्यसंपन्न असल्यानें त्यांची दुःस्थिति होण्यास जरा वेळ लागला एवढेंच ! पण खरें पाहतां आज गुलाम युरोपांतील सर्व चर्चसंघटनांना कम्युनिस्टांनीं बाह्य जगापासून तोडून टाकलें, एवढेंच नव्हे तर त्यांवर आज पोलितब्यरोच्या सेवकांचा सर्वाधिकार आहे.

**चर्च-संघटनांवर आपला अधिकार प्रस्थापित करून कम्युनिस्ट त्यांना कशा प्रकारें विलग करतात ?**

(१) चर्चची मालमत्ता व त्यांच्या मिळकतींचे सर्व मार्ग बंद करून त्यांची आर्थिक शक्ति नष्ट करतात.

(२) धार्मिक शिक्षण मोडून काढतात व जें कांहीं थोडें शिल्लक राहील तें लाल राज्याच्या स्वाधीन करतात.

(३) राजकीय आकांक्षा बाळगणारे दुर्बल व दुराचारी पाद्री गांठून त्यांना आपल्या सेवेमध्यें गुंतवतात. त्यांना स्वदेश-प्रेमी अशी पदवी मिळते आणि कम्युनिस्ट शासनाचे अग्रेसर सहकारी म्हणून त्यांचें नाव पुढें केलें जाऊन त्यांचा तसा उपयोग करून घेतला जातो.

(४) या "देश-प्रेमी" पाद्र्यांना ते मॉस्कोच्या "शांतिआंदोलना"च्या स्थापनाकार्यांत गुंतवतात, आणि कोणत्याही मताच्या व तत्त्वाच्या अनुयायांना युद्धविरोधाचें प्रदर्शन करण्यासाठीं या आंदोलनाचें समर्थन करा म्हणून बहकावलें जातें.

(५) सहकारवादी पाद्र्यांनीं (वास्तविक फुटीरवादीच) आपल्या चर्चच्या नेतृत्वांत फार मोठी फाटाफूट घडवून आणली आहे. चर्च आणि राज्य यांच्यांत जी भयंकर तडजोड केली जाते ती घडवून आणण्यांत हे हिरीरीनें पुढाकार घेतात.

(६) "शांतीचा प्रचार करणाऱ्या पाद्र्यां"ना कम्युनिस्ट प्रमुख धार्मिक स्थानांवर नेमतात आणि चर्चची संघटना, प्रकाशन—उदा० कॅथॉलिक ॲक्शन—इत्यादि गोष्टींवर आपलें नियंत्रण बसवितात.

( ७ ) सर्व प्रकारचे विषय व धार्मिक नीतिनियमांची नियुक्ति करण्याबाबतचे सर्व अधिकार कम्युनिस्ट राज्य स्वतः अमलांत आणतें. विरोध करणाऱ्या पदाधिकाऱ्यांना पदच्युत करण्यांत येऊन गिरफदार करण्यांत येतें व त्यांच्या जागीं धर्माच्या विश्वासघातक्यांना नेमण्यांत येतें.

( ८ ) धर्मशासक तितकेच तत्त्वांशीं दृढ श्रद्धा बाळगणारे असतील तर स्टॅलिनवादी " स्वदेशप्रेमी धर्मप्रचारकां "ची एक सल्लागार समिति नेमतात, आणि ही समिति आपल्याच एकाद्या सहकाऱ्याला पदाधिकारी बनवते.

( ९ ) सर्वसामान्य भक्तांपुढें चर्चच्या पुढाऱ्यांच्या नांवानें खोटीं वक्तव्यें करून व प्रकाशनें छापून त्यांना जाणूनबुजून बुद्धिभ्रष्ट करण्यांत येतें व अतर्क्य अशा युक्त्याप्रयुक्त्यांनीं त्यांच्यांत फाटाफूट केली जाते.

(१०) सर्वसामान्य व्यक्ति व धर्मप्रचारक यांच्यावर एका विशिष्ट प्रकारचें व अमानुष दडपण आणलें जातें.

आपली कपटनीति व युक्त्याप्रयुक्त्यांचा प्रयोग करतांना वाटेल तें कुकर्म करण्यास कम्युनिस्ट तयार असतात. १९५१ सालीं बुडापेस्टमध्यें कॅथॉलिक लोक गुड फ्रायडेच्या समारंभासाठीं जमले होते. त्यांच्या येण्याजाण्याच्या रस्त्यावरील सगळीं गटारें साफ करण्यासाठीं उघडून ठेवलेलीं होतीं. कित्येक ठिकाणीं शहरांतले सगळे रस्ते रस्तादुरुस्तीच्या सामानानें व गाड्यांनीं भरगच्च भरले होते. या धार्मिक उत्सवाच्या यात्रेकरूंना दुर्गंधि व घोटाभर घाणेरडें पाणी यांतूनच आपला मार्ग आक्रमावा लागला.

रुमानियामध्यें कम्युनिस्टांनीं धर्मशिक्षण देण्यासाठीं एक शाळा उघडली आहे. पण तिथें खऱ्या धर्मप्रचारकांऐवजीं कट्टर कम्युनिस्ट तयार करण्याचेंच काम चालतें.

## पूर्व यूरोपांत ऑर्थडॉक्स, प्रॉटेस्टंट, यहुदी व इतर चर्चेसवर कम्युनिस्टांनीं कबजा मिळविला—

रुमानिया व बल्गेरियामध्यें सर्व धर्ममतांना अनुसरणाऱ्या धार्मिक संस्थांवर कम्युनिस्टांनीं जो कबजा मिळविला, ती दुःखद कहाणी पुन्हा एकवार सांगणें भाग आहे. हे दोन्ही देश जास्त जवळचे व जास्त असहाय्य

असल्यामुळें लवकर विजय मिळावा म्हणून मॉस्कोनें यांच्यावर प्रथम अत्यंत क्रूरपणें हल्ला करण्याचें ठरविलें. लाल सरकारनें त्या ठिकाणीं असा कांहीं क्रौर्याचा नंगा नाच घातला कीं, त्याच्याशीं तुलना करायची तर नंतर त्यांनीं हंगेरींत घातलेला धुडगूसच डोळ्यांसमोर आणला पाहिजे.

हजारों ऑर्थडॉक्स, प्रॉटेस्टंट, यहुदी किंवा कॅथॉलिक धर्मप्रचारकांना तुरुंगांत अगर सक्तीच्या मजूर छावण्यांत कैद करण्यांत आलें. रुमानियाच्या व बल्गेरियाच्या कित्येक धर्मप्रचारकांवर हें संकट ओढवलें व त्यांच्यापैकीं कित्येकजण तुरुंगांत मेले. ज्यानीं आपल्या धर्माशीं विश्वासघात करायचें नाकारलें त्या धर्मप्रचारकांचा अत्यंत छळ करण्यांत आला. बल्गेरियाच्या धर्मसमुदायाचा पुढारी वासिल जायपकोव याचा, आपल्या अपराधाची कबुली देण्यापूर्वी, ६३ दिवस छळ करण्यांत आला. बल्गेरियाचे बॅप्टिस्ट चर्चचे मुख्याध्यक्ष निकोला मिहाइलोव यांनाही अशाच तऱ्हेनें आत्मयज्ञ करणें भाग पडलें.

जित युरोपांतले इकडे तिकडे पसरलेले प्रॉटेस्टंट धर्मसमुदाय लहान लहान व असंघटित असल्यानें त्यांच्यावर विजय मिळविण्यास फारशी अडचण पडली नाहीं.

नात्सींनीं अत्याचार करून युरोपांतल्या यहुदी लोकांचा जो सर्वनाश केला त्यापूर्वी हे लोक अत्यंत दुःखी व असहाय्य होते. झियोनिस्टांचा उघड उघड व संपूर्णपणें नाश करून कम्युनिस्ट सरकारनें प्रत्येक ठिकाणीं यहुदी संस्थांची पुन्हां संघटना करण्यास सुरुवात केली. पोलंडच्या यहुदी लोकांपैकीं फक्त ८०,००० लोक वांचले होते. १९५१ पर्यंत त्यांच्यापैकीं देखील निम्म्या लोकांचीं नांवें बाहेर पाठविण्याच्या लोकांच्या यादींत घालण्यांत आलीं. रशिया सोडल्यास युरोपांत सर्वांत जास्त यहुदी लोकांची वस्ती रुमानियांत अजून सुरक्षित होती (३००,०००). १९५१ मध्यें यांपैकीं कांहीं लोकांना दर महिन्याला बाहेर पाठविण्यांत येऊं लागलें. परंतु बुखारेस्टच्या सरकारनें इतक्या मोठ्या रुमानियाच्या यहुदी लोकसंख्येच्या बाबतींत फारच मोठा पक्षपात करायला सुरुवात केली. त्यांचे लहानमोठे

व्यापार लुटण्यांत येऊन दैनंदिन जीवनाला आवश्यक अशा वस्तूंची व त्यांची गांठ पडेनाशी झाली. हळूंहळू त्यांना निर्धन बनविण्यांत येऊन त्यांच्या धार्मिक संस्थाही कालांतरानें नष्ट करण्यांत आल्या. हंगेरीमध्यें फेब्रुवारी १९५० पर्यंत एकच यहुदी संस्था जिवंत राहिली होती. पोलंड-मधील यहुद्यांच्या सांस्कृतिक, सामाजिक व मानवकल्याणकारी सर्व संस्था गैरयहुदी संस्थांमध्यें समाविष्ट करण्यांत आल्या आहेत. इतर यहुद्यांची एक केंद्रीय समिति यांतून निसटली आहे खरी पण आतां तिच्यावर स्टॅलिन-वाद्यांचाच संपूर्ण अधिकार आहे.

**कम्युनिस्टांच्या वर्चस्वाची शेवटची कडी—"पृथक्‌वादी" किंवा राष्ट्रीय चर्च !**

सर्व गुलाम युरोपांत कम्युनिस्टांनीं चर्चच्या शासनव्यवस्थेंत व नेतृत्वांत फूट पाडली आहे, मग तें चर्च कोणत्याहि धर्ममताला अनुसरणारें असो ! प्रत्येक प्रमुख पदावर सहकारवाद्यांना स्थान देण्यांत आलें असून आतां हे लोक चर्चचा व धार्मिक संस्थांचा उपयोग क्रेमलिनच्या उद्दिष्टपूर्तीसाठीं करीत आहेत. मॉस्कोला अजून एक कार्य करावयाचें आहे आणि तें कार्य निव्वळ देखाव्यासाठीं आहे. प्रत्येक धर्ममतानुयायी मोठमोठ्या चर्चांचें राष्ट्रीयी-करण करून तीं कायमचीं मॉस्कोच्या ताब्यांत दिलीं पाहिजेत. तसेंच हंगेरी, चेकोस्लोव्हाकिया व पोलंडच्या एके काळच्या अत्यंत सामर्थ्यवान् चर्चांचा व्हॅटिकनचा अधिकार त्यांच्यापासून हिरावून घेऊन त्यांचा प्रभाव नष्ट केला पाहिजे.

अशा प्रकारचें क्रांतिकारक पृथःकरण ज्यायोगें अत्यंत सहजपणें करतां येईल अशा कार्यक्रमाचा सांचा कम्युनिस्टांनीं आधींपासूनच तयार करून ठेवला आहे. बाहुली राज्यांपैकीं सर्वांत छोटें राज्य जें अल्बानिया, तिथल्या कॅथॉलिक चर्चचें ऑगस्ट १९५१ मध्यें मोठया धाडसीपणानें राष्ट्रीयीकरण करण्यात आलें. एका नव्या कायद्यान्वयें या चर्चचे व्हॅटिकनशीं असलेले सर्व राजकीय व आर्थिक संबंध तोडून टाकण्यांत आले. कोणत्याही विदेशी किंवा अल्बनियाच्या बाहेरील चर्चेशीं येणाऱ्या भावी संबंधाची संपूर्ण जबाबदारी कम्युनिस्टांनीं उचलली आहे. आतां सगळया नव्या पाद्यांना

कम्युनिस्टांनीं चालविलेल्या शाळामधूनच धर्मशिक्षण घ्यावें लागेल. अल्बानियाच्या कोणत्याही कॅथॉलिक पाद्यानें आपल्या देशाबाहेरच्या एकाद्या पाद्याशीं सरकारी पद्धतीव्यतिरिक्त पत्रव्यवहार करणें हा कायद्यानें गुन्हा समजला जातो.

असेंच " पृथक्‌वादी तत्त्व " पोलंड, चेकोस्लोव्हाकिया, हंगेरी आणि रुमानियाच्या कॅथॉलिक चर्चेसूला लागूं करण्याचा विचार चालूं आहे.

* * *

कोणत्याही एकाद्या धर्माचें किंवा चर्चचें वैभव न वाढवितां सगळ्या धर्मसंघटना क्रेमलिनचें धोरण, प्रचार, ध्येय व सामर्थ्य यांच्या आधीन बनविण्याचा स्टॅलिनवाद्यांचा दृढनिश्चय आहे. सर्व कम्युनिस्ट शासनान्तर्गत युरोपांत सर्व चर्चें कम्युनिस्ट वर्चस्वाखालीं जातात. यांतलें खरें मर्म हें कीं,— जिथें जिथें म्हणून सोव्हिएट कम्युनिझम् सत्ता हरण करतो तिथें तिथें धार्मिक व आत्मिक स्वातंत्र्य नष्ट झाल्यावांचून केव्हांच राहणार नाहीं.

●●●

## तरुणांचें कम्युनिस्टीकरण : ११ :

**कम्युनिस्ट शासनान्तर्गत आपल्या व इतर सर्वांच्या मुलांवर कोणतें संकट येतें ?**

लाल सरकार मुलांचें अक्षरशः हरण करीत असतें. कितीही पाण्यासारखा पैसा ओतला तरी आईबापांना स्वतंत्रपणें आपलीं मुलें वाढवायला मिळत नाहींत. कैद्यांना सोडवण्याची किंमत म्हणून स्टॅलिनवाद्यांना मुलांची बुद्धि व आत्मा यांवर सत्ता हवी असते. तावडतोब किंवा कालांतरानें ही रक्कम वसूलही केली जाते. त्यांतूनही आत्मयज्ञ करण्याइतकीं किंवा समाजांतून बहिष्कृत होऊन दुःखी आयुष्य कंठण्याइतकीं आपलीं मुलें शूर असतील तर गोष्ट वेगळी ! पण सर्वसामान्यतः " इतर मुलें करतात " तेंच आपण करावें असें त्यांना वाटण्याचाच संभव जास्त असतो. मग त्यांची अवस्था काय होणार ? या प्रश्नाचें उत्तर हंगेरीच्या एका भल्या गृहस्थाला खालील-प्रमाणें मिळालें. ऑक्टोबर १९५० मध्यें या गृहस्थाला ए. व्ही. ओ.च्या गुप्त पोलिसांनीं इतकें बेसुमार मारलें कीं स्ट्रेचरवर घालून त्याला घरीं आणावें लागलें. पश्चिमेकडील रेडिओ ऐकण्याच्या अपराधाबद्दल त्याला तिसऱ्यांदा अटक झाली होती. पण तो तर अत्यंत सावधगिरीनें रेडिओ ऐकत होता. मग पोलिसांना हें कळलें कसें ? त्याची बायको आणि बारा वर्षांचा त्याचा मुलगा या दोघांखेरीज कुणालाच हें रहस्य माहीत नव्हतें. हातपाय मोडून घेऊन पट्ट्यांनीं जखडलेल्या त्या बापानें आपल्या मुलाला म्हटलें, "बघ, तुम्ही साम्राज्यवाद्यांचा रेडिओ ऐकतां ना ? म्हणजे तुम्हीं लोकशाही शासनाचे शत्रू झालांत. आहे कीं नाहीं ?" मुलगा शांतपणें म्हणाला, " मींच तुमच्या-विरुद्ध तक्रार केली होती. तुम्हीं पुन्हां रेडिओ ऐकलांत तर पुन्हां तक्रार

करीन." त्या बापाला हिंडतां फिरतां येऊं लागल्याबरोबर त्यानें एक पिस्तुल आणलें. आधीं आपल्या मुलाला गोळी घातली, मग बायकोला मारलें आणि नंतर आत्महत्या केली.

रुमानियांतली एक स्त्री. तिच्या मुलानें तिचें ऐकलें नाहीं. म्हणून तिनें त्याचे कान पिरगाळले. ताबडतोब मुलगा म्हणाला, "पायोनिअर गाइडच्या अंगाला हात लावूं नको." आणि नंतर त्यानें धमकी दिली, "मी आमच्या पुढाऱ्याला जाऊन सांगेन कीं तूं खाण्याच्या वस्तूंवर नफा काढतेस. आम्ही पायोनिअर स्टॅलिनचीं मुलें आहोंत. आम्हांला दुसऱ्या आईबापांची गरज नाहीं. स्टॅलिन माझे पिताजी आहेत. तूं मला मारलंस तर मी रशियामध्यें पळून जाईन."

पूर्व युरोपांतल्या बहुसंख्य युवकांचीं मनें स्टॅलिनवाद्यांनीं जिंकलीं आहेत याचें मोठें आश्चर्य वाटतें. आजपर्यंत २१ वर्षांखालील दोन करोड तरुणांपैकीं ⅕ तरुणांना त्यांनीं आपल्या पक्षांत सामील करून घेतले असावेत. पण त्यांना ते कशा तऱ्हेनें आपलेसे करतात? त्यांच्यावर कसली मोहिनी घालतात? याचें एकमेव उत्तर म्हणजे कम्युनिस्टांचें संघटनाचातुर्य आणि संघटनासामर्थ्य हेंच होय. कारखाने आणि ट्रॅक्टर स्टेशनें यांची संघटना नव्हे तर मानवी प्राण्यांची—विशेषेंकरून लहान मुलांची संघटना—हेंच याचें वैशिष्ट्य!

## युवकांच्या संघटनेंतील रहस्य!

कम्युनिस्ट सत्ता कायम राखण्यासाठीं लहान मुलें व तरुण यांचीं मनें जिंकण्याची कम्युनिस्टांना आवश्यकता असते. आणि या कामांत ते किती सहजपणें यश मिळवूं शकतात हें त्यांनीं गुलाम युरोपांत सर्वांना दाखवून दिलें आहे. युद्धानंतरच्या क्रेमलिनच्या धोरणाप्रमाणें खालील आदेश दिलेले आहेत.

( १ ) सोव्हिएट धर्तीच्या युवक संघटनांमध्यें गुलाम राज्यांतील युवकांना सामील होण्यास भाग पाडा.

( २ ) शाळांतून व शाळाबाहेर देखील सतत तरुणांना दीक्षा देत रहा व कम्युनिस्ट बनवीत रहा.

( ३ ) सगळ्या मुलांना आपल्या मात्यांपित्यांपासून आणि धार्मिक बंधनांपासून तोडून काढा. या दोन्ही प्रकारच्या प्रभावांपासून त्यांना शक्य तितके दूर करा.

( ४ ) वर्णयुद्धाचीं तत्त्वें व त्यांची व्यावहारिक बाजू तरुणांना पटवून द्या.

( ५ ) तरुणांना स्टॅलिन व सोव्हिएट रशिया यांची पूजा करायला शिकवा.

( ६ ) तरुणांच्या मनांत पाश्चिमात्य लोकशाही व पतित बूर्झ्वा आदर्शवाद यासंबंधीं तिरस्कार उत्पन्न करा.

( ७ ) तरुणांच्या नैसर्गिक बंडखोर प्रवृत्तीचा फायदा घ्या.

( ८ ) तरुणांचा आदर्शवाद, त्याच्या आकांक्षा आणि संकटांशीं झुंजण्याची त्याची आवड चेतवा.

वरील आदेशांबरोबरच बल्गेरियाच्या एका कम्युनिस्ट पुढाऱ्यानें आणखी कांहीं जोरदार व कडक मागण्या केल्या आहेत. " मुलांना कम्युनिस्ट पक्ष, सोव्हिएट संघ, राष्ट्राचे महान् पुढारी स्टॅलिन यांच्याबद्दल निष्ठा बाळगण्याचे पाठ शिकवा. एका नवीन युद्धाचा भडका उडवणाऱ्या अँग्लो-अमेरिकन साम्राज्यवाद्यांबद्दल व त्यांच्या प्रतिनिधींबद्दल मुलांना संपूर्ण द्वेष करायला शिकवा. त्यांना आपल्या देशाच्या संरक्षणासाठीं व बूर्झ्वा सिद्धान्ताविरुद्ध अखंड लढा देण्यास शिकवा.

ीं व या प्रकारचीं इतर कित्येक कामें दिवसें-दिवस वाढत्या प्रमाणावर असणारे कम्युनिस्ट युवकसंघ व यंग पायोनिअर संघ यांच्याकडून सतत केलीं जात असतात. हे संघ म्हणजे सोव्हिएट संस्थांच्या निव्वळ नकला आहेत. स्काऊट संस्था व तरुणांच्या अशा प्रकारच्या इतर सर्व संघटना मोडून टाकण्यांत आल्या आहेत. तरुणांच्या प्रत्यक्ष कार्य करणाऱ्या सर्व संघटनांवर लाल राज्यानें आपला सर्वाधिकार प्रस्थापित केला आहे. सरकार व पक्ष यांच्या भीषण दडपशाहीविरुद्ध ब्र काढणें हें परंपरागत अधिकाराचा एक अद्भुत प्रयोग करण्यासारखेंच आहे.

जित देशांतील प्राथमिक शाळांतील अधिकांश मुलें पायोनिअर आहेत. त्यांनाच फक्त सामुदायिक खेळ, सफरी, सहली आणि फुकट सिनेमाचा आनंद उपभोगतां येतो आणि सुदर सुंदर बिल्ले जिंकून लटकावतां येतात. वर्षानुवर्षे या मोहापासून आपल्या मुलामुलींना दूर राहण्याची शिकवण आपण कशी देऊं शकणार? समजा, आपला मुलगा किंवा मुलगी हुषार आहे, गृहपाठ अत्यंत कसोशीनें व वेळच्या वेळीं बरोबर करीत आहे तरी देखील शाळेंत तिला गुण फारच कमी मिळत राहिले तर? "पण आई, यांत खरी चूक तुझीच आहे. जीं मुलं युवकसंघांत असतील त्यानाच शिक्षक जास्त गुण देतात. आम्ही कोणत्याच संस्थेंत नाहीं. तूं किंवा बाबांनीं जर आम्हांला एकाद्या संस्थेचे सभासद बनायची परवानगी दिली तर..." कम्युनिस्ट शासनान्तर्गत एकाद्या देशांतलीं अशीं घरगुती भांडणें कुठपर्यंत चालूं ठेवण्याची आपल्यांत उमेद राहूं शकेल?

किंवा समजा कीं आपल्या मुलानें निव्वळ हायस्कूलमध्यें जाण्याचें नाकारलें म्हणूनच तो कारखान्यांत काम करायला गेला. पोलिश सायलेशियामध्यें त्याच्यासारखेच आणखी कितीतरी मजूर नक्कीच असतील. परंतु ४०२ औद्योगिक कारखान्यांतील अशा सर्व मजुरांना पोलिश युवकसंघा (झेड. एम्. पी.)चे सभासद बनण्यास सांगितलें. "सभासद बना नाहींतर नोकरी जाईल." पोलंडचे विद्यार्थी एका राष्ट्रीय विश्वविद्यालयाच्या संघाचे सभासद होते. आतां हा संघ झेड. एम् पी.मध्यें सामील करण्यांत आला आहे. आतां विद्यार्थी व्हायचें असेल तर झेड. एम्. पी. चे सभासद होणें अत्यावश्यक आहे बल्गेरियाच्या सरकारनें असा हुकूम काढला आहे कीं १४ ते २१ वर्षांपर्यंतच्या सर्व तरुणांनीं 'युवक मजुरांची डिमिट्राव युनियन' (डी. एस्. एन्. एम्.) या संस्थेमध्यें सामील झालें पाहिजे. पण आजपर्यंत कित्येक हट्टी तरुणांनीं या हुकुमावर बहिष्कार घातलेला आहे.

## अल्पवयीन मुलांना कम्युनिस्ट कशा तऱ्हेनें वश करतात?

सैन्य, पोलीस, कायदा व शासनव्यवस्था हीं सर्व हत्यारें ज्यांच्या हातीं आहेत त्यांना ही गोष्ट काय कठीण आहे? शाळेंत मुलांना स्टॅलिनवादी "विचार" शिकवले जातात. आणि शाळेंतून बाहेर पडल्याबरोबर उरलेला

त्यांचा सारा वेळ पक्ष खाऊन टाकतो. शाळेव्यतिरिक्त वेळांत होणारें सारें कार्य म्हणजे एक राष्ट्रव्यापी वैशिष्ट्य म्हणावें लागेल. हे कार्यक्रम म्हणजे जास्तींत जास्त राजकारणाची दीक्षा देण्यासाठीं शिक्षा केंद्रें, कम्युनिस्ट प्रकाशनांचें सामुदायिक वाचन, हिंडणें, फिरणें, गाणें, बजावणें, तरुण पायोनियरांना-शांति आंदोलनासंबंधींचीं पुस्तकें देणें किंवा शेजाऱ्याकडे अवास्तव खर्चाविरुद्ध प्रचार करणें इत्यादि कामें यांच्यावर सोंपविलीं जातात. मोठ्या मुली बंदूक उडवणें व हातबॉंब टाकणें या कला शिकतात. कम्युनिस्ट पुढाऱ्यांजवळ प्रत्येकाचें मनोरंजन करणारें कुठलें तरी एक प्रलोभन असतेंच. यांचें एकच व सर्वांत मोठें ध्येय हें कीं रात्रींच्या जेवणाची वेळ होण्यापूर्वी मुलें घरीं आपापल्या आईबापांकडे जाऊं नयेत. दर रविवारीं सकाळीं स्वतंत्र व्यवसायासाठीं वेळ दिला जातो. हा पक्षानें दिलेला हुकूम आहे. अशा तऱ्हेनें आपला मुलगा चर्चमध्यें जाऊं शकत नाहीं. मुलामुलींकरतां एका विशिष्ट प्रकारचीं दैनिकें व मासिकें कम्युनिस्ट लोक प्रकाशित करतात.

मुलांना फूस लावणें ही स्टॅलिनवाद्यांची फार मोठी कला आहे. त्यासाठीं वाटेल तें करायला ते तयार असतात. १९५० च्या अखेरीस त्यांनीं वॉरसॉमध्यें एक सुंदर "बालभवन" उघडलें. एकाद्या मोठ्या राज-महालाच्या सुखसोयींचा मोह टाळणें किती मुलांना शक्य आहे ? हें बालभवन म्हणजे एक आधुनिक राजमहाल आहे. त्याची सजावट फारच उत्तम आहे. तिथें तऱ्हेतऱ्हेचें सामान आहे, आणि दररोज २००० मुलें तथ एकत्र जमूं शकतात. मळकेसळके कपडे घालणारी, थंडीचा असह्य कडाका कसातरी सोशीत बॉंबवर्षावानें पडझड झालेल्या घरांत राहणारीं सारीं मुलें ! त्यांना या राजमहालांतील असामान्य आनंदाचा मोह टाळणें कसें शक्य होईल ? आणि त्यांना त्या आनंदापासून पारखें तरी काय म्हणून करावें ? पोलिश युवकसंघाचे पुढारी प्रत्येक कार्याचें निर्देशन करीत असतात, त्याचबरोबर प्रचारही करीत असतात यंत्राबद्दल आवड असणारांसाठीं कारखाने, रेडिओ, विमानोड्डाण, रसायनशास्त्र, खगोलशास्त्र ह्या गोष्टी असतात. फोटोग्राफी व पत्रांवरचीं तिकिटें गोळा करणारांचा एक वेगळाच

विभाग असतो. इतकेंच नव्हे तर लहान मुलांसाठीं परी जगताप्रमाणें एक स्वप्नजगतही निर्माण केलेलें असतें.

## तरुणांना कम्युनिस्ट दीक्षा देण्याच्या पद्धति!

हंगेरीच्या कम्युनिस्टांनीं शाळेच्या वादविवादांमध्यें किंवा शिक्षणकेंद्रांमध्यें दिल्या जाणाऱ्या तरुणांच्या नीति-शिक्षणाचीं मुख्य उद्दिष्टें प्रकाशित केलीं आहेत. हे त्यांचे आपल्यावर फारच मोठे उपकार आहेत म्हणायचे! तीं उद्दिष्टें अशीं—

(१) कम्युनिस्ट दृष्टिकोनाप्रमाणें कोणती गोष्ट नैतिक व कोणती अनैतिक आहे हें विद्यार्थ्यांना स्पष्टपणें कळण्यासाठीं अभ्यासाला मदत करणें.

(२) विद्यार्थ्यांचें प्रत्येक कार्य व त्या कार्याचा प्रत्येक पैलू कम्युनिस्टांच्या गरजांनुकूल आहे कीं नाहीं याची चांचणी करण्याचें त्यांना शिक्षण देणें.

(३) विद्यार्थ्यांना शाळेंतून बाहेर पडल्यावर योग्य तीं कम्युनिस्ट कामें करण्याची त्यांना प्रेरणा देणें—लढाईसाठीं तयार रहा......लढाई, लेनिन व स्टॅलिनसाठीं!......अशा तऱ्हेच्या पायोनियर घोषवाक्यांचा अर्थ माध्यमिक शाळांच्या विद्यार्थ्यांना समजावून देणें. अध्यापकांनीं विद्यार्थ्यांना प्रत्येक विषयाची मीमांसा सैद्धान्तिक व पक्षाच्या दृष्टिकोनांतून करायला शिकवणें.

अशा प्रकारें पूर्व युरोपांतील एक तृतीयांश मुलांमुलींना निव्वळ लेनिन-वादी–स्टॅलिनवादी तत्त्वांचीच दीक्षा दिली जाते असें नव्हे तर त्यांच्यामध्यें वर्गद्वेष, क्रेमलिनची आज्ञा झाल्याबरोबर स्वतंत्र, लोकशाही राष्ट्रांविरुद्ध युद्ध पुकारण्याची तत्परता, आईवडिलांचे विचार व जुनीं नीतितत्त्वें यांबद्दल तिरस्कार व धर्मविरोध इत्यादि भावनांचें बीज पेरलें जात आहे. तसेंच त्यांच्यामध्यें मोठ्या कौशल्यानें अशी एक निष्ठा निर्माण केली जात आहे कीं जर आपले मातापिता, शिक्षक, विरोधी पक्षाचे शेतकरी, मजूर, किंवा पक्षानें सांगितलेल्या कोणत्याही एकाद्या व्यक्तीबद्दल हेरगिरी करण्यांत त्यांनीं यश मिळवलें तर त्यांना एक आदर्श देशभक्त म्हणून मानलें जाईल.

या सर्वांबरोबरच जित युरोपांतील लाखो शाळकरी मुलांना व तरुण मजुरांना निरनिराळ्या क्षेत्रांत पण अत्यंत नियमितपणें व कांटेकोरपणें कठोर लष्करी शिक्षण देण्यांत येत आहे. राजकीय शिक्षणानंतर लगेच तितक्याच कटाक्षानें लष्करी शिक्षणावर भर दिला जातो.

गुलाम युरोपांतील २ करोड तरुणतरुणींपैकीं ७० लाखांपेक्षां जास्त व्यक्ति आज कम्युनिस्ट-युवक-संघ व पायोनियर संघामध्यें आहेत. यांपैकीं ५० लाख व्यक्तींचें संपूर्ण कम्युनिस्टीकरण करण्यांत आलें असून कांहीं राहिले-साहिले निदान या ध्येयाच्या मार्गावर शेवटची पायरी चढत आहेत असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

कम्युनिस्ट-युवक-संघाच्या सांपळ्यांत एकदां अडकल्यानंतर प्रत्येक तरुणाला आपली स्वतःची इच्छा किंवा स्वयंनिर्णयानुसार वागण्याचें स्वातंत्र्य गमवावें लागतें. जे लोक या संघाबाहेर राहतात त्यांना कायमचें अधःपतित आयुष्य जगावें लागतें. तरुणांना कोणत्याही प्रकारची सुसंधि प्राप्त करून घ्यायची असेल तर पक्षाच्या तत्त्वांचें समर्थन करून पक्षयंत्रांतील एक निर्जीव खिळा बसूनच राहिलें पाहिजे. तरुणांना फुस लावून, मार्गभ्रष्ट बनवून, आपल्या हेतुपूर्तीकरतां हवें तसें त्यांचें जीवन व त्यांची वृत्ति बदलून टाकणें हें कम्युनिस्टांचें एक अत्यंत प्रभावी व गुप्त अस्त्र आहे याबद्दल आतां कोणालाच शंका उरलेली नाहीं.

●●●

## विकृत शिक्षण : १२ :

समजा, आपल्याला मुलें आहेत आणि आपण एखाद्या पोलादी पडद्यामागच्या देशांत रहात आहांत. तर कल्पना करा कीं आपल्या मुलांची काय अवस्था होईल !

शाळेमध्यें मुलांना प्रत्येक विषय कम्युनिस्ट दृष्टिकोनानें, कम्युनिस्ट अर्थाप्रमाणें व विकृत कम्युनिस्ट स्वरूपाचाच शिकवला जातो. वास्तविक पाहतां आज जित राष्ट्रांत प्राथमिक शाळांत व हायस्कुलांत रशियन पाठ्यपुस्तकांचे अनुवादच शिकवले जातात. १९५० सालीं हंगेरीच्या विश्वविद्यालयांत १५० नव्या पाठ्यपुस्तकांपैकीं ७९ पुस्तकें रशियन पुस्तकांचीं अनुवादित पुस्तकें होतीं. जित देशांतील खालच्या वर्गांत अनुवादित पुस्तकांचें प्रमाण याहीपेक्षां जास्त असतें.

नव्या पाठ्यपुस्तकांच्या लेखकांना कम्युनिस्ट पक्षातर्फे सतत आदेश पाठविले जात असतात. चेकोस्लोव्हाकियाच्या प्रथितयश लेखकांना नुकतीच अशी सूचना मिळाली आहे कीं, "बाराखड्यांचीं पुस्तकें सोव्हिएट अनुभवांच्या आधारावरच लिहिलीं गेलीं पाहिजेत." रशियन भाषेच्या लिपी-पुस्तकांमध्यें "सोव्हिएट जनतेशीं असलेलीं आमची अपार मैत्री व स्टॅलिनबद्दल आम्हांला वाटणारें आत्यंतिक प्रेम यांवर विशेष भर दिला पाहिजे." भूगोलाच्या पुस्तकामध्यें "चित्रांची निवड अत्यंत काळजीपूर्वक केली पाहिजे." भांडवलशाही देशांत होणाऱ्या मजुरांच्या छळाचा व त्यांच्या दुर्दशेचा उल्लेख अवश्य झाला पाहिजे.

पाठ्यपुस्तकाच्या लेखकांनीं इतिहासाच्या पुस्तकांत बोल्शेव्हिक क्रांतीचें अत्यंत प्रभावी स्वरूप चित्रित करणें "अत्यंत आवश्यक आहे." भूतपूर्व

( चेकोस्लोव्हाकियन ) सरकारचें लोकशाहीविरोधी व सोव्हिएटविरोधी धोरण त्यांना स्पष्टपणें दाखवून दिलें पाहिजे. तसेंच मेसेनिक व बेनेसचें प्रतिक्रिया-वादी चित्रही त्यांच्यापुढें उभें केलें पाहिजे. ( वास्तविक हे दोघे चेकोस्लो-व्हाकियाचे महान् लोकशाहीवादी पुढारी होते. ) " भांडवलशाही मोडून काढण्यासाठीं चेकोस्लोव्हाकियाच्या कम्युनिस्ट पक्षानें केलेल्या महा संघर्षाची खूप स्तुति केली पाहिजे." संयुक्त राष्ट्र अमेरिका, ब्रिटन व इतर पश्चिमी राष्ट्रांच्या " गणित व पदार्थ-विज्ञानशास्त्राच्या पतनावरचा पडदा दूर करून त्या अधःपतनाचें स्वरूप दाखवून देण्यास असमर्थ ठरलेल्या पाठ्यपुस्तक-लेखकांची खूप निंदा केली जाते."

मुलांना अशाच प्रकारचें विज्ञान, इतिहास व प्रत्येक विषय याच स्वरूपांत शिकवला जातो. त्यांच्या अध्यापकांना " सोव्हिएट युनियनच्या अनुभवाच्या आधारावर नूतन शिक्षण पद्धतीचा " अवलंब करण्यास भाग पाडलें जातें. आपला मुलगा स्वतःला कोणत्याही एकाद्या पूर्व युरोपांतल्या राष्ट्राचा रहिवासी समजत असला तरी त्याचें शिक्षण शंभर टक्के रशियन आहे हीच गोष्ट खरी. इतकेंच नव्हे तर देशांतील महानतम लेखक व वीर देशद्रोही आहेत असें सांगितलें जातें. शाळागृहांतून त्यांची टिंगल उडवली जाते व त्यांच्या खोट्या तसबिरी मुलांना दाखवल्या जातात. सर्व महान् व्यक्ति रशियन आहेत, सर्व महान् विचार, महान् आविष्कार व सामाजिक आणि विश्वप्रगतीसाठीं केलीं गेलेलीं महान् कार्यें प्रत्यक्षांत येण्याचें सर्व श्रेय रशियनांना व विशेषेंकरून सोव्हिएट रशियनांना आहे असें मुलांच्या मनांत बिंबवलें जातें.

याखेरीज लोकशाही शासनान्तर्गत शाळांच्या दैनंदिन कार्यक्रमांतेंही बरेच फरक घडून येत आहेत. दररोज एकाच प्रकारचें शिक्षण दिलें जात नाहीं. स्टॅलिनची जयंती व इतर मोठमोठे उत्सव सतत होतच राहतात. " आपला प्रिय व महान् पुढारी, मजुरांच्या जगतांतील एक महान् व्यक्ति जे. व्ही. स्टॅलिन " यांची जयंति साजरी करण्यासाठीं मुलांना पढविलें जातें.

कधीं कधीं असेही प्रसंग घडतात......" तुझे वडील कोण ? " एका कम्युनिस्ट शिक्षकानें एका हुषार मुलीला विचारलें. तिनें ताबडतोब उत्तर

दिलें, "स्टॅलिन माझे वडील." "आणि तुझी आई कोणती?" "कॉमरेड स्टॅलिन!" उत्तर तावडतोब आलें. अध्यापक म्हणाले, "तूं फारच चांगली मुलगी आहेस. आतां असें सांग, मोठेपणीं कोण व्हावेंसें तुला वाटतें?" एक क्षणभरसुद्धां न बिचकतां ॲनानें तावडतोब उत्तर दिलें, "एक अनाथ!" पण ही जित युरोपांतील एक गंमत आहे. गंमत खरी पण किती दुःखपूर्ण आहे!

जित युरोपांत शिक्षणखातें पूर्णपणें पक्षाच्या नियंत्रणाखालीं असल्यामुळें क्रेमलिनच्या सिद्धान्ताबद्दल अनास्था दाखविणें किंवा विरोधी प्रचार करणें अगदींच अशक्य कोटींतलें असतें. मॉस्कोला व मॉस्कोच्या पद्धतीला विरोध कधींही केला जात नाहीं.

## शिक्षणाचें सोव्हिएटकरण करण्यासाठीं शिक्षकांचें कम्युनिस्टीकरण करा!

कम्युनिस्ट राज्यांत शिक्षण विभागांत व सर्व विश्वविद्यालयांत, तसेंच सार्वजनिक शाळांमधून वरचेवर शिक्षकांना काढलें जातें. आज सर्व शाळांवर पक्षाचा पूर्णाधिकार आहे. गुप्तपणें कम्युनिस्टांचे विरोधी असलेल्या प्रोफेसरांना व अध्यापकांना उत्साहानें पक्षाशीं सहकार्य करावें लागतें नाहीं तर नोकरीवर पाणी सोडावें लागतें. विशेष उत्साह दाखवला नाहीं तर संशयाला कारण होतें, आणि पक्षानें नेमलेले विद्यार्थी गुप्तहेर अध्यापकाला एकही विरोधी शब्द वर्गांत उच्चारणें मोठ्या कुशलतेनें अशक्य करून सोडतात. तरी देखील "अविश्वसनीय बूर्झ्वा" लोकांची अजूनही फार मोठी संख्या आहे. कारण कम्युनिस्ट ज्या वेगानें प्रचार किंवा खोटीं पाठ्यपुस्तकें निर्माण करतात तितक्याच वेगानें शिक्षणविभागाला अध्यापक निर्माण करणें कधींच शक्य होत नाहीं.

हा मधला रिकामा खड्डा भरून काढण्यासाठीं शक्य तितक्या लौकर दीक्षित शिक्षकांची फौज तयार करणें हा कम्युनिस्टांपुढें आज महत्त्वाचा प्रश्न आहे. वरपासून खालपर्यंत सगळीकडे सोव्हिएटीकरण केलेले अध्यापक तयार करणें, व त्यांचें जाळें पसरविणें हें आजचें त्यांचें मुख्य काम आहे व ते या ध्येयपूर्तिसाठीं मोठ्या उत्साहानें व जोरानें कामाला लागले आहेत.

अध्यापकाच्या जागेसाठीं जो उमेदवार येतो त्याच्या बुद्धीला अगर ज्ञानाला प्राधान्य दिलें जात नाहीं. स्टॅलिनवाद व पक्षाचें धोरण यांची पोपटपंची करणें व ती शिकवणें त्याला जमत असेल तर त्याला अध्यापकाचं प्रमाणपत्र मिळूं शकतें.

एक हंगेरियन शिक्षक आज बेकार आहे आणि मोठ्या मुष्किलीनें कसेबसे दिवस कंठीत आहे. त्यानें शिक्षणाला हें जें व्यवस्थितपणें विकृत स्वरूप दिलें गेलें आहे त्याच्या परिणामाबद्दल असें म्हटलें,..." राजकारणाला प्रमुख स्थान नाहीं असा शाळेंतला आतां एकही विषय राहिलेला नाहीं. मानवी ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत आतां कम्युनिस्ट विचारप्रणालि ठांसून भरली आहे. हंगेरीच्या तरुणांच्या मेंदूमध्यें रशियन विचार, रशियन आदर्श, रशियन विचारशैली व रशियन संस्कृति इतक्या अबाधितणें कोंबली आहे कीं ते रशियाचे उत्साही अनुयायी बनल्यावांचून राहणारच नाहींत. त्यांच्या राष्ट्रीय जागृतीची जाणूनबुजून हत्या करण्यांत आली आहे. त्याचे आदर्श लेनिन व स्टॅलिन हे आहेत. लुई कोसथ व जेचेन्यी हे नव्हत. याचा सर्वांत भयंकर परिणाम असा आहे कीं, हंगेरीच्या तरुणांना उत्साही रशियन बनण्याचें शिक्षण देण्यांत येत आहे."

## सोव्हिएट प्रोफेसर, एक निर्यातयोग्य माल !

गुलाम युरोपांतल्या विश्वविद्यालयांत आज शेंकडों "उच्चशिक्षित" सोव्हिएट तज्ञ प्रमुखाध्यापक व प्राध्यापकांच्या जागेवर काम करीत आहेत. रशियन प्राध्यापक अधूनमधून या विश्वविद्यालयांत येऊन भाषणें देत राहतात. याखेरीज पोलादी पडद्यामागच्या प्रत्येक देशांत एक सोव्हिएट संस्था असते व त्यांत एक अत्यंत प्रभावी रशियन विभाग असतो. या संस्थेचे सभासद आसपासच्या शैक्षणिक परिस्थितीवर देखरेख ठेवतात व त्यांतले दोष सुधारतात.

बुडापेस्टच्या एका विद्यार्थ्यानें सांगितलें, " आमच्या विश्वविद्यालयांत शस्त्र वैद्यकीच्या प्रमुख पदावर लेनिनग्राडचे प्राध्यापक पीटर पेट्रोव्स्की हे आहेत. ते या कामाला अत्यंत योग्य आहेत यांत संशय नाहीं. पण

कोणताही विषय शिकवायला त्यांना दुप्पट वेळ लागतो. कारण त्यांना फक्त रशियन भाषाच येते. त्यामुळें एका सरकारी दुभाष्याच्या मदतीनें ते भाषण करतात. भाषांतर होईपर्यंत आम्ही उगाचच अंदाज घेत बसतों आणि नंतर ते काय म्हणतात तें आम्हांला कळूं शकतें.

"आम्हांला वारंवार असें सांगण्यांत येतें कीं फक्त रशियन चिकित्सा-शास्त्राप्रमाणें अभ्यास करा. पाश्चिमात्य शास्त्रज्ञ फक्त " पैशाचे गुलाम " आहेत. पाश्चिमात्य तज्ञांनीं लिहिलेलें एकादें पाठ्यपुस्तक मिळवणें देखील अशक्य आहे. पण आमचीं कपाटें सैद्धांतिक साहित्यानें मात्र खचाखच भरलेलीं असतात. लेनिन व स्टॅलिन यांच्या कार्यांची अगणित प्रकाशनें निघतात. रशियन कादंबऱ्यांचे ढीग रचलेले असतात. पण त्यांतले नायक कागदी बाहुल्यांप्रमाणें मार्क्सवादी सांच्यांत तयार झालेले असतात.

**इतिहासाचें पुनर्लेखन कसें करायचें हें सोव्हिएट कम्युनिस्ट सांगतात.**

स्टॅलिनवाद्यांच्या अनिवार्य " नव्या पद्धति " शिकण्यासाठीं जित राष्ट्रांतील विद्वान् मंडळाला वारंवार रशियामध्यें पाठवलें जातें. त्यांचा मार्गदर्शक सिद्धान्त एवढाच कीं, " इतिहास राज्याच्या ( कम्युनिस्ट ) हितासाठींच असला पाहिजे. "

अंगावर कोड उठावें त्याप्रमाणें आज साऱ्या युरोपभर पक्षाधिकाऱ्यांच्या शिक्षणासाठीं शेंकडों खास संस्था पसरलेल्या आहेत. कम्युनिस्ट पक्षाच्या शिक्षणव्यवस्थेंत गुप्त पोलीस, न्यायाधीश, लष्करी अधिकारी, प्रचारक, अध्यापक, खेडुत शिक्षक आणि प्रचारक यांच्यासाठीं वेगवेगळ्या स्वतंत्र शाळा आहेत. पक्षसभासदांना कायमस्वरूपाचे शासक वर्ग बनणें, आपल्या देशांना सोव्हिएट वादाच्या वर्चस्वाखालीं ठेवणें, व रशियाच्या प्रभावक्षेत्रा-बाहेर असणाऱ्या सर्व देशांत पुढें केव्हांतरी मांडलिक राज्य कायमचें स्थापन करणें, या गोष्टींचें शिक्षण प्रकर्षानें दिलें जातें.

अशा परिस्थितींत आपण किंवा कोणीही मातापिता आपल्या मुलांसाठीं ाय करूं शकतील ? लाल सरकार कायम आहे तोंपर्यंत तें त्यांच्या बंधनांत

आहेत. त्यांच्या शालेय जीवनाचा प्रत्येक क्षण एकाद्या बंदिवानाप्रमाणें गुजरत असतो. थिएटर व चित्रपट, संगीत व नृत्य, साहित्य व कला, यांच्याबद्दलचें त्यांचें प्रेम व या गोष्टींचें अधिष्ठान असलेली प्रत्येक वस्तु-जी एकेकाळीं त्यांच्या संस्कृतीची मोठी दौलत होती-या सर्वांचें रशियनीकरण चालू आहे. आणि हें रशियनीकरण इतक्या मोठ्या प्रमाणावर व अशा मार्गानें होत आहे कीं तसें सोव्हिएट संघाबाहेरच्या गैर रशियन लोकशाही राष्ट्रांव्यतिरिक्त इतर कोठेंच कधींही झालेलें नाहीं.

●●●

" माझ्या बुटांना भोकं पडलीं आहेत. ते फाटले आहेत. तरी देखील अनवाणी चालण्याचें मला वाईट वाटत नाहीं. एका महत्त्वाकांक्षी हंगेरियन कवीनें लिहिलें. " मला थंडी झाली तरी पर्वा नाहीं, कारण माझ्या देशापुढें एक महान् उज्वल भवितव्य आहे हें मी जाणून आहे ! " परंतु बुडापेस्टला एका दैनिक पक्षपत्रानें कटु भाषेमध्यें " काय लिहायचें " याची त्याला ताबडतोब समज दिली. " लोकशाही शासनान्तर्गत " कवींना जें कांहीं थोडेंसें स्वातंत्र्य असतें त्या स्वातंत्र्यानें धुंद होऊन एकाद्या कवीला नागरिकांचे बूट फाटले आहेत असें म्हणण्याची परवानगी नाहीं.

जारोस्लाव सेफर्ट नांवाचा एक उदयोन्मुख हंगेरियन कवि होता. त्याला वाटलें कीं आकाशामध्यें आपल्या प्रतिभेला स्वैर संचार करूं देण्यांत जास्त सुरक्षितता आहे. त्यानें अशी कविता रचली, " पक्षी इतक्या मुक्तपणें गाणें गात असतात कीं त्यांच्या त्या मुक्तपणाचा मला हेवा वाटतो. पृथ्वीला सोडून आकाशांत स्वैर संचार करण्यासाठीं पक्षी आपले जे पंख पसरतात त्या पंखामुळें मला पक्षांचा हेवा वाटतो ! " पण दुःखाची गोष्ट अशी कीं स्टॅलिनवादी साहित्यिक परंपरेच्या पहारेकऱ्यांनीं गरीब बिचाऱ्या जारोस्लावचे पंख उखडून त्याला छिन्नभिन्न करून टाकलें. त्यानें आपल्या कवितेंत " दिवाळखोरी व मध्यम वर्गाबद्दलची भीति " व्यक्त केली होती. त्याला " कवीच्या सन्माननीय पदा"वरूनही खालीं ओढण्यांत आलें.

कोणत्याही कम्युनिस्ट राज्यांत साहित्यसेवेपेक्षां सिंह पाळण्याचा धंदा जास्त सुरक्षितपणाचा आणि कमी भयावह असेल. ही गोष्ट सिद्ध करण्या-साठीं म्हणूनच कीं काय जणू कांहीं चेकोस्लोव्हाकियाच्या लेखकसंघानें

व्ही. सोसीयुराच्या " मला युक्राइनबद्दल प्रेम वाटतें " या नांवाच्या कवितेच्या अक्षम्य काव्यात्मक दोषांवर सविस्तर टीका केली. कोणताही कवि फक्त एकाद्याच प्रदेशाच्या प्राकृतिक सौंदर्याचें गीत कसें गाऊं शकतो ? सोसीयुराच्या कवितेमध्यें " छळ करणाऱ्या ( भूतपूर्व ) राज्यव्यवस्थेबद्दल रोष प्रकट केलेला नव्हता किंवा युक्रानियनांच्या जनतेच्या नव्या समाजवादी जीवनाचें स्पष्ट चित्रही चितारलेलें नव्हतें. " शिवाय सोसीयुरानें आणखी एक फार मोठा अपराध केला होता. तो म्हणजे त्यानें " युक्राइन देश सोव्हिएट संघाच्या इतर राष्ट्रांपासून वेगळा व स्वतंत्र. म्हणून चितारला होता. हा अपरिमित राष्ट्रीयवाद होता......भांडवलवाद्यांचा उरला सुरला अंश स्वतःला राष्ट्रीयवादाच्या बुरख्याआड लपवून ठेवीत असतो. " ( हें क्रेमलिननें दुसऱ्यांच्या तोंडून सांगितलें आहे. )

आपलें सारें आयुष्य सोव्हिएट संघामध्यें घालवल्यामुळें सोसीयुरानें मॉस्कोच्या " प्रवदा " पत्राला असें सुचविलें कीं त्याच्यावर जरी कडक टीका झाली असली तरी त्यापासून एक कटु धडा शिकण्यासारखा आहे. " प्रिय मित्रहो, युक्राइनला आज जें स्वरूप प्राप्त झालें आहे तें फक्त आमचा पक्ष व कॉमरेड स्टॅलिन यांच्या नेतृत्वामुळेंच प्राप्त झालें आहे याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे. ( सोसीयुरानें " आजचें स्वरूप " या शब्दांचा द्व्यर्थी उपयोग सुरवातीला केला असला तरी नंतर त्यानें त्यावर पांघरुण घातलेसें केलें. ) " भविष्यकाळीं मी आपली सारी शक्ति जनतेसाठीं व पक्षाच्या सेवेसाठीं अर्पण करीन; कारण पक्षानेंच माझें पालनपोषण केलेलें आहे. "

प्रत्येक नाटक, प्रत्येक संगीत अथवा नृत्यसमारंभ, प्रत्येक चित्र, प्रत्येक पुस्तक किंवा पुस्तिका, प्रत्येक चित्रपट अथवा आकाशवाणीचे कार्यक्रम या सर्वांचा एकच एक उद्देश असला पाहिजे. आणि तो म्हणजे, क्रेमलिनच्या उपयोगी पडणें ! ज्यापासून कांहीं फायदा करून घेतां येईल अशी एकही गोष्ट, विचार किंवा संस्कृतीच्या क्षेत्रांत हाताळण्याचें कम्युनिस्टांनीं सोडलें नाहीं.

स्टॅलिनवाद्यांनीं पूर्व युरोपला शारीरिक दास्य, राजकीय एकरूपता, आर्थिक गुलामगिरी व कायद्यांचा सांपळा यांत पूर्वीपासूनच जखडून ठेवलें आहे. आतां त्यांना आणखी काय पाहिजे ? आतां पोलंड आणि पूर्व जर्मनी, चेकोस्लोव्हाकिया आणि स्लोव्हाकिया, हंगेरी आणि रुमानिया, बल्गेरिया आणि अल्बानिया येथील रहिवाशांना दुय्यम प्रतीचे रशियन बनवण्याची त्यांची इच्छा आहे. साम्राज्यवादी शासनाचें परंपरागत स्वरूप व साधनें पुरेशीं नाहींत. त्यांचा फक्त कम्युनिस्ट विजयाच्या प्रारंभिक काळांतच उपयोग होतो. पाश्चिम युरोपच्या राष्ट्रांचें हरण केल्यास प्रथम या साधनांचा उपयोग करण्यांत येईल. पण कालानुक्रमें कम्युनिस्टांच्या आशा जर का परिपूर्ण होत आल्या तर साऱ्याच्या साऱ्या युरोपियनांचें रशियनीकरण केलें जाईल. आपल्या गुलामाचें शरीर ताब्यांत ठेवायचें असेल तर त्याचा मेंदू व आत्मा यांवरही विजय मिळवणें जेत्याला अत्यावश्यक असतें.

रशियांबद्दल वाटणाऱ्या भक्तिभावाचें प्रमाण आणि त्याच्या अंतिम परिणामाची कल्पना येण्यासाठीं आपल्याला हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं आपल्या देशांतील संपूर्ण जनतेच्या कानांवर सतत खोट्या भाषणांच वर्षाव झाला पाहिजे—दिवसानुदिवस व वर्षानुवर्षे खोट्यानाट्या गोष्टी, कपटकारस्थानें व इतिहासाचें मुद्दाम बनवलेलें विकृत स्वरूप हीं जनतेच्या डोळ्यांसमोर राहिलीं पाहिजेत. फ्रान्स किंवा इटली, ब्रिटन किंवा अमेरिका किंवा इतर कोणत्याही राष्ट्राच्या एकाद्या अपूर्व कृतीचा सरकारी किंवा सार्वजनिकरीत्या सन्मान केला जात नाहीं. फक्त जी वस्तु रशियांतील आहे किंवा ज्याची उत्पत्ति ( मग ती खरी असो कीं खोटी असो ) रशियामधून झालेली आहे त्याच गोष्टीची स्तुति होते. तिच्याबद्दल आदर बाळगला जातो. प्रत्येक वर्तमानपत्रांतून व पुस्तकांतून, प्रत्येक आकाशवाणी केंद्रांतून, प्रत्येक शाळेंतून व थिएटरमधून, प्रत्येक सार्वजनिक कार्याच्या द्वारें विदेशी राष्ट्रांच्या श्रेष्ठपणाला विरोध दर्शवला जातो. प्रत्येक उच्च पदाधिकारी-याची नक्कल सगळ्या लहानमोठ्या अधिकाऱ्यांना करावीच लागते—अशाच तऱ्हेची वटवट करीत असतो व ती त्यानें करीत राहिलेंच पाहिजे तरच याचें काम सफल होईल हें आपण लक्षांत घ्या.

"महान् कल्याणकारक सोव्हिएट संस्कृतीखेरीज आमच्या लोकांनीं सुसंस्कृत जीवनाची कल्पना करणेंही स्वप्नवत् आहे." (एका बड्या चेकोस्लोव्हाकियाच्या कम्युनिस्टाचें म्हणणें आहे.) "आमच्या नागरिकांचें संपूर्ण जीवन शीघ्र बदलत आहे. आमच्या जुन्या परंपरा व आनुवंशिकतेपासून त्यांची सुटका होत आहे."

बुडापेस्टच्या माग्यार नेमझेट नांवाच्या एका वर्तमानपत्रानें ( १९ डिसेंबर १९५० ) छापलें होतें : "सोव्हिएट कलावंत, लेखक, संगीतज्ञ व नाटककार यांनीं जी कांहीं थोडी मदत केली त्याखेरीज आमची सांस्कृतिक क्रांति होणें शक्य नव्हतें. त्यांच्या कृतींमधून आम्हांला विसाव्या शतकांतल्या अत्युत्तम मानवी चरित्रांचा परिचय घडून आला. याच चारित्रांचें आम्हांला अनुकरण करायचें आहे."

जनतासंस्कृतीचे हंगेरियन मंत्री जोजेफ रेवाई हे म्हणाले, "सोव्हिएट संस्कृति आम्हांला केवळ आदर्शस्वरूपच आहे असें नव्हे तर तें आमच्या संस्कृतीचें एक आवश्यक अंग बनत आहे."

बुखारेस्ट विश्वविद्यालयाचे प्रोफेसर सी. बालमस यांनीं आपल्या "सोव्हिएट विज्ञानानें मला काय शिकवलें ?" या पुस्तकांत लिहिलें आहे : "सोव्हिएट विज्ञानाच्या प्रथम संपर्कानेंच मला समजून चुकलें कीं मी बूर्झ्वा शाळांमधून, आपल्या व दुसऱ्या देशांमधून आजपर्यंत जें जें काय शिकलों होतों तें सर्व खोटें होतें. चुकांच्या राशीच्या राशी होत्या......सोव्हिएट विज्ञान जगांत सर्वांत उन्नत आहे." आणि रुमानियाच्या ॲकेडमीचे अध्यक्ष प्रो. सावूलेस्कू यांचें म्हणणें असें आहे कीं, "कॉमरेड स्टॅलिनच्या अत्युत्तम विचारांनीं केवळ भिन्नभाषाध्यायी विद्यार्थ्यांसाठींच नव्हे तर तत्त्वज्ञानी, अर्थशास्त्रज्ञ, साहित्यिक, टीकाकार व वैज्ञानिक या सर्वांसाठीं एक नवें क्षितिज उघडून दिलें आहे."

## क्रेमलिन विदेशीयांचें रशियनीकरण कसें करतें ?

परराष्ट्रांचें रशियनीकरण करण्याचें एक प्रमुख साधन म्हणून प्रत्येक जित राष्ट्रांत एक सक्रिय व विशाल असा सोव्हिएट मैत्रीसंघ स्थापन केला जातो. "सोव्हिएट मैत्री"च्या नांवाखालीं सूचना, मनोरंजन, व कलाभिव्यक्तीचें

प्रत्येक माध्यम रशियन विचार व रशिया यांच्या स्तुतीनें लडबडून टाकलें जातें.

नीट लक्ष द्या हं! समजा, केवळ रेडिओ व टेलिव्हिजनच नव्हे तर प्रवासी चित्रपट, नाटकमंडळ्या, फिरतीं पुस्तकालयें, व सांस्कृतिक प्रदर्शनें यांच्याद्वारें एका पक्षाच्या हुकुमशाही रशियनांकडून तयार केले गेलेले रशियाचे स्तुतिपर कार्यक्रमच सतत आपल्या देशांत चालूं राहिले तर त्याचा आपल्यावर कोणता दीर्घकालीन परिणाम घडेल? प्रमुख शहरांत गुलाम युरोपाप्रमाणेंच "सांस्कृतिक सदनें" स्थापन केलीं जातील. रशियन भाषेचीं हजारों अध्ययनकेंद्रें उघडलीं जातील. "सोव्हिएट जनतेचें सुखी व समृद्धशाली जीवन" चित्रित करणारेच चित्रपट, विशेषेंकरून, वारंवार व ठिकठिकाणीं दाखवले जातील."

## "जित लोकांवर रशियन भाषा शिकवण्याची सक्ति करा!"

जित राज्यामध्यें रशियन भाषा बोलणारे व शिकणारे लाखो नागरिक, तसेंच रशियन भाषा चांगली समजणारी अधिकांश तरुण पिढी शक्य तितक्या लौकर तयार करणें हें क्रेमलिनचें ध्येय आहे. अशा प्रकारें स्टॅलिन-वादी प्रचार अधिकांश जनतेमध्यें अधिकाधिक प्रमाणांत पोहोंचूं शकेल.

बहुतेक विश्वविद्यालयांच्या निम्न व उच्च शाळांमध्यें रशियन भाषेचें अध्ययन सक्तीचें केलेलें आहे. जित राज्यांतील मजुरांसाठीं रशियन पाठ्यक्रम व प्रौढांसाठीं लोकप्रिय पाठ्यक्रम बनविण्यांत आला आहे.

पोलादी पडद्यामागच्या सर्व देशांत रशियन भाषा लोकप्रिय बनविण्यास नुकतीच सुरुवात झाली आहे. तरी देखील तिच्या विकासाकडे पाहिल्यास इतकी असाधारण सफलता कशी प्राप्त करून घेतां येते याचें आश्चर्य वाटतें. १९५२ च्या सुरवातीला गुलाम युरोपांतील मुलांचें रशियन भाषेचें अध्ययन तीन किंवा चार वर्षें झालें होतें. भाषाप्रचाराचें असें उदाहरण साऱ्या इतिहासांत क्वचितच आढळेल. भाषाप्रचाराच्या योगें रशियनीकरण करणें हेंच यांतलें मर्म म्हणून समजलें पाहिजे.

## रशियन वर्तमानपत्रें व पुस्तकें यांची भरमसाट वाढ !

बल्गेरियाचे उत्साही कम्युनिस्ट गांवांत घरोघर जाऊन लेनिन व स्टॅलिनचीं पुस्तकें शेंकडा २० टक्के कमी किंमतीला विकतात. कित्येक मूर्ख शेतकरी या संधीचा लाभ घेत नाहींत. त्यांच्याबद्दल विज्ञान, कला व संस्कृति समितीकडे तक्रार केली जाते. या समितीचें केंद्रीय कार्यालय—केवळ सोयीस्कर व्हावें म्हणून—सोफियामध्यें प्रमुख पोलिस कार्यालयांतच ठेवलेलें आहे.

अधिकांश प्रमुख शहरांत—जित राष्ट्रांतल्या—रशियन पुस्तकालयें आहेत, आणि सर्व सार्वजनिक पुस्तकांवर रशियन पुस्तकांचा एक हिस्सा विकत घेण्याची अट लादलेली असते. आणि या मध्यंतरीच्या काळांत स्टॅलिनवादी गुलाम देशांतील अत्युत्तम व लोकप्रिय साहित्य नष्ट करण्याचें कार्य करीत आहेत. नुसत्या हंगेरींत जप्त केलेल्या पुस्तकांची संख्या ६,७०० पेक्षां जास्त भरेल.

## रशियन प्रचारासाठीं चित्रपट, चित्रपटगृह, संगीत व कला यांचा संपूर्ण उपयोग !

समजा, आपल्या देशांतलीं सारीं चित्रपटगृहें, सगळे चित्रपट, रेडिओ व मनोरंजनाच्या सर्व साधनांचें कम्युनिस्ट राज्यद्वारें राष्ट्रीयीकरण करण्यांत आलें तर काय अवस्था होईल ? कला व संस्कृतीचे कम्युनिस्ट मंत्री या विशाल व्यवसायांचीं कार्यालयें व निर्देशक यांना नियुक्त व बडतर्फ करीत करतात व कार्यक्रम सेन्सॉरही करतात. स्टॅलिनवादी सर्व पूर्व युरोपांत हेंच करीत आहेत. प्रत्येक चित्रपट व इतर निर्मितीची योजना पक्षातर्फे तयार केली जाते, व त्यावर पक्षाचें नियंत्रण राहतें. प्रत्येक खेळ, चित्रपट किंवा कार्यक्रम पक्षाच्या किंवा रशियाच्या प्रचाराला उपयोगी पडला पाहिजे. प्रत्येक श्रोता किंवा दर्शक यांच्यावर सगळीकडे शासकांचा संपूर्ण अधिकार चालतो. आपल्याला हें पसंत नाहीं का ? मग घरांतच कोंडून बसा !

कांहीं गैररशियन चित्रपटही येऊं दिले जातात. या बाबतींत एकदां हंगेरीच्या कम्युनिस्टांनीं फार मोठी चूक केली. १९५० मध्यें त्यांनीं

चित्रपट दर्शकांना सांगितलें कीं एका महिन्यांत दाखवण्यांत येणाऱ्या चित्रपटांपैकीं पांच चांगले चित्रपट निवडून काढा. कित्येक वर्षांनंतर लोकांना गुप्तमतदान करण्याची संधि मिळाली. तिसऱ्या आठवड्यांत इटलीचा "सायकल चोर" सर्वप्रथम होता; त्यानंतर दुसरें एक इटालियन चित्र, त्यानंतर दोन चेकोस्लोव्हाकियाचे चित्रपट व शेवटी एक हंगेरियन चित्रपट असा क्रम लागला. रशियन चित्रपट फारच मागें राहिले होते. पण संस्कृति मंत्रालयानें शेंवटच्या आठवड्यांत सर्वच प्रकरण उलटवलें. अचानक सोव्हिएट चित्रपटांना सर्वांत जास्त मतें पडलीं. या नंतर चित्रपटांची लोकप्रियता अजमावण्यासाठीं कोणत्याच प्रकारचे प्रयत्न करण्यांत आले नाहींत.

चलत्‌चित्रामध्यें कम्युनिस्ट वास्तवतेचा असा कांहीं उपहास करतात व रशियन गुणांना असें कांहीं हरभऱ्याच्या झाडावर चढवितात कीं मॉस्कोला हव्या असलेल्या परिणामाच्या अगदीं उलटा परिणाम होतो. "अनूडॉंटेड सिटी" ( अटळ शहर ) नांवाच्या चित्रपटाची हीच गत झाली. यामध्यें वॉरसॉचा नात्सींनी कबजा घेतला त्यावेळीं लपून छपून लढणाऱ्या वीरांची गोष्ट आहे. या कथेमध्यें जनरल बोरच्या फौजांच्या शौर्यशाली बंडाचें वर्णन केलेलें नव्हतें—पण ही गोष्ट पोलंडच्या सर्व रहिवाशांना पूर्णपणें माहीत होती. आणि त्यांतूनही गंमत म्हणजे वॉरसॉच्या बेडर संघर्षाचा नायक एक पोलंडनिवासी न दाखवतां रशियन छत्रीसैनिक दाखविला होता. पोलंडचे प्रेक्षक चित्रपट अर्धवट सोडून थिएटरबाहेर आले. असें म्हणतां येईल कीं पोलादी पडद्यामागच्या देशांतील चित्रपटांवर पश्चिमेकडून झालेला हा अत्यंत प्रभावी प्रचार होता.

परंतु आपण एकाद्या भिंतीवर जर सतत चिखलफेंक करीत राहिलांत, तर थोडासा तरी चिखल तिथें चिकटून राहणारच! चित्रपट व इतर प्रत्येक गोष्टीबाबत रशियन याच तत्त्वाचा अवलंब करीत असतात.

●●●

## विजेत्यांचें दुःस्वप्न ! : १४ :

आतांपर्यंत मीं फक्त पोलादी पडद्यामागच्या देशांत रशियन कम्युनिस्ट काय करीत आहेत व कशा प्रकारें काम करीत आहेत या गोष्टींचीच फक्त चर्चा केली. सर्वांची सरासरी काढली तर ती फारच भयंकर आहेसें दिसून येईल. परंतु स्टॅलिनवादी दिसतात तितकेच भयंकर आहेत का ? जीवनांत आत्यंतिक निराशावादानें अगर अविचारपूर्ण निराशावादानें प्रवेश करण्यापूर्वी आपल्याला कांहीं समस्यांकडे अत्यंत काळजीपूर्वक पाहिलें पाहिजे. कारण या समस्या सोव्हिएट कम्युनिस्टांच्या मदतीनें, आपल्या साम्राज्याला बाह्यहल्ले व अंतर्गत बंडांच्या योगें सुरक्षित बनविण्याच्या प्रयत्नांमध्यें अडथळे उत्पन्न करीत आहेत.

गुलाम युरोप पुन्हां एकदां हें सिद्ध करून दाखवीत आहे कीं कोणत्याही प्रकारचा छळवाद असला तरी त्यायोगें आंतरिक अशांति व शेवटी आपल्या स्वतःच्याच नाशाचीं बीजें पेरीत असतो. छळवाद जितका वाढेल तितक्याच प्रमाणांत व असह्य स्वरूपांत विरोधी दडपणेंही वाढत जातील. हुकुमशहा, असंख्य बंदुका व पोलीस यांच्या आधारावर चालविण्यांत येणारें राज्य दिसतें तितकें कधींच सामर्थ्यवान् असूं शकत नाहीं. सोव्हिएट सामर्थ्याबद्दलचे जास्त अंदाज लावणें हें त्या शक्तीबद्दलचे कमी अंदाज धरण्याइतकेंच वास्तवतेला सोडून व स्वतःची फसवणूक करणारे ठरतील. एका अर्थी या लाल राक्षसानें अंगावर कित्येक पोलादी चादरी पांघरल्या असल्या तरी त्याचे पाय मातीचेच बनलेले आहेत. त्याला कित्येक रोगांची बाधा झाली आहे. आणि हे रोग हटवायला एका पिढीपेक्षां जास्त काळ लागणार आहे. कम्युनिस्ट आपल्या या उणीवा लौकरांत लौकर भरून काढण्याचे जे प्रयत्न

करीत आहेत त्यावरूनच या उणीवांचें अस्तित्व व खरेपणा सिद्ध होत नाहीं काय ?

खरी गोष्ट अशी आहे की जगांतल्या कोणत्याही सरकारापेक्षां आज क्रेमलिनला आत्यंतिक भय, दीर्घकालीन चिंता, न सुटणाऱ्या समस्या, असाध्य रोग व घोर निराशा यांना तोंड द्यावें लागत आहे. जे लोक गुलाम-व्यवस्थेच्या व संघटित छळवादाच्या पायावर शासनसंस्था उभारतात ते स्वत.च आपल्या छळवादाला बळी पडतात.

म्हणूनच पुष्कळ लोक विचारतात कीं भावी कालांत जाणून बुजून एकादें युद्ध अंगावर ओढून घ्यायची सोव्हिएट कम्युनिस्टांची तयारी असेल का ? तोंपर्यंत चुकीच्या अंदाजांमुळें कोरियासारखी एकादी लढाई सुरू झाली नाहीं तरच—पण या ठिकाणीं लढाई सुरू करणारांना चांगलाच धडा मिळाला आहे. रशियासंबंधींच्या आपल्या सव्वीस वर्षांच्या पूर्ण अनुभवांतीं मॉरिस हिंडस यांनीं असें म्हटलें आहे.

"सध्यां स्टॅलिन कोणत्याही प्रकारचें युद्ध सुरू करणें शक्य नाहीं. रशिया व रशियाच्या बाहेरदेखील सोव्हिएट व्यवस्थेला फारच कठोर उणीवांना बळी पडावें लागत आहे—त्या उणीवा राजकीय, आर्थिक व सर्वांत विशेष म्हणजे मनोवैज्ञानिक उणीवा किंवा दुर्बलता आहेत—"

जित युरोपांतील स्टॅलिनवाद्यांच्या आधिपत्याचें स्वरूप आपण त्यांच्याच स्थायी, व महान् दुःस्वप्नांच्या प्रकाशांत काळजीपूर्वक बघितलें पाहिजे. या स्वप्नांचे दोन प्रकार आहेत. एक खुद्द सोव्हिएट संघाशीं संलग्न आहेत. व दुसरीं युरोपियन देशांच्या सोव्हिएटीकरणाच्या द्वारें मॉस्कोनें निर्माण केलेलीं आहेत. आपण आधीं पहिल्या प्रकारच्या स्वप्नांचें स्वरूप कसें आहे तें पाहूं—

## सोव्हिएट संघाचें दौर्बल्य !

आमच्या अभ्यासाच्या दृष्टीनें या दुर्बलतेचें संक्षिप्त वर्णन पुरेसें आहे. क्रेमलिनच्या सात महान् अडचणींचा मी जो यापुढें उल्लेख करणार आहे तें माझ्या स्वतःच्या विश्लेषणाचेंच निव्वळ फळ नव्हे हें सांगणें मला योग्य दिसतें. ज्या लोकांशीं मी सतत सल्लामसलत करीत आलों ते सर्वजण या

माझ्या विश्लेषणाप्रमाणें वर्णन केलेल्या या दुर्बलतेच्या स्वरूपाबद्दल व महत्त्वाबद्दल सहमत आहेत.

**( १ ) उत्पादनाबाबतची अक्षमता !**

स्टॅलिनचें प्रिय तत्त्व आहे, "उत्पादनाच्या द्वारेंच युद्ध जिंकलें जातें. दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस त्यानें हें मान्य केलें कीं संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या कारखान्यांच्या उत्पादनामुळेंच हिटलरचें भविष्य ठरलें. आणि नंतर फेब्रुवारी १९४६ मध्यें युद्धजर्जर सोव्हिएट जनतेला स्टॅलिननें सांगितलें, "आमच्या उद्योगधंद्यांच्या द्वारें दरवर्षी ५ कोटि टन कच्चें लोखंड, ६ कोटि टन पोलाद, ५० कोटि टन कोळसा व ६ कोटि टन तेलाचें उत्पादन केलें जाईल अशी परिस्थिति आपल्याला निर्माण करायची आहे. अशी परिस्थिति आली तरच आपण आपला देश कोणत्याही दुर्घटनेपासून सुरक्षित राखूं शकूं. मला वाटतें कीं ही स्थिति निर्माण करण्यासाठीं आपल्याला कमींत कमी आणखी तीन पंचवार्षिक योजनांची आवश्यकता आहे......आपण हें काम केलेंच पाहिजे !"

युद्धानंतर प्रथम योजना समाप्त झाल्यावर मॉस्कोनें सोव्हिएट उत्पादनाचें आंकडे प्रसिद्ध केले होते, ते असे : कच्चें लोखंड १९,३५०,००० टन, पोलाद २७,२००,००० टन, कोळसा २६०,६००,००० टन, आणि तेल ३७,८२०,००० टन. संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या सरकारी तज्ञांना सूक्ष्म निरीक्षणानंतर असें आढळून आलें कीं मॉस्कोनें ठरविलें होतें त्यापेक्षां वास्तविक पाहतां वीस लाख टनांचें उत्पादन कमी झालें होतें. अत्यंत परिश्रम करून देखील स्टॅलिनच्या १९६१ ते १९६६ च्या ध्येयाच्या अर्धेदेखील उत्पादन झालें नव्हतें. १९५२ च्या आरंभीं सोव्हिएट व जित राष्ट्रांतील पोलादाचें मिश्र उत्पादन जवळ जवळ साडेतीन कोटी सांगितलें गेलें होतें. आणि हें उत्पादन संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या उत्पादनाच्या एक–तृतीयांश इतकेंच आहे.

परंतु कम्युनिस्टांकरवीं कोरियावर हल्ला करविण्यांत स्टॅलिननें फारच मोठी चूक केली. त्यानें पाश्चिमात्य उत्पादनाचें पुनः लष्करीकरण केलं आहे. त्याच्या पहिल्या पंचवार्षिक योजनेचीं मिळालेलीं फळें ताबडतोब नष्ट

होऊं लागलीं आहेत. आणखी तीन वर्षांत अमेरिकेच्या पोलादाच उत्पादन दरवर्षी ९ कोटी टनांवरून १० कोटी ६० लाख टन जाईल, म्हणजे १ कोटी ६० लाख टनांची वाढ होईल. हें उत्पादन सोव्हिएटांच्या १९५१ सालच्या उत्पादनापेक्षां शेकडा ६० टक्के जास्त आहे. एडवर्ड क्रॅन्कशॉ यांनीं सांगितल्याप्रमाणें कोरियन युद्धाच्या या तीन वर्षांच्या काळांत "संयुक्त राष्ट्र अमेरिकेनें आपल्या संरक्षणावर समग्र ब्रिटिश राष्ट्रीय मिळकतीपेक्षां पांचपट जास्त खर्च केला असावा......आणि हें विशाल उत्पादन युद्धकाळानंतर अमेरिकेमध्यें होणाऱ्या उत्पन्नाच्या एक–तृतीयांशाच असेल."

संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या उत्पादनामध्यें आणखी समग्र पश्चिम युरोप, ग्रेट ब्रिटन, कॅनडा, व इतर कॉमनवेल्थ राष्ट्रांचें उत्पादन मिळवा. म्हणजे यापेक्षां रशियाचें दीर्घकालीन उत्पादन किती कमी प्रमाणांत आहे याचा आपल्याला अंदाज येईल. पोलिटब्यूरो आपल्या पोलादाचा आमच्यापेक्षां फार मोठा हिस्सा युद्धकार्याच्या कामीं लावूं शकत असलें तरी पश्चिमेकडच्या औद्योगिक विकासाची मर्यादा व वेग तें गाठूं शकणार नाहीं. १९६० च्या दर वर्षारंभीं ज्या लाभाची स्टॅलिननें आकांक्षा बाळगली होती, त्याची आशा त्यानें स्वतःदेखील आतां सोडली आहे हा मधला खंदक बुजण्याऐवजीं जास्त पसरतच चालला आहे.

## ( २ ) अंतर्गत असुरक्षितता !

जे लोक मशीनगन, गुप्तहेर, पोलिसी छळ व सक्तीच्या मजूर छावण्या यांच्यायोगें शासन करीत असतात त्यांच्यावर सतत विश्वासघात, कारस्थानें व हत्या यांची भीषण छाया पसरलेली असते. सोव्हिएट रशियाच्या लोकसंख्येचा एक-दशांश भाग पक्षसभासद व पोलिसांचा आहे व लष्करी सामर्थ्यानें जवळजवळ २० कोटि लोकांना त्यानें आपल्या ताब्यांत ठेवलें आहे. या सर्व लोकांना फार दुःख सहन करावें लागतें. यांपैकीं अधिकांश लोकांना कम्युनिस्ट राज्याबद्दल तिरस्कार वाटण्यासारखीं वैयक्तिक कारणें घडलेलीं आहेत. त्यांचे मित्र, आप्तस्वकीय यांना तुरुंगांत डांबण्यांत आलें आहे, निर्वासित अगर नष्ट करण्यांत आलें आहे. असंख्य लोक व्यक्तिशः

घडलेल्या अन्यायामुळें क्षुब्ध झालेले आहेत. त्यामुळें क्रेमलिनला आपल्या गैरकम्युनिस्ट जनतेबद्दल विश्वास वाटत नाहीं. आपल्या पक्षाचे मित्र गुलामांचे मालक असणारांबद्दल देखील यांना खात्री वाटत नसल्यामुळें ते त्यांना बाहेर घालवून देतात किंवा नाहीसे करतात. साऱ्या उच्चपदाधिकारी स्टॅलिनवाद्यांना आपले स्वतःचे साथीदार व समग्र जनता यांपासून सतत सावध रहावें लागतें.

( ३ ) अणुशस्त्रांतील उणीव !

संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या अणुशक्तियोजनेचे अध्यक्ष गॉर्डन डीन हे ऑक्टोबर १९५१ मध्यें म्हणाले, "आतां आम्ही एका नव्याच युगांत पदार्पण करीत आहोंत. आम्हांला आतां अणु-अस्त्र फार मोठ्या प्रमाणांत व भिन्न-भिन्न प्रकारानें उपलब्ध होऊं शकेल. आणि आजपर्यंत कधींही शक्य नव्हतें इतक्या तऱ्हेतऱ्हेनें आपण तें उपयोगांत आणूं शकूं. हें असें युग आहे कीं आम्हीं अणुशस्त्राचा उपयोग युद्धाच्या तयारीसाठीं व प्रत्यक्ष युद्धाच्या वेळीं युद्धसामुग्री म्हणून उपयोगांत आणूं शकूं." श्री. डीन हे पुढें म्हणाले, "आज आपण अशा स्थितींत आहोंत कीं शत्रूच्या बहुसंख्य सैनिकबळाला आपल्या अग्निवर्षावानें निष्फळ करून टाकूं. त्यांच्या सैनिकांची संख्या जास्त असून मग काय उपयोग !......परंतु अणु शस्त्र शांततेची खरी आशाही निर्माण करतें."

सोव्हिएटांना पहिल्या अणुस्फोटासाठीं चार वर्षे व दुसऱ्या स्फोटासाठीं आणखी दोन वर्षें लागलीं.

रशियाला अणुबॉंबचा एकादा मोठा ढीग एकत्र करणें जमलें असेल, किंवा नव्या युद्धोपयोगी अणुअस्त्रांचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें शक्य झालें असेल, ही गोष्ट १९५२ प्रमाणें आजदेखील संभवत नाहीं. तसेंच हीं अणुअस्त्रें निकट भविष्यांत स्थलसेना व जलसेना यांच्याविरुद्ध उपयोगांत आणणेंही रशियाला शक्य होणार नाहीं. युद्धोपयोगी अणुअस्त्रांबाबत १९५१ च्या सफल प्रयोगांद्वारें अमेरिकेनें रशियापेक्षां फार मोठें यश मिळवलें आहे. आणि या वाढत्या यशाबरोबरच क्रेमलिनच्या अणुसंबंधीच्या दुष्ट स्वप्नानेंही भयंकर जोर पकडला आहे. हें दुष्ट स्वप्न पाहणारांसमोर एक

भयंकर गोष्टीची शक्यता आ पसरून उभी आहे. ती म्हणजे १९५४ ते १९५६ च्या दरम्यान त्यांची भयंकर सोव्हिएट सेना जुनी व निरुपयोगी ठरेल. अशा प्रकारें युद्ध सुरू करणारांना अडथळा करण्याचें एक अपूर्व आणि अगम्य साधन निकट भविष्यकाळीं उपलब्ध होणार आहे.

## ( ४ ) तेलाची कमतरता !

युद्धानंतरच्या काळांत रशियांतील तेलाचें उत्पन्न आज सर्व राष्ट्रांत उच्चांक गाठणारें ठरलें असलें तरी संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या तेलाच्या उत्पादनाच्या तें एक–षष्ठांश भागच आहे; आणि तें देखील सोव्हिएटांच्या यांत्रिक गरजा पुरवण्यांत संपून जातें. सध्यांच्या तेलाच्या उत्पादनाचा शेंकडा ६० टक्के हिस्सा व समग्र तेलाचा शें. ७५ टक्के हिस्सा आज लोकशाही राष्ट्रांच्या ताब्यांत आहे. वास्तविक रशिया व त्याचे मांडलिक देश जगाच्या शेंकडा ८ टक्के तेल उत्पन्न करतात. पण संयुक्त राष्ट्र अमेरिका शेंकडा ५२ टक्के, मध्यपूर्व शेंकडा १७ टक्के व वेनेजुएला शेंकडा १४·५ टक्के तेल उत्पन्न करतात. याखेरीज रशियाच्या विमानांसाठीं उपयोगांत आणलें जाणारें सर्वोत्कृष्ट तेल केवळ ९१ ऑक्टेन आहे. आणि पश्चिमेकडील देशांशीं तुलना करतां तें फारच कमी आहे.

परंतु मॉस्कोच्या तेलाच्या या मर्यादित व कमी प्रमाणांतल्या उत्पादनामुळें त्याला एका वेगळया प्रकारच्या दुबळेपणाला तोंड द्यावें लागतें व तेंच त्याच्या अपयशाचें कारण आहे. सोव्हिएट व मांडलिक देशांमध्यें येणारें एकंदर तेल बाकू, माइकॉप व ग्रॉज्नीहून येतें. हीं ठिकाणें दक्षिण रशियामध्यें कॉकेशस येथें आहेत. दुसरें म्हणजे कांहीं तेल रुमानियांतील प्लोएस्टी या ठिकाणाहून येतें. कमींत कमी शेंकडा ४२ टक्के तेल बाकूहून येतें. आणि " जीवन किंवा मरण " यांचीं आधारभूत असलेलीं हीं सर्व ठिकाणें मध्यपूर्वेतील मित्र राष्ट्रांच्या विमानतळांच्या आवाक्यांत आहेत.

## ( ५ ) खाद्यपदार्थांची तूट !

१९४५ पासून रशियाच्या खाद्यपदार्थांचें उत्पादन पुष्कळच वाढलें असलें तरी क्रेमलिनच्या " राष्ट्रीय संरक्षणा "च्या गरजा त्यानें अजून पुरेशा

भागत नाहींत. औद्योगिक व इतर प्रकारच्या विविध लोकसंख्येच्या वाढत्या प्रमाणांत ( ही वाढ फार मोठी आहे ) खाद्यपदार्थांचें उत्पादन कसें वाढवावें ही रशियापुढें आज बिकट समस्या आहे. कोलंबिया विश्वविद्यालयाच्या रशियन संस्थेचे डायरेक्टर प्रोफेसर फिलिप मोसले यांनी व त्यांच्या कित्येक निकटवर्ती विद्यार्थ्यांनीं असें मत प्रदर्शित केलें कीं " सोव्हिएट रशिया अर्ध-पोटी जगून खाद्यपदार्थ सांठविण्याच्या महान् संकटाला तोंड देत आहे."

आणखी कांहीं वर्षे गेलीं तरीसुद्धां १९२८ व १९१४ च्या पातळीपेक्षां रशियाची खाद्यपदार्थांची पातळी फारशी वर चढणार नाहीं. यासाठीं देखील अत्यंत कष्ट करावे लागतील आणि तरीसुद्धां अकस्मात् दत्त म्हणून पुढें उभ्या राहणाऱ्या दीर्घकालीन गरजा भागविण्यासाठीं पुरेसे खाद्यपदार्थ सांठविणें शक्य होणार नाहीं. सोव्हिएट शासनान्तर्गत खाद्यपदार्थांची तूट आणखी कांहीं वर्षें सतत भासत राहील आणि त्याचबरोबर शेतकऱ्यांचीं बंडें, लपून छपून धान्य सांठवणें व जाणून बुजून सरकारचें नुकसान करणें या गोष्टी चालूं राहणारच !

## ( ६ ) पाश्चिमात्य लोकशाही राज्यांचें पुनः लष्करीकरण !

कम्युनिस्टांकडून कोरियावर हल्ला करवून स्टॅलिननें पाश्चिमात्य लोकशाही राज्यांना पुनः महान् शस्त्रीकरणाच्या कार्यांत गुंतवून टाकलें, व इथेंच स्टॅलिननें फार मोठी घोडचूक केली. दोस्त राष्ट्रांची ही प्रतिक्रिया व तिचे परिणाम पाहून क्रेमलिनचे अधिकारी नक्कीच भांबावून गेले असतील. ॲटलांटिक कराराच्या तयारीसाठीं ७५०० अब्ज रुपयांपेक्षां जास्त पैसा खर्च होणार आहे. त्याची बरोबरी ते कसे करूं शकतील ? स्टॅलिनवादी गट या गोष्टीची बरोबरी कधींच करूं शकणार नाहींत हें माहीत असून देखील पोलिटब्यूरोच्या सभासदांच्या डोळ्यांसमोर हें भयंकर सत्य सतत नाचत राहणारच !

## ( ७ ) लाल चीन व माओत्से–तुंग !

रशियाबद्दल ज्यांना पुष्कळ माहिती आहे अशा एका पाश्चिमात्य तज्ज्ञानें म्हटलें : " शेवटीं रशियाला एक मित्र मिळाला म्हणायचा ! पण कोणत्याही

मित्राला आपण काळसूत्री बाहुल्याप्रमाणें नाचवूं शकणार नाहीं." कांहीं झाली तरी चिनी कम्युनिस्ट ४५ करोड लोकांवर राज्य करीत आहेत. क्रेमलिनच्या शासनाखालीं असलेल्या लोकांच्या २।। पट ही लोकसंख्या आहे. स्टॅलिन फार तर असें म्हणूं शकेल कीं हंगेरीच्या लोकांना निर्वासित करणें अगर "त्यांच्यावर नियत्रंण ठेवणें ही आगगाडीच्या डब्याची" समस्या आहे. लाखो बंडखोर पोलंडनिवासी लोकांना तो मध्य एशियांत पाठवूं शकेल, मांडलिक देशांतील लाल पुढारी व पक्ष यांच्या बाबतींत देखील तो मनांत येईल तसें वागूं शकेल, परंतु जनरल माओ किंवा त्याच्या जागीं असलेल्या पीनिंगच्या कोणत्याही अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यावर स्टॅलिन हुकूम गाजवूं शकणार नाहीं.

माओ किंवा त्याचे वारस "दुसरे टिटो" बनूं शकतील हा कयास चुकीचा आहे. या उलट लाल चीनचा कोणताही बडा पुढारी स्टॅलिनपेक्षांही एकादे वेळीं वरचढ होऊं शकेल ह्याच भीतीनें स्टॅलिनला ग्रासलें आहे. ही भयावह शक्यता दिवसेंदिवस, ज्या प्रमाणांत चीनच्या कम्युनिस्टांची शक्ति वाढेल त्या प्रमाणांत, वाढत राहील. आजपर्यंत कोणतेंही विदेशी सामर्थ्य सुप्तावस्थेंतल्या अशक्त चीनला आपल्या वर्चस्वाखालीं कायमचें आणूं शकलें नाहीं. असें असतांना या जाग्या झालेल्या चिनी अजगराला आपल्या ताब्यांत घेण्याची उमेद रशियन अस्वलानें बाळगणें कितपत यथार्थ ठरेल ? या आत्यंतिक राष्ट्रीयवादी चीननें आज सोव्हिएट युनियनबरोबर सर्व जगांत बरोबरीची मोठी सीमा गांठली आहे.

लाल चीन आजच्याप्रमाणेंच सोव्हिएट पक्षांत राहणें फारतर शक्य होईल; परंतु चीनच्या विशाल लोकसंख्येचें संपूर्णपणें रशियनीकरण करणें मात्र कधींही शक्य होणार नाहीं. लाल चीन व त्याचे लाल पुढारी यांची वागणूक उद्यां क्रेमलिनशीं कशी राहील हें कोणी सांगावें ? आणि आज देखील त्यांची वागण्याची दिशा बदलत असली तरी कुणाला त्याचा पत्ता लागणार आहे ? माओच्या विजयाचा अर्थ हाच कीं एशियामध्यें रशियाला मान मानेल तसें वागतां येणार नाहीं. शिवाय काळजी कधींच रशियनांचा पिच्छा सोडणार नाहीं हेंहि निश्चित.....समजा, एखाद्या दिवशीं लाल

चीननें, स्टॅलिनवाद खऱ्या कम्युनिझमचा विश्वासघात करणारी खोटी तत्त्व-प्रणालि आहे असें म्हणून त्याच्यावर बहिष्कार घातला तर! किंवा त्या आदर्शवादी कम्युनिस्टांनीं क्रांतीचा उठाव केला तर? हीं सर्व प्रश्नचिन्हें पोलितब्यूरोच्या विकृत व संशयखोर मनांत सतत एक स्थान पटकावून बसलेलीं असतात, व याच संकटाचें कल्पनापिशाच्च त्यांना सतत भेडसावीत असतें.

लाल रशियाच्या मालकांना या एकाच पिशाच्चाची भीति असते असें नव्हे. हा एक अत्यंत आवश्यक व वास्तव असा वस्तुस्थितीचा सांचा आहे. या सांच्यामध्यें दडलेल्या मांडलिक देशांच्या दुष्ट स्वप्नांचें परीक्षण केलें पाहिजे.

## मांडलिक राज्यांचीं दुष्ट स्वप्नें !

हें पुस्तक लिहीत असतांना मांडलिक राज्यांचीं कांहीं दुष्ट स्वप्नें नजरे-समोर आलीं आहेत. परंतु मला असें वाटतें कीं त्यांचा संपूर्ण अभ्यास केल्याखेरीज त्यांचा पुरा अर्थ ध्यानांत येणार नाहीं. सोव्हिएट विजयाचें स्थायी अस्तित्व अत्यंत कठीण आणि कष्टप्रद बनवणारी अशी कोणती परिस्थिति बाहुली राज्यांत आहे?

### (१) जनतेचा अखंड विरोध !

मांडलिक देशाच्या प्रौढ नागरिकांपैकीं शेंकडा ७० ते ८० टक्के नागरिक कम्युनिस्टविरोधी व सोव्हिएटविरोधी आहेत; व हा त्यांचा विरोधही अत्यंत प्रखर आहे. निदान येत्या वीस ते तीस वर्षांत त्यांना उघड उघड लढाई खेळणारे शत्रु बनविण्यासारख्या घटना घडल्या नाहींत तर हे सगळेजण "जगांतील सर्वांत मोठे पंचमस्तंभी होण्याचाच जास्त संभव आहे."

गोरिल्ला आणि शेतकरी व मजूर याच्याकडून होणाऱ्या मोडतोडीमुळें लाल विजेत्यांपुढें एक फार मोठी समस्या उभी राहिली आहे. ही समस्या ते सोडवूंहि शकत नाहींत आणि विसरूंही शकत नाहींत. युद्ध सुरू झालेंच तर बाहेरून खाद्य व शस्त्रास्त्रें यांची मदत मिळवून गोरिल्लांची संख्या लाखांनीं वाढेल याची त्यांना कल्पना आहे.

## ( २ ) मांडलिक राज्यांतल्या आपल्या पुढाऱ्यांबद्दल क्रेमलिनला वाटणारा अविश्वास !

जून १९४८ मध्यें मार्शल टिटो आणि त्यांच्या युगोस्लाव्ह पक्षानें मॉस्कोशीं असलेले आपले संबंध तोडून टाकले. आणि कम्युनिझमबद्दल अनास्था बाळगणारा सफल पुरुष म्हणून त्यांची गणना झाली. यानंतर पोलितब्यरोनें मांडलिक राज्यांतील पक्षांची वरपासून खालपर्यंत सफाई करायला सुरुवात केली. मांडलिक देशांत होणाऱ्या विकासांचे उत्तम जाणकार मायकेल पादेव यांचा असा रिपोर्ट आहे कीं डिसेंबर १९५१ पर्यंत दहा लाखांपेक्षा जास्त कम्युनिस्टांना बाहेर हांकलण्यांत आलें आहे. पूर्व युरोपांतील पक्षाच्य सभासदांपैकीं ही संख्या शें. २० ते २५ टक्के आहे. या हजारों कम्युनिस्टांना तुरुंगांत किंवा सक्तीच्या मजूर छावण्यांत पाठवण्यांत आलें. शिक्षा देण्यांत एक प्रकारची " समता " प्रस्थापित करण्यांत येत आहे. आणि पोलादी पडद्यामागें " हीच " एक प्रकारची समता अस्तित्वांत आहे.

प्रत्येक राष्ट्रीय कम्युनिस्ट संघटनेमध्यें प्रमुख चिटणीसच पक्षयंत्र ताब्यांत ठेवीत असतो. याच पद्धतीनें स्टॅलिननें लेनिनच्या गादीवरून इतर सर्वांना, सर्व उमेदवारांना बाजूला ढकललें—आणि आज देखील तो रशियन पक्षाचा चिटणीस आहे—या दृष्टीनें बघितल्यास क्रेमलिननें मांडलिक युरोपांत काय काय केलें आहे तें समजून येईल. पूर्व युरोपांतील पक्षांच्या सहा प्रमुख चिटणीसांपैकीं पांच जणांना १९५२ पर्यंत देहान्त शिक्षा मिळाली होती किंवा त्यांच्यावर खटले चालवून अंत घडवून आणण्यांत आला होता. रुमानियामध्यें ल्यूक्रेटियू पॅट्रास्केनो यांना तुरुंगांतच ठार मारण्यांत आलें. बल्गेरियाचें ट्रेचो कॉस्टोव आणि अल्बानियाचे कोचे खोखे यांना देहान्त शिक्षा देण्यांत आली. पोलंडचे व्लादीस्लॉ गोमुलका आणि चेकोस्लोव्हाकियाचे रुडॉल्फ स्लॅन्स्की आपल्या खटल्याची वाट पहात होते. पण त्यांच्या नशिबात हेंच मरण लिहिलेलें हाते. हंगेरीचा मात्यास राकोसी हा एकच मांडलिक राज्यांतील पक्षाचा प्रमुख चिटणीस जिवंत आहे पण त्याचे खाजगी चिटणीस व निकटवर्ती आप्तमित्र यांची व त्यांची ताटातूट करून टाकलेली आहे. हंगेरीच्या चार प्रमुख कम्युनिस्टांपैकीं एक माजी गृहमंत्रि लाज्स्लो राज्क यांना देशद्रोही

ठरवून देन्हात शिक्षा देण्यांत आली. मांडलिक राज्यांत दुसऱ्यांना ठार मारणाऱ्या प्रमुख लोकांचीच आतां हत्या होत आहे.

या कर्मठ धर्मांध कम्युनिस्टांना "पक्षाचा कोणता अपराध" केल्या-बद्दल दोषी ठरविण्यांत आलें होतें ? "पश्चिमेकडच्या साम्राज्यवाद्यांशीं संगनमत करून कारस्थान रचणें" हा यांचा एकमेव अपराध नव्हता-यावर तिळमात्र विश्वास ठेवतां येत नाहीं. "राष्ट्रीय पथभ्रष्टता" हाही त्यांचा एक अपराध होता. याचा अर्थ पोलंडच्या हिलेरी मिंक यांच्या शब्दांत म्हणजे "स्टॅलिनच्या प्रवचनांच्या उपयुक्ततेवर अविश्वास दाखवणें" हा सर्वांत भयंकर अपराध होता.

मांडलिक देशांतले खटले आणि सर्वोच्च कम्युनिस्ट पुढाऱ्यांची हत्या काय दाखवून देते ? हें असेंच सिद्ध करून दाखवितें कीं कोणताही मांडलिक राज्यांतला कम्युनिस्ट पुढारी जास्त सामर्थ्यवान बनला कीं तो क्रेमलिनच्या दृष्टीनें संशयास्पद ठरतो. आणि ही समस्या सोडविण्याचा एकुलता एक मार्ग म्हणजे त्या व्यक्तीचें पक्षावर व्यक्तिशः नियंत्रण वाढलें असल्यानें त्या व्यक्तिलाच पाश्चिमात्य हेरांशीं संगनमत केल्याच्या खोट्या आरोपाखालीं अपराधी ठरवून त्याचा कायमचा कांटा काढून टाकणें !

या रोगट भयाचा काय परिणाम होईल ? क्रेमलिनच्या अधिकाऱ्यांची भीति वास्तविक अंशतः खरी व असाध्य स्वरूपाची आहे. ही भीति कमी कमी करण्यासाठीं बाहुली राज्यांतील आजीव कम्युनिस्टांचा ते फडशा पाडीत आहेत. पण जसजसे ते आपल्या साथीदारांचा अंत करीत आहेत तसतशी ती भीति त्यांना जास्तच ग्रासत आहे. अत्याचारांवर आधारलेली राज्यव्यवस्था कधींहि त्या अत्याचारांपासून अलिप्त राहूं शकत नाहीं. कारण तिनें स्वतःच त्या अत्याचारांना जन्म दिलेला असतो. हेंच तें कम्युनिस्ट विजेत्यांचें दुर्दैवी आणि शाश्वत दुष्ट स्वप्न !

**( ३ ) मागासलेलें औद्योगीकरण !**

ही खरोखरच एक दीर्घकालीन काळजी आहे. पंचवार्षिक योजनांची दुःखदायक वाटणारी धीमी आणि असमान प्रगति हाच याचा उत्कृष्ट पुरावा आहे. या योजनांच्या भरमसाट दर्शविलेल्या प्रमाणांत किंवा त्या

भरमसाट उद्दिष्टांची पूर्ति करण्याइतकें कोळसा, तेल व वीज यांचें उत्पादन आणखी कांहीं वर्षांत होणें शक्य नाहीं. जुनीं यंत्रें व साधन-सामुग्री दरवर्षी फारच थोड्या प्रमाणांत बदलली जाऊं शकते. शेंकडों, हजारों नवशिक्या स्त्रीपुरुषांना कामाला लावल्यामुळें त्यांना यथायोग्य शिक्षण देण्यांतच महिने महिने, वर्षानुवर्षे फुकट निघून जातात. वास्तविक खऱ्या अर्थानें कामाला योग्य अशा कार्यकर्त्यांची फौज जमवावयाची म्हटल्यास आणखीच कांहीं वर्षें लागतील !

## ( ४ ) विरोध आणि जाणून बुजून मोडतोड !

स्टॅलिनवादी व्यवस्थेच्या द्वारें क्रौर्यानें भरलेल्या परिस्थितींत काम करवून येणें व बाहुली राज्यांतील अतिशीघ्र उत्पादनाची गति बदलणें तर शक्य नाहीं. याच कारणामुळें मजुरांना आत्यंतिक विरोध करीत राहणें भाग पडतें. शिवाय अत्यंत मोठ्या औद्योगीकरणामुळें मजुरांची नेहमीच कमतरता भासणें ही गोष्ट त्यांच्या सतत पथ्यावरच पडते. मांडलिक राज्यांतील मजुरांची आवश्यकता असल्यामुळें त्यांना फार मोठ्या प्रमाणावर तुरुंगांत पाठवितां येत नाहीं. ते खूप दिवसपर्यंत कमी काम करून, गैरहजर राहून, बदली करून घेऊन, गुप्तपणें मोडतोड करून, व इतर अडथळ्यांचा उपयोग करूनही आपलें स्थान टिकवूं शकतात.

इथेंही स्टॅलिनवादी शासकांना मोठा पेंच पडलेला आहे. पूर्व युरोपांतील मजुरांवर शासकवर्ग जितकें जास्त दडपण आणील तितक्याच जास्त प्रमाणांत हे मजूर नुकसान करायला व गुप्तपणें विरोध करायला कंबर कसून तयार होतात. त्यांना हें पूर्णपणें माहीत असतें कीं आपल्या देशाप्रमाणेंच आपल्यालाही रशियाचें सामर्थ्य वाढीला लावण्यासाठींच वेठीला धरलेलें आहे. या पिढीचें स्वदेशप्रेम व स्वजागृतीची भावना नष्ट करणें कालत्रयीं शक्य नाहीं. मजुरांचें स्वतःचें कल्याण व त्यांच्या देशाचें व कायम स्वरूपाचें कल्याण या दोन्ही गोष्टींचा एक प्रकारचा अविभाज्य संबंध आहे.

## ( ५ ) अडेलतट्टू शेतकरी !

सोव्हिएट राज्य स्थापन होऊन तीस वर्षें झालीं. तरी देखील अजूनही एक गट त्यांचा कट्टर विरोधक आहे. आणि तो म्हणजे शेतकरी ! परंतु

पूर्व युरोपांतील अधिकांश शेतकरी जनता अत्यंत हटवादी आहे, त्यांनीं स्वतंत्र संघटना, स्वतंत्र राजकीय कार्य यांचा स्वतः अनुभव घेतलेला आहे. या गोष्टी रशियन शेतकऱ्याला माहीत नाहींत.

मांडलिक राज्यांतल्या शेतकऱ्यांच्या जीवनावर त्यांच्या राष्ट्रीय पक्षांचा बराचसा प्रभाव पडतो. अशी ज्या शेतकऱ्यांची परंपरा आहे ते शेतकरी रशियन शेतकऱ्यांपेक्षां कमी तडफेनें व कमी चातुर्यानें सामुहीकरणाला विरोध करणें कधीं तरी शक्य आहे काय ?

बाहुली राज्यांतले हे शेतकरी खाद्यपदार्थ देण्याला विरोध करणारच ! तसेंच खाद्यपदार्थांच्या उत्पादनालाही सतत नुकसान पोंहोंचवीत राहणार यांत शंका नाहीं. विदेशी शेतकरी असल्यामुळें सोव्हिएट धर्तीच्या गुलामगिरीला तोंड देण्याची त्यांना दुप्पट प्रेरणा मिळते. ते आपल्या व आपल्या मुलाबाळांच्या स्वातंत्र्यासाठीं लढत आहेत. सामुहीकरण बंद केल्याखेरीज क्रेमलिनला ही लढाई थांबवितां येणार नाहीं. आणि स्टॅलिनवादाचा पायाच असलेलें भूमीचें तत्त्वही क्रेमलिन सोडूं शकत नाहीं. या कटु आणि निराशाजनक संघर्षाचा निकट भविष्यांत शेवट होईल असें कांहीं दिसत नाहीं. मॉस्कोची यांतून सुटकाही होऊं शकणार नाहीं किंवा आणखी दहावीस वर्षे या लढाईत जय मिळण्याचीही त्याला आशा नाहीं.

### ( ६ ) लोकांची धर्मनिष्ठा नष्ट करणें कम्युनिस्टांना शक्य होईल का ?

पोलादी पडद्यामागच्या देशांत प्रत्येक चर्च संघटनेवर आणि धार्मिक मतांवर अधिकार मिळविणें कम्युनिस्टांना फारच सोपें गेलें. परंतु कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, व इतर भिन्नभिन्न धर्मीयांची धर्मश्रद्धा व धर्मनिष्ठा मात्र त्यांना पूर्ण नष्ट करतां आली नाहीं. स्टॅलिनवाद्यांनीं केलेल्या भयंकर छळामुळें मांडलिक राज्यांतील सामान्य जनतेची धर्मनिष्ठा जास्त वाढल्याचे पुरावे ठिकठिकाणीं दिसून येतात. या लोकांच्या धार्मिक विचारांना मॉस्को आपला महाभयंकर शत्रू समजत आहे. पण हा विरोध कसा हाणून पाडतां येईल ?

गुलाम युरोपांतले बहुसंख्य प्रौढ लोक—मग ते रोमन कॅथॉलिक, ऑर्थॉडॉक्स, यहुदी किंवा प्रॉटेस्टंट, कुणीही असोत—आपल्या धर्मालाच आपल्या

आत्मिक सामर्थ्याचें एकमेव साधन समजतात. त्यांचा धर्म हेंच छळ व अत्याचारानें गांजलेल्यांना एक विसाव्याचें स्थान आहे. तीच त्यांच्या सहनशक्तीची प्रेरक शक्ति असून अंतिम विजयाची त्यांतच त्यांना आशा आहे. नैतिक आणि आत्मिक विरोधाचा तो एक गुप्त बालेकिल्ला आहे. तो नष्ट करणें स्टॅलिनवाद्यांना शक्य नाहीं. परंतु त्यांच्या अस्तित्वाबद्दल सतत जागरूक राहतात. युद्धाच्या वणव्यामध्यें ही गाढ धर्मनिष्ठाच स्वदेशप्रेमानें विरोध करायला लावून बंडाची ज्योत भडकावील याची त्यांना जाणीव आहे. स्वदेशप्रेम व धर्मनिष्ठा यांच्या मैत्रीचें भय सतत स्टॅलिनवाद्यांना वाटत राहणारच! मांडलिक राज्यांतली ही पिढी जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत कम्युनिस्टांचा विजय कायम बनविण्याच्या मार्गातली ती एक धोंड त्यांना अडवीतच राहील!

### (७) लाखो पूर्व युरोपियनांचें रशियनीकरण असंभाव्य!

पोलादी पडद्यामागच्या जनतेचें रशियनीकरण करण्याच्या क्रेमलिनच्या प्रबळ प्रयत्नांमध्यें मन प्रसन्न करणारी एकच गोष्ट आहे ती म्हणजे हे प्रयत्न खुद्द त्यांनाच हार खायला लावणारे आहेत. पोलंड, चेस्कोस्लोव्हाकिया, हंगेरी, बल्गेरिया किंवा रुमानियाच्या रहिवाशांना रशियावर प्रेम करायला लावण्या-इतकी असंभाव्य गोष्ट दुसरी कोणती असणार? आपलें राष्ट्रीय स्वरूप, जन्मजात निष्ठा व आपल्या विशिष्ट परंपरा टिकवण्याच्या बाबतींत मनुष्यप्राणी फारच हटवादी असतो. या गोष्टी लक्षांत घेतां पोलितब्यूरोला आणखी कमींत कमी २५ वर्षेंतरी चिंताग्रस्त मनःस्थितींत काढावीं लागतील.

### (८) पुष्कळ प्रमाणांत व फार घाईनें!

१९२० च्या दशवर्षकाळांत पहिली पंचवार्षिक योजना सुरू केल्यानंतर क्रेमलिननें सोव्हिएट जनतेकडून जीवघेण्या वेगानें काम करून घ्यायला सुरुवात केली आहे. फेब्रुआरी १९३१ मध्यें स्टॅलिननें आपल्या पक्षपुढाऱ्यांना सांगितलें, "मित्रहो, हा वेग कमी करणें योग्य होणार नाहीं. वेग कमी करणें म्हणजे मागें पडणें होय, आणि जे मागासले जातात ते मारले जातात."

स्टॅलिनचें म्हणणें खरें होतें हें हिटलरनें रशियावर केलेल्या आक्रमणानें सिद्ध करून दाखवलें. परंतु युद्धकाळांत आणखीच काम वाढवलें गेलें.

युद्धानंतर सोव्हिएट जनतेला विश्रांतीची अत्यंत आवश्यकता होती. तरी-देखील पुढच्या तीन चार पंचवार्षिक योजनांच्या उत्पादनाचा भार सहन करणें त्यांना भाग पडलें. मला असें वाटतें कीं सध्यांच्या काळांत जवळ-जवळ पंचवीस वर्षांत कोणत्याही देशांतील जनतेला अन्नवस्त्राची इतकी ददात सोसून इतके कठीण परिश्रम करावे लागले नसतील. आणि आज देखील त्यांच्यावर मरेमरेतों काम करण्याची सक्ति केली जात आहे.

मुळींच न थांबतां किंवा कामाचें नुकसान न करतां या आजच्याच गतीनें आणखी वीस वर्षे सोव्हिएट जनता अखंड काम करीत राहील काय? आणखी किती वेगानें व किती दूरवर ते जाऊं शकतील? रशियनांमध्यें एक म्हण आहे कीं "रशियन माणूस कोणतीही व कशीही गोष्ट सहन करूं शकतो;" पण कांहीं असलें तरी सहनशक्तीलाही कांहीं मर्यादा आहेच ना?

स्टॅलिनवादी ज्या तऱ्हेनें आपल्या घरच्या लोकांकडून जबरदस्तीनें काम करून घेतात त्याच तऱ्हेनें गुलाम बनलेल्या विदेशी जनतेकडून करून घेऊं शकतील काय? या सर्व लोकांचें आयुष्य चांगल्या प्रकारें व चांगल्या परिस्थितींत गेलेलें आहे. त्यांनीं नक्कीच जास्त स्वातंत्र्याचा उपभोग घेतलेला आहे. आपल्या गुलामगिरीच्या शृंखला जास्त बळकट व पक्क्या करण्यासाठीं या लोकांनीं देहदंड कां सोसावा? किंवा शिक्षा तरी कां मान्य करावी? आणखी एक पंचवार्षिक योजना म्हणजे अधिक कष्ट, अधिक थकवा आणि अधिक मिळवणूक हें या लोकांना माहित आहे. जितक्या कडकपणें व जितक्या वेगानें त्यांना काम करायला सांगितलें जातें तितक्या कमी वेगानें व अडथळे आणून काम करायचें हें त्यांनीं ओळखलें आहे. क्रेमलिनचे अधिकारी हे सत्य नाकबूल करीत असले तरी त्यापासून त्यांची सुटका होणें मात्र शक्य नाहीं.

## (९) रशियाचा सर्वांत भयंकर शत्रू—"सत्य!"

सोव्हिएट विजेत्यांना सतावणाऱ्या सर्व प्रकारच्या भयांमध्यें सत्याचें भय जास्त भयंकर आहे व अपरिहार्यही आहे. एक सामान्य नकाशा पण त्याबाबत जगांतील दुसऱ्या प्रतीच्या सामर्थ्यवान् माणसाची काय प्रतिक्रिया दिसून आली? सोव्हिएट कैदी-छावण्यांचा अमेरिकन लेबर फेडरेशननें

तयार केलेला हा नकाशा. संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या सूचना-विभागानें प्रसारा-करतां याच्या हजारों प्रती तयार केल्या होत्या. रशियनांनीं सर्व प्रती जप्त केल्या आणि व्हिएन्नाचा बुकबाइंडर व त्याची पत्नि या दोघांना कैद केलें. छोट्याशा ऑस्ट्रियामध्येंदेखील सोव्हिएट कैदी-छावण्यांबाबतचें सत्य भयंकर धोका देणारें सिद्ध झालें आहे.

कोणत्याही शतकात व कोणत्याही झोटिंगशहानें सत्याला इतकें विकृत स्वरूप दिलें नसेल. तसेंच " अश्राव्य " अशा बातम्या आपल्या जनतेच्या कानांवर पडूं नयेत म्हणून इतके विलक्षण सायास व इतका पैसा खर्च केला नसेल. हिशोब केला असतां असें आढळून आलें कीं रशिया व इतर मांडलिक राज्यांनीं फक्त १९५० सालीं प्रचारासंबंधींच्या सगळ्या कामां-साठीं जवळजवळ १०·४ अब्ज डॉलर खर्च केले सोव्हिएट व्यवस्था व तिच्या विजयाच्या कार्यपद्धती फसवेगिरी, मोडतोड, असत्य व छळवाद यांच्यावर आधारलेल्या आहेत. अर्थात् प्रत्येक अश्राव्य सत्य किंवा स्वतंत्र मत क्रेमलिनचें सामर्थ्य व सत्ता या दृष्टीनें भयप्रद ठरतें.

आपला जीव वांचवून स्वतंत्र जगांत आलेला पूर्व युरोपांतला प्रत्येक माणूस सोव्हिएट विजयासंबंधींचें अगदीं अल्प प्रमाणांतलें पण अत्यंत घातकी स्वरूपाचें सत्य आपल्याबरोबर घेऊन येतो. खऱ्या सत्याचें हे अणुपरमाणु क्रेमलिनच्या अत्याचारी लोकांना भेडसावण्यास पुरेसे असतात. म्हणून त्यांनीं प्रत्येक मांडलिक राज्याच्या सरहद्दीवरील प्रदेशांत सुरुंग पेरून ठेवले आहत, काटेरी व विजेच्या तारांचें जाळें पसरून ठेवलें आहे, जागोजाग पहाऱ्यासाठीं उच्च मनोरे उभारले आहेत, व तिथून रात्रभर प्रकाशझोत फिरते ठेवले आहेत. आजपर्यंत कधींही सबंध राष्ट्राला वेढा घातलेला नाहीं. परंतु, " ठार मारण्यासाठींच गोळीबार करा." असा हुकूम मिळालेले सरहद्दीवरचे पहारेकरी, शिकारी कुत्रे इत्यादि संकटांची क्षिति न बाळगतां १९५१ सालीं दर महिन्यांत मांडलिक राज्यांतल्या अत्याचारांतून निसटून बहुधा १५०० साहसी माणसें स्वतंत्र जगांत पळून आलींच. ११ सप्टेंबर १९५१ रोजीं चेकोस्लोव्हाकियाचा एक शूर इंजिनियर ज्याला पोलादी पडदा म्हणतात तो पडदा फाडून आपल्या आगगाडीसकट पळून

आला. कांहीं दिवसानंतर चेकोस्लोव्हाकियांतल्या लोकांचा आणखी एक गट लष्करी गाडी घेऊन आला. अर्धे युरोपियन लोक निसटून पळून येणारच. त्यांना अडविणें शक्य नाहीं, तसेंच अर्ध्या युरोपला सोव्हिएट तुरुंगांत डांबणेंही शक्य नाहीं. सत्य कधींच लपवतां येत नाहीं.

अशा प्रकारच्या सतरा दुष्ट स्वप्नांच्या स्वरूपाच्या व सामर्थ्यांच्या बाबतींत मोजमाप करणें शक्य नाहीं. पोलितबरोपुढें सतत उभ्या असलेल्या या प्रश्नचिन्हांपैकीं एकाचेंही कायम स्वरूपाचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं, किंवा या समस्या आणखी दहा वर्षें दूरही होऊं शकणार नाहींत. यांपैकीं कांहीं समस्या तर जोंपर्यंत सध्यांचे पुढारी जिवंत आहेत तोंपर्यंत सुटणें शक्य नाहीं. उलट या दुष्ट स्वप्नांचें स्वरूप येत्या कांहीं वर्षांत आणखीच भयानक होईल. स्वतंत्र व्यक्तीच सत्य आपलेसें करूं शकतात आणि प्रत्येक बाबतींत स्वातंत्र्यासाठीं सत्याचा उपयोग करूं शकतात. कांहीं असो, आम्हीं सुरुवात तर केली आहे. आम्ही निराशावादी काय म्हणून व्हावें ? आम्हांला फक्त सत्याचाच प्रयोग करायचा आहे. कारण सत्याचीही आमच्याजवळ हीच मागणी आहे. आपलें अत्यंत घातकी अस्त्र म्हणून सत्याचा आम्ही उपयोग करीत आहोंत हें आम्ही जाणलें पाहिजे. त्याचबरोबर याचा जास्त प्रभाव पडण्यासाठीं कशा तऱ्हेनें हा सत्याचा प्रयोग करायचा हें देखील आम्ही जाणून, समजून घेतलें पाहिजे.

●●●

कम्युनिस्टांची डुक्करमुसंडी मारून घुसण्याची प्रथा व त्यावरून कॉमिन्फॉर्मला जो विजय मिळतो त्या कचाट्यांतून लोकांना—आम्हीही त्यांतच आहोंत—कसें वांचवितां येईल ?

पश्चिमेकडच्या लोकशाही राज्यांविरुद्ध सोव्हिएट रशियानें जें "शीतयुद्ध" सुरू केलें त्याचा प्रथम आपण खरा अर्थ समजून घेतला पाहिजे. मॉस्कोनें १९४५ च्या सुरवातीला रुमानिमा व पोलंड या ठिकाणीं "प्रातिनिधिक" सरकारें स्थापन करण्यांत अडथळा आणून हें युद्ध सुरू केलें. याल्टा कराराची शाई वाळण्यापूर्वीच सोव्हिएट पुढाऱ्यांनीं तो करार मोडायला सुरुवात केली. व अशा तऱ्हेनें "शीतयुद्ध" सुरू झालें.

त्यांनीं सुरवातीलाच हें पक्कें ओळखलें होतें कीं "शीतयुद्ध" म्हणजे संकटें झेलण्याचें साहस व विचार या दोन्हींमधली लढाई आहे. "प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणें" हें घोषवाक्य जरी सोव्हिएट गुलाम राज्यांत दुमदुमत असलें तरी पक्ष-सभासदांना या राज्यांत पुष्कळ विशेषाधिकार मिळत असून ते धनिक बनत चालले आहेत. यापेक्षां भयंकर अशी फसवणूक आजपर्यंत कधींही कुणाची झालेली नाहीं. परंतु ज्या लोकांना आपल्या आयुष्यांत कधींच कुठलीच गोष्ट पुरेशी मिळालेली नाहीं अशा अज्ञानी लोकांना लोभून टाकायला हें घोषवाक्य पुरेसें आहे. जगांतल्या गरीब लोकांना आमच्या इतक्याच आकर्षक परंतु त्यांच्या जीवनाशीं निकट संबंध असणाऱ्या वस्तु मिळवून देण्याचें जर आम्हीं आश्वासन दिलें नाहीं तर खात्रीनें कम्युनिस्टांचाच विजय होईल. जगांतल्या उपाशीं लोकांचें पोट जो भरतो तो कम्युनिझमचा नाश करतो.

संयुक्त राष्ट्र अमेरिकेची चौथी ध्येयपूर्तीची योजना याच योग्य विचारावर आधारलेली आहे. अमेरिकेच्या व पाश्चिमात्यांच्या तंत्रविषयक पद्धतीच्या द्वारें जगांतील मागासलेल्या लोकांचें खाद्यपदार्थांचें उत्पादन व प्रकृतिमान सुधारणें; त्याहूनही मागासलेल्या लोकांना मदत करून स्वावलंबनाचें शिक्षण देणें; टेनेसीचे होरेस होम्स यांनीं भारतीय सरकारच्या प्रायोगिक "इटावा-योजने" मध्यें अमेरिकेची शेतीपद्धति अमलांत आणून पुढील प्रकारचें फळ मिळवलें आहे : गव्हाच्या उत्पन्नांत शेंकडा ६३ टक्के व बटाट्याच्या उत्पन्नांत शेंकडा ११२ टक्के वाढ झाली. बटाट्याच्या उत्पन्नापासून या योजनेच्या वार्षिक खर्चापेक्षां दसपट नफा झाला. चौथी ध्येयपूर्ती-योजना व संयुक्त राष्ट्र अमेरिकेंतले कांहीं ग्रामीण प्रतिनिधि यांच्या मदतीनें ६०,००० हिंदूंना सर्व भारतभर शेतकीशिक्षण देण्याची योजना होम्स यांनीं तयार केली आहे.

पाश्चिमात्य शास्त्रज्ञांच्या चमत्कृतिपूर्ण शोधांच्या द्वारें अजूनदेखील कम्युनिस्टांनीं चालविलेल्या शोषणापासून उपाशी जनतेला वांचवितां येईल. संयुक्त राष्ट्र अमेरिकेंत तयार झालेल्या क्रिलियन नांवाच्या एका पदार्थामुळें निकृष्ट जमीन कांहीं तासांतच सकस बनवतां येते. विल्यम एल्. लॉरेन्स यांनीं असें सांगितलें कीं, जवळजवळ ८० शास्त्रज्ञांनीं केलेल्या प्रयोगांवरून असें दिसून येतें कीं, "हें नवें रसायन शेतकीक्षेत्रांत एका नव्या क्रांतिकारक युगाला जन्म देईल. मानवानें निर्माण केलेलीं वाळवंटें हिरव्यागार उद्यानामध्यें परिणत होतील." १९५३ पर्यंत हा रासायनिक पदार्थ पुरेशा प्रमाणांत मिळूं शकेल. पाश्चिमात्य विज्ञान व तंत्रविद्या यांना एकत्र करून आम्ही जर जगाच्या भुकेविरुद्ध त्याची भिंत उभारली—आणि योग्य वेळीं आम्ही हें काम करूं शकलों—तर भारतापासून ते दक्षिण अमेरिकेपर्यंतच्या जनतेला जिंकण्याचें क्रेमलिनचें स्वप्न नष्ट होईल, भंग पावेल.

## अमेरिकेकडून होणारा सत्याचा प्रचार !

एप्रिल १९५० मध्यें प्रेसिडेंट ट्रूमन यांनीं मॉस्कोच्या "अमेरिकेबद्दलचा द्वेष" या विषपूर्ण प्रचाराला उत्तर देतांना म्हटलें होतें, "आम्ही

खरेखुरे जसे आहोंत तसेंच जगाला दाखवलें पाहिजे. कम्युनिस्टप्रचार आमचें जें चित्र रेखाटतो तसे नव्हे.

अमेरिकेचा रेडिओ व स्वतंत्र युरोपचा रेडिओ हे दोन्ही फार मोठें काम करीत आहेत आणि परस्परांच्या प्रयत्नांना हातभार लावीत आहेत. अमेरिकेचा रेडिओ संयुक्त राष्ट्र अमेरिकेच्या सरकारतर्फे अधिकृतरीत्या अमेरिकेचें तत्त्व व अमेरिकेचा दृष्टिकोन जगापुढें मांडीत आहे. स्वतंत्र युरोपांतील रेडिओमध्यें अमेरिकन व पूर्व युरोपांतील निर्वासित लोक यांची संयुक्त योजना व खाजगी भांडवल गुंतलेलें असल्यामुळें हा रेडिओ गुलाम युरोपच्या लोकांसाठीं व त्याच लोकांतर्फे बोलत असतो.

आम्हीं मॉस्कोमधले कांहीं पुरावे एकत्र केले त्यावरून असें दिसतें कीं सुरवातीलादेखील नियमितपणें अमेरिकेचा रेडिओ ऐकणारे सोव्हिएट लोक जवळ एक कोटि आहेत.

स्वतंत्र युरोपचा रेडिओ कैद्यांना जाणीव करून देत असतो, कीं, " जगांत तुमचे सामर्थ्यवान् मित्र आहेत. ते तुम्हांला विसरलेले नाहींत. तुमच्या देशांतले रहिवासी तुमच्या कल्याणाच्या गोष्टी करीत आहेत. तुम्ही गुप्त रूपानें बाहेर सूचना पाठवून किंवा विरोध करून स्वतःलाच मदत करूं शकाल. कम्युनिस्टांच्या खोट्या गोष्टी व त्यांचे अपराध उजेडांत आणले जात आहेत. तुम्ही आशा सोडूं नका. शेतकऱ्यांनों, मजुरांनों, स्त्रियांनों, तरुणांनों, आमचें म्हणणें लक्षांत ठेवा. " जनतेच्या प्रत्येक महत्त्वाच्या घटकांसाठीं कार्यक्रम असतात.

## गुलाम युरोपच्या जनतेला आम्ही काय देऊं शकूं ?

स्वतंत्र युरोपांतील रेडिओच्या कार्यकर्त्यांचा अनुभव याचें उत्तर कोठें मिळेल तें सांगतो. पूर्व युरोपांतील पांच भिन्नभिन्न राष्ट्रांतील शेंकडो व्यक्ती एकत्र येऊन एका महान् कार्याचें संचालन करीत आहेत. ही पहिलीच सुवर्णसंधि असावी. स्वतंत्र युरोपांतील रेडिओ पूर्व युरोपांतील लोकांच्या सहकार्याचें एक सामान्य पण महत्त्वाचें शिक्षण-केंद्र आहे. खरें पाहतां तें नकळतच सुरू केलें गेलें. पोलंड आणि चेकोस्लोव्हाकिया, हंगेरी, रुमानिया

आणि बल्गेरिया येथील लोकांना एकत्र येऊन सहकार्यानें काम करण्याचा अनुभव मिळणें या खेरीज महत्त्वाचें काम सध्यां दुसरें कोणतेंच नाहीं.

पंचवार्षिक योजनांच्या द्वारें रशियनांनीं समग्र पूर्व युरोपचें एक अपूर्व आर्थिक एकीकरण केलें आहे. पोलादी पडद्यामागच्या जकातीच्या भिंती खालीं घसरवल्या आहेत. आतांपर्यंत कधीं नव्हता इतका त्यांचा व्यापार परस्परांत वाढला आहे. त्यांचीं सरकारें आर्थिक योजनांचें एकीकरण करीत आहेत. पूर्व युरोपचें राजकीय एकीकरण झालें आहे—परंतु तें बळाच्या जोरावर. लाल विजेत्यांनीं नकळतच पूर्व युरोपच्या राजकीय व आर्थिक एकीकरणाचें बीं पेरलें आहे. या विस्तीर्ण प्रदेशाच्या प्रादेशिक ऐक्याचा पाया रचला आहे. सोव्हिएट विजयाचा हा एकुलता एक चांगला परिणाम आहे.

पूर्व युरोप स्वतंत्र झाल्यानंतर स्वतंत्र पश्चिमेनें त्यांना काय दिलें पाहिजे ? कोणतीही गोष्ट निवडण्याचें स्वातंत्र्य ! पण त्याचबरोबर निवडण्यासारखी एकादी गोष्टही हवी !

ती गोष्ट म्हणजे अमेरिका, ब्रिटन, किंवा फ्रान्स येथें अस्तित्वांत असलेल्या पद्धतीची लोकशाही खासच नव्हे ! लोकशाही स्वायत्त शासनसंस्था पुनः प्रस्थापित केल्यानंतरही चेकोस्लोव्हाकिया, हंगेरी व बल्गेरिया ( केवळ तीनच देशांचा उल्लेख केला आहे ) संपूर्ण राष्ट्रीय अर्थव्यवस्था कायम स्थापूं शकणार नाहीं किंवा आपल्या राहणीचें मान., उच्च दर्जावर ठेवतां येणार नाहीं. कांहींही असो, पोलादी पडद्यामागच्या सर्व देशांना स्वातंत्र्य मिळाल्यानंतरची त्यांची परिस्थिति पश्चिमेकडच्या लोकशाही राज्यांच्या अनुभवाला आली त्यापेक्षां सर्वस्वीं भिन्न स्वरूपाची असेल, त्यांच्याजवळ शेंकडों नवे कारखाने असतील पण साधनसामुग्री दुर्बळ असेल. राष्ट्रीय भांडवल अगदीं कमी असेल. पूर्णपणें बदललेल्या विचारांच्या लोकांनीं भरलेलीं हीं सारीं बाहुली राज्यें पुन्हा या परिस्थितींत स्वतंत्र होतील.

## विसाव्या शतकांतील महान् क्रांति आमची आहे !

आम्हीं हें नीट बघितलें पाहिजे. नीट समजून घेतलें पाहिजे आणि विशेष म्हणजे त्यासाठीं काम केलें पाहिजे.

माझी खात्री आहे कीं मी आपल्याला जें कांहीं सांगितलें तें मला आपल्याकडूनच समजलें आहे. त्याचप्रमाणें मीं दिलेलीं बेसुमार प्रमाणेंही पूर्णपणें सत्य असल्याबद्दल माझी खात्री आहे. गुलाम युरोपांत कम्युनिस्टांनीं चालवलेल्या कारवाया शेंकडा ६० टक्के खऱ्या आहेत असें मानलें तरी देखील स्वतंत्र जनतेला त्या किती धोका उत्पन्न करणाऱ्या आहेत हें सांगणें कठीण आहे. कांहीं असो, मला एवढेंच माहीत आहे कीं स्टॅलिनवादी विजय व सोव्हिएटीकरणाचे पैलू, कोणतीही ठाकठोक किंवा मोडतोड न करतां, मी आपल्यापुढें मांडले आहेत आणि ते सुद्धां पांचही मांडलिक राज्यांतून मिळालेल्या निःसंदिग्ध प्रमाणांवर आधारलेले आहेत. अत्याचारानें कम्युनिस्टांनीं मिळवलेल्या विजयाचें संपूर्ण चित्र पाहिलें असतां तें खरेंखुरें चितारलेलें आहे हें मी शपथेवर सांगूं शकतों. काळच याची सत्यता पटवून देईल. रक्त आणि सक्तीची उपासमार, लाखों बालबुद्धीचें हरण, आणि विकृतीकरण, असंख्य विश्वासघात व दुःखद अंत यांच्या शाईनें लिहिलेले ढीगभर पुरावे आणि स्टॅलिन (पोलादी पुरुष) म्हणवल्या जाणाऱ्या व्यक्तीच्या सेवकांनीं पोलादी लेखणीनें लिहिलेले पुरावे आणखी किती वर्षें या चित्राची सत्यता निःसंशय पटवून देत राहतील कोण जाणे!

आतां फक्त एकच प्रश्न शिल्लक राहिला आहे!

**आपलें आणि माझें व्यक्तिशः कर्तव्य!**

माझ्या मतें आपल्याला किंवा मला या कर्तव्यापासून स्वतःची सुटका करून घेतां येणार नाहीं.

मी स्वतःबद्दल खात्रीपूर्वक सांगू शकतों; कारण मी आयुष्यभर एक उदारमतवादी अमेरिकन व स्वतंत्र मतप्रदर्शक म्हणून राहिलों आहे. मी एक वार्ताहरही आहे. क्रूर आणि कुत्सित सत्यगोष्टी पाहून देखील एकादा वार्ताहर डोळे मिटून घेऊं शकेल का? कोणताही उदारमतवादी मनुष्य स्वातंत्र्याची हत्या होत असलेली पाहून गप्प राहूं शकेल का? कारण हें स्वातंत्र्य तो आयुष्यभर मौल्यवान् समजत व सांगत आलेला असतो. आपल्या देशावर आणि इतर स्वतंत्र जनतेवर संकटाची छाया पसरवणाऱ्या

बंदीकरणाच्या क्रियेचा सुगावा लागल्यावरही कोणी " अमेरिकन " त्यावर पडदा सारूं शकेल का ? कांहीं लोक असें करूं शकतात. पण मग त्यांना वार्ताहर, उदारमतवादी किंवा अमेरिकन—कांहींच नांव देतां येणार नाहीं.

खरी गोष्ट अशी आहे कीं, ज्या ज्या ठिकाणीं मानवी अधिकारांवर वज्राघात होत असेल, ते अमान्य केले जात असतील किंवा नष्ट केले जात असतील त्या त्या ठिकाणीं त्या मानवी अधिकारांचें संरक्षण करणें, झोटिंगशहांना प्रत्येक बाबतींत विरोध करणें व त्यांचे दोष उकलून दाखविणें हें प्रत्येक उदारमतवादी व्यक्तीचें कर्तव्य आहे. युद्धानंतर कांहीं काळ पुष्कळांनीं माझ्याचप्रमाणें रशियाला संशयाचा फायदा घेऊं दिला असेल; सुधारणा होईल या खोट्या आशेनें आपला निर्णय सांगितला नसेल. पण फेब्रुआरी १९४८ मध्यें झालेली चेकोस्लोव्हाकियाच्या लोकशाहीची हत्या कोणाला कशी समजूं शकेल ? दक्षिण कोरियावर कम्युनिस्टांनीं केलेल्या अमानुष आक्रमणाची प्रतीक्षा करण्याची कुणाला गरज होती ! स्वतःला उदारमतवादी म्हणविणारी कोणीही व्यक्ति कम्युनिस्टांचें सत्यस्वरूप उघडपणें व पूर्णपणें समजून घेण्यास नकार देईल तर त्या व्यक्तीला "उदारमतवादी' म्हणतांच कामा नये.—आणि कदाचित् तो मनानें उदारमतवादी नसेलही. उदारमतवादी व्यक्तीचें कर्तव्य या नात्यानें हें पुस्तक लिहिण्याखेरीज याचें एक व्यक्तिशः कारणही आहे, —आणि तें म्हणजे आपल्या आत्म्याशीं खरेंपणा बाळगणें— !

पण वास्तविक पाहतां आमच्या लोकशाही समाजांतल्या एकाद्या विशिष्ट गटापुरतीच ही समस्या मर्यादित नाहीं. अनुदारवादी व उदारमतवादी यांच्यांतला सुवर्णमध्य साधणाऱ्या स्वतंत्र व्यक्ति व व्यक्तिपदावर विश्वास ठेवणारे पुरोगामी लोक यांच्यापुढेंही त्याच स्वरूपांत ही समस्या उभी राहते. आम्ही पश्चिमेकडचे लोक ज्या स्वातंत्र्याचा उपभोग घेतों त्या स्वातंत्र्यावर विश्वास असणारा प्रत्येक नागरिक या व्यक्तिगत जबाबदारीचा भागीदार आहे.

**आपण एक तर स्वातंत्र्याच्या बाजूनें उभें राहूं शकतां किंवा तिच्या विरुद्ध पक्षाला !**

**आपण एक तर स्वतंत्र मानवाच्या मौलिक अधिकारांचें संरक्षण करूं शकतां—किंवा उदासीन राहून त्यांवर वज्राघात करूं शकतां!**

आमच्यापैकीं सोव्हिएट गुलाम व्यवस्थेच्या दोषांकडे जे डोळेझांक करतात ते "नकळत" क्रेमलिनचे मित्र बनतात. आणि आमच्या जीवनपद्धतीचेही ते शत्रु बनतात. ते आपल्या तोंड बांधून बसण्यामुळें कम्युनिझमचे सहकारी व सामुहिक बंदीकरणाचे समर्थक ठरतात. स्टॅलिन-वादाचें सत्यस्वरूप व त्याबद्दल भरपूर पुरावा उपलब्ध असल्यामुळें या मौनव्रती मित्रांना क्षमा करतां येत नाहीं. ते स्वतः अभिशापित आहेत.

तेव्हां आमच्यापैकीं प्रत्येकाचें मौन, प्रत्येकाची उदासीनता व प्रत्येकाच्या चुका यांवरच आमच्याविषयीं निर्णय घेतला जाणार आहे.

आपण या पुस्तकासारखीं पुस्तकें वाचलींत आणि तरी देखील स्वतंत्र भाषणांत किंवा नागरिक अधिकारांच्या संघर्षांत जें कांहीं करूं शकत असाल तें देखील केलें नाहींत व स्वतंत्र जीवनासाठींही काहीं केलें नाहींत तर कृपा करून स्वतःची फसवणूक करून घेऊं नका. आपण चुकीनें आपला पक्ष निवडला आहांत असें समजा. आपण स्वतंत्र राष्ट्रांचे पराश्रयी व अर्धेकचे लोक जे आहेत त्यांच्या मालिकेंत गोंवलां गेलां आहांत. आपण जाणूनबुजून किंवा नकळत अशानें कम्युनिस्टांचे समर्थक व्हाल व क्रेमलिनचा विजय आणि सोव्हिएट बंदीकरणाचे एक बहुमूल्य मित्र ठराल!

आमच्या जीवनसागरांत विचारधारांचा संघर्ष सतत चालूं असतो; चालूं राहील.

आजदेखील हा संघर्ष फार पुढें गेलेला आहे. आणि आम्ही अजून विजयापासून फार दूरवर आहोंत—

फांस टाकला गेला आहे.

आतां आपलें नांव पुकारलें जाण्याचीच तेवढी खोटी आहे!!

●●●